# दर्शन

' रूप पाहतां लोचनीं सुख झालें हो साजणी ' – हा एक मोठा गोड अभंग आहे. विठ्ठलाचे रूप पाहून होणाऱ्या सुखाची प्रत निराळी असेल. त्या सुखाचा अनुभव मला नाही. लोचनांना सुखविणारी असंख्य रूपे. त्याचप्रमाणे त्या सुखाच्याही निरनिराळ्या परी. मी मात्र अकल्पितपणे एका निराळ्याच सुखाचा अनुभव घेतला. एक दर्शन ध्यानीमनी नसताना घडले. ' दर्शन ' ह्या कल्पनेचीच एक असाधारण प्रचीती आली. ती त्यातल्या अकल्पितामुळे तर मनाला अधिकच बिलगून राहिली. ' आज अचानक गाठ पडे'मध्ये जसे त्या गाठ पडण्यापेक्षा त्यातल्या अचानकपणाला महत्त्व अधिक, तसे झाले. दर्शन घ्यायला जाऊन दर्शन घडवून घेण्यात तो आनंद लाभलाही नसता. आणि दर्शन म्हणजे फक्त दर्शन. लाखो डोळे पाहत होते – त्यांतलेच माझे दोन डोळे. माझ्या डोळ्यांसाठी घडवलेले ते दर्शन नव्हते. म्हणून अधिक अप्रूप !

व्हेनिसला पोहोचलो त्या दिवशी व्हेनिसमधल्या गोंडोल्यातल्या सहलींचेच आकर्षण मनात होते. पाणवाटांची ही सुंदर नगरी. वर्षभर

इथे उत्सव चालूच असतो. ओठावर गीत तरी नाही तर शीळ घेऊन हिंडणारे तरुण आणि त्या सादाला कधी डोळ्यांनी तर कधी स्मितातून उमटणाऱ्या गालावरच्या खळ्यांनी प्रतिसाद देणाऱ्या तरुणी. इथल्या सावलीच्या घड्याळावर ( sun-dial ) ह्या जलनगरीचे ब्रीदवाक्य कोरले आहे. 'मी फक्त सुखाच्या घटिकाच दाखवीत असते'—केवळ सुखाच्या घटिकाच दाखविणाऱ्या घड्याळांचे हे गाव. 'एकशे सतरा बेटे, दीडशे कालवे आणि त्यांना जोडणारे चारशे छोटे-छोटे पूल,' अशी या गावाची भौगोलिक रचना. बँकॉकमध्येही अशाच पाणवाटा आहेत. पुण्यातल्या रस्त्यातून सायकली जातात, तशा इथे छोट्यामोठ्या होड्या जात असतात. पण व्हेनिसचा टुमदारपणा बँकॉकला नाही. एक तर व्हेनिस शहरात मोटारींना प्रवेश नाही. इथे काशीतल्या बोळांसारखे सुळसुळणारे बोळ आहेत, किंवा मुंबईतल्या खोताच्या वाडीसारखे; पण कमालीचे स्वच्छ. शिवाय, भलतीकडून मुसंडी मारून येणारे सांड आणि संन्यासी ह्यांचा उपद्रव नाही. चार बोळ भेटले की छोटासा चौक. तिथेच एखादा चिमुकला मयखाना. इटालियन वारुणीचा घुटक्याघुटक्यांनी आस्वाद घेण्यासाठी मांडलेली टेबले. सदा बहरणारी नाना प्रकारची फुलझाडे! बाल्य, तारुण्य आणि वार्धक्यदेखील नजरेला नाज देणारे! आणि ह्या दृश्याच्या साथीला इटालियन गद्यातले, त्या स्त्री-पुरुषांच्या संवादांतून कानी पडणारे नादमधुर शब्द, आणि एवढ्याने पुरे होणार नाही म्हणून सतत चालू असलेले, झुळुकीसारखे अंगावरून जाणारे गिटारचे किंवा व्हायोलिनचे सूर! त्या इटालियन वारुणीचा आस्वाद घेण्याआधीच झिंग आणणारे हे व्हेनिस. त्यात जर एखादे वेळी दैवे इटालियन बयाबाईची गाठ पडली, तर मग सोन्याला सुगंध! ह्या असंख्य बेटांवर भव्य ख्रिस्ती प्रार्थनामंदिरे आहेत, नाना तऱ्हेच्या वेलींना आणि फुलांना अंगाखांद्यावर खेळवीत उभी राहिलेली दुमजली घरे आहेत. इथे केवळ ओठांनीच नव्हे, तर डोळ्यांनी, कानांनी आणि अंगप्रत्यंगांनी सारे काही पीत-पीतच हिंडावे. ह्या यौवनपुरीत स्मिताला पूर्वपरिचयाची अट नाही. मुक्त गीताला संकोच नाही. कंठ फुटला की गावे, सुकला की प्यावे!

ह्या नगरीत मी कुणा एकाची अंत्ययात्राही पाहिली आणि कुणा भाग्यवंताची विवाहयात्राही पाहिली. पहिल्या कारुण्यालाही दवाची टिपे गाळणाऱ्या लक्ष फुलांची संगत होती, मग विवाहाच्या आनंदोत्सवातल्या पुष्पवर्षावाची शोभा काय वर्णावी!

पाणरस्त्याच्या दुतर्फा असणारी घरे. त्यांना सुंदर सज्जे! त्या सज्जात खुर्ची टाकावी आणि त्या पाणरस्त्यावरून तरंगत जाणाऱ्या त्या गोंडोला पाहाव्यात. चिंचोळ्या, काळ्याभोर, सोनेरी नक्षी केलेल्या बाकदार नावा. त्या नावांच्या एका टोकाला मेण्यासारखे छप्पर. दोघांत तिसऱ्याची अडचण होणेच शक्य नाही, एवढीच गुबगुबीत गादीची बैठक. उजव्या-डाव्या बाजूला चिमुकले जाळीदार झरोके. समोर उंच वल्हे मारीत पाणवाट काटणारा आणि आतल्या प्रवाशांच्या यौवनलीलांना उधाण आणणारे गीत गाणारा तो गोंडोलेवाला. पाण्याचा मला वाटतं गाण्याशी केवळ प्रासच नव्हे तर चिरंतन ऋणानुबंधच जुळला आहे. डुलत्या चिमुकल्या कंदिलाच्या प्रकाशात सूचक अंधार-उजेडाचा खेळ चाललेला. मधूनच एखादा गुडुप अंधाराचा आधार देणारा पुलाखालचा बोगदा. जाणता गोंडोलेवाला तिथे वेग आवरतो. त्या अंधाराच्या पांघरुणाखाली त्या जोडप्याला रेंगाळत ठेवतो. आणि मग मिष्किलपणाने एखाद्या गीतातली नेमकी अशी ओळ फेकतो की, त्या प्रणयी जोडप्याला आपले गुपित याने नेमके कसे ओळखले, याचे नवल वाटावे. अगदीच तारुण्याच्या उंबरठ्यावरची किशोरी असली तर इटालियन वारुणीशी स्पर्धा करणारी लाली तिच्या गालावर यावी. त्या खुशीत तरुणाच्या हातून गोंडोलेवाल्याला मिळणारी बक्षिसी आणखीनच वाढून मिळावी. आपण काळ बदलला म्हणतो, जमाना बदलला म्हणतो. पण वर्षानुवर्षे चालत आलेले गोंडोलेवाल्याचे गीत बदलले नाही. नौकाविहारातल्या युवक-युवतींच्या लीला बदलल्या नाहीत. 'तरुण-तरुणिची सलज्ज कुजबुज' बदलली नाही. की त्या कुजबुजीला सूर पुरवणाऱ्या गोंडोले-वाल्याला लाभणारा तरुणाचा उदार हात आखडता झाला नाही!

आम्ही व्हेनिसला गेलो, त्या दिवशी व्हेनिसचा वार्षिक नौकामहोत्सव

होता. देशोदेशीचे प्रवासी हा दिवस गाठण्यासाठी व्हेनिसला आले होते. मुख्य कालव्याच्या दोन्ही बाजूला प्रेक्षकांसाठी लाकडी फळ्यांच्या पायऱ्या रचून हजारो खुर्च्या मांडल्या होत्या. आम्ही तिकिटे काढली आणि आपापल्या खुर्च्या पकडल्या. व्हेनिसच्या साऱ्या पाणवाटा तिथल्या वॉटरटॅक्सीज, होड्या, गोंडोले यांनी भरून गेल्या होत्या. जिथून नौकांच्या मिरवणुकी आणि शर्यती दिसतील अशा दिशेला माणसांची रीघ लागली होती. सारे सज्जे, घराच्या गच्च्या, खिडक्या माणसांनी फुलल्या होत्या. लावण्यवतींनी तर जणू काय नौकांची शर्यत नसून सौंदर्यस्पर्धा असाव्यात, असा साजशृंगार केला होता. माणसांच्या जगात कुठे दुःख असेल तरी का ? – अशी शंका यावी, असे हे वातावरण. वृद्ध वय विसरले होते. बालके कारंजांसारखी थुयथुयत होती. आणि तरुण-तरुणींच्या उत्साहाला तर उधाण आले होते. रंगीबेरंगी पोशाख, गौरवर्ण, वाऱ्यावर उडणारे मुक्त सोनेरी केस. एखाद्या बागेतल्या फुलांच्या ताटव्यांना पाय फुटून ते मोकाट सुटावे, तशी त्या व्हेनिसभर माणसे सुटली होती. हे दृश्य कुणी डोळ्याने टिपत होते. कुणाच्या चेहऱ्यावर ही देवदुर्लभ संधी आपल्याला लाभली, याची धन्यता. हे सारे पाहायला देवाने हातीपायी धड ठेवले म्हणून आनंदाच्या वृद्ध स्मितामागे कृतज्ञताही ! कॅमेऱ्यांचा क्लिक-क्लिकाट ! नाना तऱ्हांनी सजवलेल्या नौका ब्रोहोल्याकडे चालत जायच्या मंगलघटिकेची वाट पाहत उभ्या असलेल्या वधूसारख्या नटून थटून त्या कालव्याच्या अंगावर आतुरतेने अस्वस्थ होऊन डुलत होत्या. आम्ही बसलो होतो, तिथून जवळच एक सुंदर शामियानाही होता, तिथे इटलीतल्या आणि बाहेर देशातून आलेल्या मानकऱ्यांचे आगतस्वागत चालले होते. मिरवणुकीआधी मुंबईचे ट्रॅफिक पोलीस गर्दी हटवतात, तसे छोट्या-छोट्या लॉंचमधून इटालियन ट्रॅफिक पोलीस नौकांची रहदारी आवरीत होते. कर्ण्यांतून सुस्वर वाद्यसंगीत चालू होते. निवेदक ह्या उत्सवाच्या नाना कथा ऐकवीत लोकांचे मन-रंजन करीत होता. उत्कंठा वाढवीत होता. लोकांनी दोन-दोन तास आधी येऊन जागा धरल्या होत्या. दिल्लीला प्रजासत्ताकदिनाच्या परेडला

माणसे रात्री दोन-दोन वाजता येऊन जागा धरतात. प्रत्यक्ष मिरवणूक सकाळी नवाला सुरू होते. इथे तितक्या आधी नसले, तरी दोन-तीन तास आधी येऊन माणसे मोक्याच्या जागा धरून बसली होती; पण कुठे चेंगराचेंगरी नाही, की डोकी तापणे नाही. तशी इटालियन माणसे पटकन एकेरीवर येणारी; पण उत्सवात कुणी मिठाचा खडा टाकणार नाही. मला वाटते, त्यांचे सारे जगणेच एका उत्सवाकडून दुसऱ्या उत्सवाकडे अशा स्वरूपाचे असावे. एक तर कॅथलिक पंथात सण-उत्सवच काय, पण रविवारची प्रार्थनादेखील सोहळ्यासारखी साजरी करण्याकडे प्रवृत्ती. त्यांच्या धर्मनिष्ठेला ह्या सोहळ्यांनी खूप साहाय्य केले आहे. सणांमुळे माणसे वारंवार एकत्र येतात. शिवाय इटालियन संस्कृतीत पौर्वात्य संस्कृतीतली उत्सवप्रियता आणि तिच्या अनुषंगाने येणारी ख्यालीखुशाली भरपूर मिसळली आहे. त्या मानाने प्रॉटेस्टंट, मेथॉडिस्ट वगैरे ख्रिस्ती पंथातील धार्मिक व्यवहार अलंकारहीन असतात. इटलीतली भव्य प्रार्थनामंदिरे आणि तिथली ती डोळे दिपवणारी शिल्पकला, सूर्य-किरणांत काचेवर उजळून दिसणारी चित्रकला, प्रस्तरचित्रे, पूजास्थानांची ती मनोहर सजावट आणि ते समृद्ध प्रार्थनासंगीत ह्या साऱ्या मुख्यतः पंचेन्द्रियांना दुखवीत-सुखवीत मनाचे उन्नयन करणाऱ्या गोष्टी. फास्टिंग-इतकेच फीस्टिंगला ह्या धर्मपंथात महत्त्व. त्यातूनच एक आनंदशोध सुरू होतो. जीवन कळकट न राहता शोभिवंत होते. स्वर्गनरक, पाप-पुण्य किंवा देवसैतान ह्या द्वंद्वात हिंदकळणाऱ्या धर्मकल्पनांचे मला कौतुक नाही. नव्हे — असलाच तर तिटकारा आहे. परंतु ह्या धर्मातून निर्माण होणाऱ्या सणा-उत्सवांनी मात्र जीवनाला खूप रंग आणला आहे, हे नाकारून चालणार नाही. असल्या ह्या उत्सवी जीवनाचा युरोपात तरी इटलीमध्येच सर्वोत्कर्ष आढळतो. व्हेनिसमधला हा नौकांचा महोत्सव तसा हौसेमौजेचा असला, तरी त्यालाही काही तरी धार्मिक अधिष्ठान आहे, असे कुणीसे मला सांगितले. त्याच्याशी मला कर्तव्य नव्हते.

हळूहळू रंगीबेरंगी फुले आणि फुग्यांनी सजवलेल्या विशाल नौका

कालव्यातून पुढे येऊ लागल्या. काही नौकांवर प्राचीन वेषभूषा लेऊन स्त्रीपुरुष सजले होते. इटलीच्या इतिहासातले काही प्रसंग स्थिर-नाट्यरूपाने उभे केले होते. मधूनच एखाद्या नौकेवर कसरतीचे खेळ होत होते. नर्तकींचे ताफे नृत्य करीत होते. रूपवती तरुणी आजूबाजूच्या प्रेक्षकांवर उडती चुंबने फेकीत होत्या. त्यांची नोंद शेजारच्या तरुणीच्या गालावर करणारे तरुणही आमच्या आसपास बसले होते. मानापमानातल्या 'वसंतसेना सरसावे ही वैरागी-समुदायी होई हो हो हाहाकार'ची मला आठवण आली. सुदैवाने हाहाकार करणारा वैरागी-समुदाय मात्र तिथे नव्हता! त्या गडबडीत एखाद्या इटालियन पाद्रीबाबाने खिस्तकृपेने शेजारी आलेल्या तरुणीच्या गालाचे आपल्या एरवी प्रार्थना पुटपुटणाऱ्या ओठांनी चुंबन घेतले नसेलच, असे नाही. तसे हे पाद्रीबाबा अधूनमधून सैतानाच्या राज्यात हळूच सहल करून येतात म्हणे! इतकेच नव्हे, तर मद्य गाळण्याच्या कार्यात तिथले बेनिडिक्टाईन पंथाचे पाद्री अग्रगण्य मानले जातात. अध्यात्मिक समाधीला आपल्याकडेही गांजाची चिलीम हातभार लावतेच म्हणा!

काही वेळाने नौकांच्या शर्यती सुरू झाल्या. व्हेनिसमधल्या निरनिराळ्या बेटांवरच्या नौकापटूंनी त्यांत भाग घेतला होता. दृष्ट लागण्यासारख्या मर्दानी अंगसौष्ठवाने तळपणारे ते नौकापटू आघाडी गाठण्याची शर्थ करू लागले. शेकडो वल्ही पाणी कापीत होती. निवेदकाच्या शब्दांना विलक्षण गती आली होती; प्रेक्षकांच्या पैजा लागत होत्या. त्यातल्या पुढे सरकणाऱ्यांना हजारो मुखांतून 'भले शाब्बास'च्या आरोळ्यांचे स्फुरण लाभत होते; मागे रेंगाळणाऱ्यांची थट्टाही होत होती.

हा सारा सोहळा पाहण्यात दिवस कधी मावळला, ते कळले नाही. क्षणार्धात त्या पाणरस्त्यांवर आणि दुतर्फा असलेल्या प्रासादांत हजारो दिवे लुकलुकू लागले. कुठे भलीमोठी झुंबरे, कुठे दिवाळीसारखी दिव्यांची आरास! हजारो कंठांतून गाणी फुटली! लोकांच्या झुंडी आता मयखान्याकडे वळल्या! इटालियन पाककौशल्य तर जगप्रसिद्ध.

मत्स्य-कूर्म-वराहांची नानाविध खाद्य-स्वरूपे! लखलखत्या काचपात्रातून चिआंटी-चिंझानो-व्हरमूथचे नाना प्रकार, व्हेरोनाहून आलेल्या तऱ्हेतऱ्हेच्या रक्तवारुणी, श्वेतवारुणी. द्राक्षरसात दडलेला कैफ आता गात्रागात्रांतून सळसळत जाऊ लागला होता. अशी उतरत जाणारी संध्याकाळ आधी साऱ्या वातावरणावर छू-मंतर टाकून जात असते. त्यात पुन्हा सतत वाहत्या कालव्यांची संगत. त्या कालव्यांशी नागमोडी घालीत जाणाऱ्या स्वच्छ, चिमुकल्या फरसबंदी वाटा. सगळीकडे अशी काही जादूगिरी की, प्रत्येक पुरुषाला वाटावे आपण परीकथेतील राजकुमार आहोत, आणि प्रत्येक स्त्रीला वाटावे की, एकाएकी आपल्याला परीचे पंख फुटले आहेत.

दिवस मावळला होता. पाण्यावर असंख्य तरंगते दिवे घेऊन झुंबरांचा लखलखाट मिरवीत, हवेत उत्तेजक गारवा भरून रात्र उगवली होती. अशा वेळी हॉटेलातल्या खोलीत बसून राहणे शक्य नव्हते. निरुद्देश भटकायला लावणारी रात्र. हॉटेलच्या स्वागतकक्षातच जाहिरात होती — व्हेनिसच्या चित्रपट-महोत्सवाची. आजचा शेवटला दिवस. आणि चित्रपट होता चार्ली चॅप्लिनचा 'सिटी लाइट्स!' मी मॅनेजरसाहेबाला विचारले, 'काही तिकिटे मिळतील का?' 'तिकीट? — सेंट मार्क्स स्क्वेअरमध्ये सगळ्यांना फुकट सिनेमा पाहायला मिळेल —'

आम्ही लगेच एक चिमुकली बोट पकडली आणि सेंट मार्क्स स्क्वेअर गाठला. ग्रॅण्ड कॅनॉलच्या काठावरचा हा सेंट मार्क्स स्क्वेअर. एक संगमरवरी फरसबंदी केलेला विशाल चौक. तीन बाजूला प्राचीन सुन्दर इमारती. तिथे तळमजल्याला उपाहारगृहे; नाना तऱ्हेच्या कलासंग्रहांनी भरलेली दुकाने. एका बाजूला सेंट मार्क्सचे भव्य चर्च. आकाशाकडे झेपावणारा उंच मनोरा. दुसऱ्या बाजूला पंधराव्या शतकात बांधलेला एक घड्याळाचा मनोरा. गेली पाचशे वर्षे ह्या घड्याळाचे टोले तासा-अर्ध्या-तासाला घणघणताहेत. कुठून कशी कळ दाबली जाते कोण जाणे, हातात टोल घेतलेला एक लोखंडी पुतळा येतो आणि तास वाजवतो. दिवसभर हजारो कबुतरे त्या चौकात प्रवाशांनी टाकलेले मक्याचे दाणे

टिपत असतात. हातावर, डोक्यावर, खांद्यावर येऊन बसतात. आबाल-वृद्ध ह्या खेळात रंगलेले असतात. चित्रकारांनी ह्या चौकाचे वैभव कुंचल्यांनी पकडण्यासाठी गेली पाच शतके धडपड चालविली आहे. आधुनिक युगात हौशी आणि जाणकार छायाचित्रकारांनी कोनाकोनांतून हे सौंदर्य टिपण्याचा अव्याहत उद्योग चालवला आहे. ह्या चौकाची मी खूप चित्रे व छायाचित्रे पाहिली; पण ह्या चौकाचे प्रत्यक्ष दर्शन घडलेल्यांना त्या चित्रातले न्यूनच त्याच्या प्रथमदर्शनानंतर जाणवते.

आम्ही पोहोचलो, त्या वेळी हा चौक हजारो प्रेक्षकांनी आधीच भरला होता. एका बाजूला प्रचंड पडदा उभा केला होता. आम्ही त्या गर्दीत शिरकाव करून घेतला. अजून चित्रपट सुरू व्हायला अवकाश होता. माणसांचे लोंढेच्या-लोंढे येऊन त्या गर्दीत मिसळत होते. पण कुठेही उगीचच चेंगराचेंगरी वगैरे नव्हती. इतक्या प्रचंड जनसमुदायासाठी संगीत वाजत होते; पण कर्णे इतके चांगले होते की, आपल्या जाहीर सभांतून जसे संगीत कानांवर गुद्दे मारून जाते, तसा त्रास होत नव्हता.

अंधार झाला. आणि पडद्यावर अक्षरे आली—' सिटी लाइट्स् '—चार्ली चॅप्लिन्. एकाएकी पडद्यावरही अंधार झाला आणि प्रकाशाचा एक झोत आम्ही उभे होतो तिथून उजव्या हाताला असलेल्या एका सुंदर दगडी इमारतीच्या सज्जात गेला. आणि अहो आश्चर्यम्!—त्या सज्जात साक्षात् ' चार्ली चॅप्लिन् ' खालच्या चौकातून असंख्य लोकांचे अभिवादन स्वीकारण्यासाठी उभा होता. चौकातून असंख्य हातांनी टाळ्या वाजत होत्या. इटालियन, फ्रेंच, इंग्लिश—नव्हे, जवळजवळ सगळ्याच युरोपीय भाषांतून ' चार्ली चॅप्लिन् झिंदाबाद ' म्हणायला जे काही शब्द असतील त्यांच्या आरोळ्या उठल्या. मी तर त्या चौकात जागा असती, तर दंडवतच घातला असता. माझ्या मानसपूजेच्या पंचायतनात चॅप्लिनची प्राणप्रतिष्ठा केव्हा झाली, ते माझे मलाच आठवत नाही. चॅप्लिनला एकदा प्रत्यक्ष पाहावे ही इच्छा अशा अकल्पित रीतीने पुरी होणार आहे, हे हिंदुस्थान सोडताना स्वप्नातही आले नव्हते. घटकाभर

माझा माझ्या डोळ्यांवर विश्वासही बसेना ! सिटी लाइट्स्, गोल्ड रश्, ग्रेट डिक्टेटर, मॉडर्न टाइम्स, मोसिये व्हर्दू, लाइम लाइट् आणि असंख्य छोट्या-छोट्या चित्रपटांतून त्याचे दर्शन घडले होते. पण आजचा योगायोग अपूर्व. सिटी लाइट्स्सारखे त्याचे असामान्य चित्र त्याच्या उपस्थितीत मी पाहणार होतो. वाचा फुटली नव्हती, त्या काळातला हा चित्रपट जिथे बोलकेसुद्धा मुके होते, तिथे मुक्या जित्रांची करुण कहाणी लोकांना हसवून बेजार करीत सांगणारा हा अद्‌भुत कलावंत ! समाजातल्या 'अंडरडॉग्'चे चित्रण करणारा. रस्त्याच्या काठी जगणाऱ्या त्या केविलवाण्या कुत्र्यासारखाच केविलवाण्या डोळ्यांनी पाहणारा. तशीच मानेची नागमोडी घालीत, तसाच सतत अन्न आणि मादीचे प्रेम यांसाठी भुकेलेला. त्या कुत्र्याच्याच फेंगड्या चालीने चालणारा, कुत्र्याच्या चार तंगड्यांतली एक जशी लटकत असते, तशी आपली काठी लटकावणारा, डोक्यावरच्या त्या काळ्या हॅटमधून कुत्र्याच्या डोक्याची सूचक प्रतिमा दाखवणारा, ओठावर मिशांचा चौकोन चिकटवून कुत्र्याच्या काळ्या तोंडाशी साधर्म्य दाखवणारा दांडगटांकडून सतत हाडूत-हुडूत करून घेणारा चॅप्लिन् ! पोराबाळांना हसवणारा आणि थोरांना हसता-हसता अंतर्मुख करीत नकळत डोळ्यांच्या कडा भिजवणारा चार्ली चॅप्लिन् ! त्या प्रकाशाच्या झोतात त्याचा गोरापान चेहरा मोकळेपणाने हसताना दिसलेली त्याची शुभ्र दंतपंक्ती आणि त्या साऱ्या शुभ्रतेशी स्पर्धा करणारे त्याचे चमकदार, रेशमी कुरळ्या वळणाचे पांढरे शुभ्र केस. ऐंशीचे घर ओलांडलेला, बराचसा गुबगुबीत झालेला चॅप्लिन् – बाजूला त्याची मुलगी, आणि मला वाटते पत्नीही असावी. एखादा कुटुंबवत्सल बाप जसा आपल्या परिवाराला घेऊन खाली चौकात आला असेल, तसाच चाळीस-पन्नास वर्षांपूर्वीच्या तरुण चार्ली चॅप्लिनला पाहायला आलेला हा वृद्ध चॅप्लिन् ! लोकांच्या अभिवादनाचा स्वीकार करून हाताने पडद्याकडे इशारा करून सांगत होता, 'तो पाहा – चॅप्लिन् तिथे पडद्यावर आहे.' पुन्हा अंधार झाला. चित्रपट सुरू झाला. एका भव्य पुतळ्याचे अनावरण

आहे. प्रमुख पाहुणे त्या कोण्या महापुरुषाचे स्तुतिस्तोत्र गाताहेत, शिरा ताणून-ताणून भाषण करताहेत. चित्रपट मुका असल्यामुळे त्याच्या आविर्भावातून विशेषणांची केवढी जोरदार खैरात चालली आहे ते कळते. प्रमुख पाहुण्यांनी दोरी ओढून पुतळ्यावरचे कापड बाजूला केले. केवढा भव्य पुतळा. त्या समारंभाला उपस्थित असलेल्या 'सज्जनों और देवियों'चा मेळावा त्या पुतळ्याची ती भव्यता पाहून थक्क झाला होता. पण इतक्यात त्या पुतळ्याच्या मांडीवर एका चिमुकल्या जीवाची चळवळ सुरू झाली. काळ्याभोर पोषाखातला तो करंगळीएवढा दिसणारा माणूस ! उद्घाटन-समारंभाची वाट पाहत उभ्या असलेल्या त्या पुतळ्याची मांडी, ही ह्या अनिकेताची शय्या होती ! ह्या पहिल्या दृश्याने चाळीसएक वर्षापूर्वी प्रेक्षकांच्या मनाचा ठाव घेतला होता. त्यानंतर चित्रपटांचे तंत्र बदलले. जीवनात नाना तऱ्हेची परिवर्तने झाली. पण त्या दृश्याला आजही जो प्रचंड प्रतिसाद मिळाला, तो मात्र तितक्याच जोरात. ती टाळी थांबेचना. पुन्हा काळोख. पुन्हा चॅप्लिनवर झोत. पुन्हा अभिवादन ! – म्हाताऱ्या चॅप्लिनला पडद्यावरचा तो तरुण चॅप्लिन सांगत होता .... 'गड्या, तुला मरण नाही ....'

सगळा चित्रपट मी उभे राहून पाहिला. रस्त्यात फुले विकणाऱ्या एका अंध मुलीच्या प्रेमात पडलेल्या त्या अनिकेताची–ट्रॅम्पची–ती अद्भुत कहाणी. केवळ दारूने झिंगलेल्याच अवस्थेत त्याला ओळखणारा तो श्रीमंत माणूस ! त्याच्याकडून पैसे घेऊन ह्या अनिकेताने उत्तम नेत्रवैद्याकडून शस्त्रक्रिया करून त्या मुलीला दृष्टी मिळवून दिली. तिला सारी दुनिया दिसू लागली; पण आपला उपकारकर्ता कोण, ते मात्र कळत नव्हते. तिच्या अंध डोळ्यांपुढे उपकारकर्त्याचे स्वरूप एखाद्या राजकुमारासारखे होते. हा भणंग दृष्टिलाभ झालेल्या त्या तरुणीकडे दुरून पाहत होता. 'मीच तो' हे सांगायला जीव धजावत नव्हता. मुक्यासारखे त्याचे डोळे तिच्याकडे पाहत होते. पाहता-पाहता डोळेमेट झाली आणि अंतरीची खूण पटली. हा शेवटला प्रसंग हजारो डोळ्यांनी

पाहिला, त्या वेळी नाना देशांतून व्हेनिसच्या त्या जगप्रसिद्ध चौकात जमलेल्या एकाही डोळ्याची कड भिजल्याशिवाय राहिली नसेल. चित्रपट संपला. आणि डोळ्यांत तरंगणारे अश्रू पुसायला जे काही चार क्षण लागले असतील तेवढाच तो सन्नाटा! कलावंताला मिळायला हवी असलेली सगळ्यात मोठी दाद. आणि त्या चार क्षणांच्या शांततेनंतर टाळ्यांचा आणि आरोळ्यांचा जो बांध फुटला, त्याला तोड नव्हती. बाजूच्या ग्रँड कॅनॉलमधल्या पाण्यालादेखील हा ध्वनिलहरींचा लोंढा पाहून चमकल्यासारखे झाले असेल!

दूरच्या त्या खिडकीतला चार्ली चॅप्लिन. त्या अलोट गर्दीत एखाद्या थेंबासारखा मी! चॅप्लिनच्या दर्शनाने अखंड उजळून गेलो. 'दर्शनमात्रे मनकामना पुरती' म्हणजे तरी दुसरे काय असते! त्या दर्शनावरून ओवाळून टाकण्यासारखे माझ्यापाशी काहीच नव्हते. मी दिवसभरात झालेले साऱ्या व्हेनिसचे दर्शनच चॅप्लिनवरून ओवाळून टाकले!

## निळाई

रोमच्या दिशेने आमचे जंबो उडत असताना ' इटली ' हा शब्द मी प्रथम केव्हा ऐकला, ते आठवत बसलो होतो. युरोपचा भूगोल काही प्राथमिक शाळेत नव्हता. मी पार्लेकर असल्यामुळे ठाणे जिल्ह्याचा भूगोल घोकला होता. मग एकदम आठवले की, रोजच्या शालेय प्रार्थनेत इटलीचा उल्लेख होता. ' हे घनश्याम श्रीराम मदात्माराम ' अशा ध्रुव-पदाची ती प्रार्थना होती. त्यात घनश्याम श्रीरामाला आम्ही स्वातंत्र्य देण्याची कळकळीची विनंती करीत होतो. ' इतरांना सगळे काही देता, मग आम्हीच काय पाप केलं आहे ? ' अशासारखा थोडा सूर होता. त्यातल्या एका कडव्यात इटली यायची. ' भू जपानची नटविली–स्वातंत्र्ये, इटलीहि तशी सजविली–स्वातंत्र्ये, मग आम्हालाच का पारतंत्र्यपंजरी कोंडिले राम ? ' असा तो सवाल होता. जपान आणि इटली वगैरे देशांना स्वातंत्र्याने नटविण्याचे कार्य घनश्याम श्रीरामच करतो, असा दृढविश्वास होता. राम हा भारतीय देव आंतरराष्ट्रीय राजकारणातही दिलचस्पी कसा घेत असेल, वगैरे गैरसोयीचे प्रश्न त्या वयात पडत

नसत! ते असो. पण रोजच्या त्या जपान-इटलीच्या स्मरणामुळे हे स्वातंत्र्याने नटवलेले देश पाहण्याची बालपणापासून इच्छा होती. त्यांतले जपान घडले. पण युरोपच्या डोक्यावरून चारपाचदा उडत जाऊनही रोमचा विमानतळ यापलीकडे इटली पाहण्याचा योग येत नव्हता. तो शेवटी आला होता.

ह्या इटलीत झालेल्या विद्येच्या पुनरुज्जीवनामुळे सगळ्या युरोपने आपली जुनी कात टाकली. युरोपला संगीत, चित्र, शिल्प, स्थापत्य, नाट्य — थोडक्यात म्हणजे अत्यंत समृद्धपणाने जगण्याचे शास्त्र आणि कला ह्या इटलीने शिकवली. रोम, व्हेनिस, फ्लॉरेन्स, नेपल्स, मिलान .... एकेका नुसत्या शहराची कथा लिहायची झाली, तर हजारो पानांचे इतिहास लिहावे लागतील.

रोमच्या विमानतळाकडे विमान झेपावत होते. आणि सहज खिडकीतून खाली नजर टाकली. हिरव्या शेतांचा गालिचा पसरलेला आणि त्यात नदीच्या पाण्याच्या आणि कालव्यांच्याच चक्क निळ्या रेषा ओढलेल्या. काही मिनिटांपूर्वी भूमध्यसमुद्राच्या निळाईने मन तृप्त केले होतेच. त्यात हिरव्या गालिच्यावरची ही एखाद्या पोराने मनसोक्त रेघोट्या काढाव्या, तशी निळ्या पाण्याच्या प्रवाहांची वेलबुट्टी! सुरेख ऊन पडले होते. आणि आकाशाला भारतीय नीलांशुक लाभलेले पाहिले. युरोपात असे निळे आकाश मी यापूर्वी पाहिले नव्हते. इंग्लंड, जर्मनी आणि फ्रान्स ह्या तिन्ही देशांत माझा थोडाफार मुक्काम झाला आहे. पण माझ्या मुक्कामात मला तिथे असे निरभ्र आकाश बघण्याचा योगच आला नाही. हे आकाश युरोपीय न वाटता भारतीय वाटत होते. माझे तर भारतीय धरतीपेक्षा भारतीय आकाशावरच अधिक प्रेम आहे. आमच्या प्राचीन महाकवींनी रामकृष्णांना त्या आकाशाचा नीलवर्ण उगीचच बहाल केला नाही. आमच्या रात्री काळ्या असण्यापेक्षा निळ्या असतात. म्हणूनच तर *गुपचूप अभिसाराला निघालेल्या युवती नीलांशुक-परिग्राहिणी* असतात. निळ्यात निळे मिळून जाते. आमचा देखणा पर्वतदेखील निलगिरी आहे. आकाशाचे निळेपण ओळखीचे वाटले, आणि त्या

निळाईने इटलीच्या धरतीशी माझे नाते जुळवले.

रोमच्या विमानतळावर उतरलो. तिथून नेपल्सला जायचे होते. ते विमान सुटायला अवघी पाच मिनिटेही उरली नव्हती. तेवढ्यात कस्टमसाहेबांपुढे आपण स्मगलर वगैरे नसल्याचे सिद्ध करून त्या विराट आंतरराष्ट्रीय हवाई पत्तनावरून राष्ट्रीय पत्तनावर जायचे होते. विमानतळाला हवाई पत्तन असा सरकारी हिंदी शब्द मी दिल्लीला पालम अड्डयावर वाचला. तिथे तो 'पत्तन' असा न लिहिता 'पतन' असा लिहिला आहे. त्या तळावर होणाऱ्या विमानांचे 'पतन' पाहिल्यावर पत्तनापेक्षा 'पतन' शब्दच योग्य आहे, म्हटले पाहिजे. पण हे रोमचे पत्तन भलतेच मोठे. चेहऱ्यावर झटक्यात आमची नेहमीची कुर्डुवाडीला गाडी बदलून पंढरीला जाणाऱ्या बार्शी लाइटचा फलाट शोधणाऱ्या 'इठ्ठला पांडुरंगा'वाल्याची कळा आली. इतक्यात निळ्या गणवेषातला एक पोलीस अधिकाऱ्यासारखा दिसणारा इटालियन माणूस आला. तो पोलीस अधिकारी होता की विमानतळावरचा अधिकारी होता, ते 'पोप' जाणे! गणवेषातल्या सुद्धा बॅण्डवाल्यालाही मी प्रथम पोलीस किंवा लष्करी अधिकारी मानून अदबीने वागतो! तो इटालियन अधिकारी जवळ आला. माझ्याकडे आणि माझ्या पत्नीकडे त्याने चक्क स्मितहास्य करीत आम्हांला अभिवादन केले! पोलीसवाला, आणि असे प्रेमळ स्मितहास्य? माझा कंठ दाटत चालल्याची मला शंका आली. तो म्हणाला, 'आपणच मिस्टर ॲण्ड मिसेस देशपांडे का?' (हे तो इंग्रजीत म्हणाला. उगीच गैरसमज नको.) मी म्हटले 'यस'! मनात उगीचच धडकी भरली. आम्हांला हा कुठल्यातरी चोरटी आयात करणाऱ्या टोळीतले लोक तर नाही समजला? ही शंका! परदेशच्या प्रवासात माझ्या डोक्यातल्या शंकांचे वजन मोजले तर मला विमानकंपन्यांना शेकडो किलोचा चार्ज भरावा लागेल. शेवटी कळले की, कुण्या अज्ञात स्नेह्याने रोमच्या विमानतळावर आमच्या आगमनाची आगाऊ वर्दी देऊन आमची नेपल्सला नीट पाठवणी करण्याची व्यवस्था केली होती. त्या भल्या माणसाने कस्टमसाहेबापुढे आमची इटालियन भाषेत भलतीच तारीफ केली

असावी. कारण त्या साहेबानेही मला ' ब्याग उघड, ' म्हणण्याऐवजी हस्तांदोलन करून आमच्या गठुळ्यांवर फुल्या मारल्या! आमच्या दिमतीला एक तरुण हवालदार दिला, आणि नेपल्सला जाणाऱ्या विमानाच्या अड्ड्याकडे आम्ही निघालो. हवालदाराने आम्हांला टॅक्सीत घुसवले आणि त्या दोघांचा इटालियन भाषेत जो संवाद झाला, त्यावरून ' ए साला, ज्यादा भाडा लेगा तो याद रखना —' ह्यासारखे काहीतरी पोलिसी थाटाने तो त्याच्याशी बोलला असावा, असा मला संशय आला. कारण त्या टॅक्सीवाल्याने पोलीसची पाठ फिरताच ओठांची जी भेदक हालचाल केली त्यावरून बहुधा त्या पोलीसच्या आईविषयी काही खाजगी उद्गार काढल्यासारखे वाटले! आम्ही अर्थातच तिकडे दुर्लक्ष केले. कारण दुर्लक्षाखेरीज काहीच करता येण्यासारखे नव्हते. ' नेपल्सच्या विमानतळावर न्यायला सांगा, ' असा वामांगाच्या दिशेने लकडा चालू होता. टॅक्सीवाल्याला मातृभाषेतूनच शिक्षण मिळालेले असल्यामुळे माझ्या ' नेपल्सला नेणाऱ्या विमानांचा तळ कुठे आहे हो? ' ह्या प्रश्नाला ' नो इंग्लिश! ' असे त्याने एक जनरल उत्तर दिले. पुन्हा एकदा मी ' नेपल्स — नेपल्स ' म्हटले. तेव्हा तो ' हाइइइ ' असे काहीसे म्हणाला आणि मुख्य विमानतळापासून मोटारीने सुमारे अडीच मिनिटांच्या अंतरावर असलेल्या एका छोट्या विमानतळाजवळ आला आणि — भरतनाट्यमवाल्याला क्षणभर बुचकळ्यात टाकतील इतके हातवारे करून ' नापोली-नापोली ' म्हणाला. नेपल्सला इटालियन भाषेत ' नापोली ' म्हणतात, हे तेव्हा कळले! त्यामुळे ' दापोली'चे खरे नाव काय बरे असावे, असाही एक भाषाशास्त्रीय प्रश्न माझ्या मनाला चाटून गेला! आम्ही आपली तिकिटे घेऊन ' नापोली'च्या विमानात बसविणाऱ्या डेस्कवालीपाशी गेलो, तो तिने आमचे विमान सुटून दहा मिनिटे झाल्याचे सांगितले! क्षणभर ब्रह्मांड आठवले! इटलीत आमचे सहप्रवासी नापोलीच्या विमानतळावर आमच्या स्वागताला येणार होते. ठरलेल्या विमानाने आम्ही आलो नाही, हे पाहून बहुधा हिंदुस्थानातूनच आम्ही आलो नसणार, असा तर्क

करून जर ती मंडळी पुढल्या प्रवासाला निघून गेली तर काय ? पण निसर्गाने माझ्या चेहेऱ्यावर अशी काहीतरी अलौकिक सोय केली आहे की, माझी हैराणी पाहणाऱ्याच्या झटकन लक्षात येते. लगेच ती डेस्कवरची तरुणी ( तेवढ्यात तिच्या त्या निळ्या डोळ्यांनी ' कलेजा थाम लिया ! ' ) मला म्हणाली ' दोंत वरी ! '—म्हणजे ' डोंट वरी ! ' हे म्यां वळखले. पुढे एक-एक इंग्रजी शब्द जुळवीत तिने मला ' पंधरा मिनिटांतच दुसरे विमान सुटते, त्यात तुमची सोय करून देते, ' असे सांगितले. मी उगीचच तिच्यावर इटालियन भाषेत इंप्रेशन मारावे, म्हणून खिशातून ' इंग्लिश इंटु इटालियन ' व्यवहारकोश काढून ' थँक्यू'ला इटालियन शब्द शोधीत होतो. तेवढ्यात ती कार्टी ( कार्टीच नाही तर काय ! निळे डोळे असले म्हणून काय झाले ? ) मला म्हणाली, ' दोंत वरी. आय अंदरस्तांद इंग्लिश. ' शेवटी मी मुकाट्याने इंग्लिश ' थँक्यू ' तिच्यावर फेकून सटकलो.

रोमहून नापोलीला निघालो – छोटेसे विमान होते ! आणि उड्डाणही काही मिनिटांचे ! आम्ही टळटळीत दुपारी नेपल्सच्या त्या टुमदार विमानतळावर पोहोचलो. तिथे लंडनहून आमच्या आधी आलेले सुधाकर आणि मीना प्रभू आमचे स्वागत करणार होते. विमानतळावर बघतो, तर स्वागतसमितीचे दोन्ही सदस्य गायब ? पुन्हा हैराण ! ' नेपल्स पाहावे आणि मग मरावे, ' अशी एक नेपल्स-प्रशस्तीची ओळ आहे. मी नुसता विमानतळ बघूनच आमच्या मित्रांच्या गैरहजेरीमुळे मृत्युपंथाला लागलो होतो. तेवढ्यात आधीच्या विमानाने आलेले माझे मेहुणे आमच्या शोधात हिंडताना आढळले. पाठीला सायकल लावून सदाशिव नारायण इत्यादी पेठांत पिक्चर टाकायला निघालेल्या पुणेकर दोस्तमंडळींची ' बंड्या ऽऽ ' अशी हाक हाणली जाते, तशी नेपल्सच्या त्या विमान-अड्ड्यावर ' मोह ऽऽ न ' अशी माझी मऱ्हाटी हाक ऐकून दोन-तीन डझन इटालियन माना गर्रकन वळल्या. आमच्याप्रमाणे मोहनराव ठाकूरही स्वागतसमितीच्या आणि आमच्या शोधात हिंडत होते. सुधाकर आणि मीना नेपल्सपासून तीस-चाळीस मैल दूर असणाऱ्या

सोरेंतो नावाच्या गावाहून येणार होते. इटलीतला आमचा पहिला मुक्काम सोरेंतोला होता. दोन-अडीच तास त्या विमानतळावर आम्ही अस्वस्थ होऊन त्या दोघांची वाट पाहत होतो. एवढ्यात आम्ही सोरेंतोच्या ज्या हॉटेलात उतरणार होतो तिथल्या मॅनेजरला फोन जोडला. माझे शुद्ध भारतीय इंग्रजी आणि त्याचे इटालियन इंग्रजी अशी झटापट सुरू झाली. त्याला काही 'सुधाकर प्रभू' हे ऐकू येत नव्हते. मी स्पेलिंग सांगत होतो. शेवटी कशाने कोण जाणे, त्याच्या डोक्यात प्रकाश पडला आणि ती मंडळी सकाळीच तिथून निघाल्याचे कळले ! म्हणजे नवीन चिन्ता ! सोरेंतोहून ते मोटार हाकीत येणार होते. लगेच अपघाताची शंका आली. मग पोलीसखात्याशी संपर्क साधला. त्याने तत्परतेने चौकशी करून सोरेंतो-नेपल्स रस्त्यावर मोटार अपघात झाल्यामुळे भयंकर ट्राफिक जॅम झाल्याची बातमी सांगितली ! आणि आता करावे कसे ? अशा चिंतेत आम्ही तिथून निघालो, तर समोर साक्षात सुधाकर आणि मीना उभी ! नेपल्सच्या विमानतळाकडे येण्याचा रस्ता त्यांनी प्रवाशांच्या खास सोयीसाठी केलेल्या इंग्रजी-इटालियन कोशातून विचारल्यामुळे त्यांना प्रत्येक इटालियन माहितगाराने चुकीच्या रस्त्याला लावले होते; आणि सुमारे दीड-दोनशे मैलांचा हेलपाटा खात-खात शेवटी ते विमानतळावर येऊन पोहोचले होते. मी आपला कोश त्या क्षणी खिशातून काढून जो बॅगेत कोंबला, तो आजतागायत पुन्हा उघडला नाही ! ही इटालियन भाषा तर सतत दादऱ्याच्या ठेक्यात बोलावी लागते. त्या विमानतळावरच्या सूचना ऐकताना तो ठेका माझ्या लक्षात आला होता. आसपासच्या इटालियन कुटुंबांचे सुसंवाददेखील तशाच ठेक्यात चालले होते. त्या भाषेतल्या माधुर्याला ह्या ठेक्याची जोड असल्यामुळे कानांत सारखे 'धाधिन्ना धाधिन्ना धाधिन्ना धाधिन्ना' असे काहीतरी पडल्यासारखे वाटत होते.

सुधाकरने मोटार भाड्याने घेतली होती. पाश्चात्त्य देशात ही एक चांगली सोय आहे. नव्या-कोऱ्या गाड्या प्रवाशांना भाड्याने देणाऱ्या कंपन्या असतात. हव्या तितक्या दिवसांसाठी वापराव्या. जिथे न्यायच्या

असतील, तिथे न्याव्या; त्या गावी त्या कंपनीचे ऑफिस असतेच. तिथे परत कराव्या. म्हणजे सोलापूरला भाड्याने घेतलेली गाडी सोलापुरातच सुपूर्द करायची गरज नाही. नाशकाला नेऊन त्या कंपनीला दिली, तरी चालते ! एकूण किती मैल गाडी फिरवली, याची मीटरवर नोंद असते. खिशात अमेरिकन एक्सप्रेससारख्या कंपनीचे कार्ड असेल, तर पैसेही लगेच टिकविण्याची गरज नाही. गिऱ्हाइकांच्या बँकेच्या खात्यातून परस्पर कापून घेतले जातात. झकास सोय ! फक्त बँकेत भरपूर पैसे असण्याची एक लहानशी अट असते ! तेवढी नसती, तर बरे झाले असते.

आम्ही सोरेंतोच्या रस्त्याला लागलो. एखाद्या गायकाने षड्ज लावून चीजेला तोंड घालावे, आणि पहिल्या मुखड्यातच दाद मिळवून जावी तसे नेपल्स-सोरेंतो रस्त्याने आम्हांला पहिल्या झटक्यात चीत केले ! गर्द रानांनी, मळ्यांनी भरलेल्या डोंगरांतून जाणारे सुंदर रस्ते ! कुठे एखादा परीकथेतल्या किल्ल्यासारखा किल्ला ! मध्येच एखाद्या दाट वृक्षराजीवर डोके काढणारा चर्चचा कळस. टुमदार खेडी. डोक्याला रंगीबेरंगी रुमाल बांधलेल्या चांगल्या गुबगुबीत इटालियन शेतकरी बाया ! सोनेरी केसांना वाऱ्याशी खेळू देत आपल्याच नादात निघालेल्या, यौवनाने मुसमुसलेल्या इटालियन युवती ! त्यांच्याशी थट्टामस्करी करीत जाणारे ते देखणे इटालियन तरुण ! एखाद्या वळणाशी बघावे, तर झाडाच्या गर्द छायेखाली पहुडलेले इटालियन जोडपे ! वारुणी आणि तरुणी हेच ज्यांच्या जीवनातले श्रेयस आणि प्रेयस आहे, ते हे इटालियन लोक ! त्यातूनच त्यांची गाणी उमटली ! चित्र-शिल्प सारे जरी ख्रिस्तार्पणमस्तु केलेले असले तरी प्रथमतः सारे काही इंद्रियांना सुखवणारे ! निसर्गाने तर अनंत हस्तांनी आपले वैभव इथे उधळले आहे. इटालियन लोकांना इतर पाश्चात्य लोक आळशी मानतात ! माणसाला भरपूर आळस उपभोगायला मिळावा, अशी मुळी इथे निसर्गाचीच योजना आहे. इथले द्राक्षांचे मळेदेखील आपल्या इकडच्यासारखे मांडवावर चढलेल्या द्राक्ष-वेलींचे नाहीत ! करवंदीच्या जाळ्यांसारखी द्राक्षवेलींची जाळी ! संस्कृत वाङ्मयात अशोकवृक्षाला सुन्दर तरुणींच्या लत्ताप्रहारानंतर फुले येतात,

अशी कल्पना आहे. इथे तरुणींच्या नाजूक पावलांनी द्राक्षांचे घडच्या-घड तुडवून त्यांचा द्राक्षरस होतो. यौवनाची मस्ती त्या मद्यात मिसळल्या-शिवाय त्या शराबीला कैफ येत नाही! आपल्या खळ्यात बैलांच्या खुरांनी मळणी होते, तशी इटालियन द्राक्षांच्या खळ्यात मळणीला पोरींची पावले लागतात. म्हणजे चांगली दारू व्हायला त्या अंगुरबालांचा पायगुण चांगला असावा लागतो.

एका बाजूला हे डोंगरांच्या उतरणीवरचे हिरवे वृक्षवैभव, तर दुसऱ्या बाजूला सतत साथ देणारा टायरेनियन समुद्र! तिथे छोट्या-छोट्या आगबोटी हौशीमौजी प्रवाशांचे तांडे घेऊन आनंदपर्यटनाला निघालेल्या! चांगल्या ढब्बू आजीबाईपासून गब्दुल नातवंडापर्यंत कुटुंबेच्या-कुटुंबे गात चाललेली! इटालियन माणसाला तरुणी-वारुणींच्या जोडीला गाणी लागतातच! युरोपला ह्याच देशाने गाणे पुरवले. आपल्यापर्यंत इटालीचा इतिहास आला तो ग्यारीबाल्डी, मॅझिनी यांच्या पराक्रमाचा! पण रोझिनी, बेलिनी, वेर्डी, कॅरुसो, बेनियामिनो, गिग्ली, पेगानिनी, वित्राल्डी ह्या संगीतातल्या इटालियन दिग्गजांचे पराक्रम आम्हांला ठाऊकच नाहीत! बाकी अशी हिरवळ आणि असे निळेशार पाणी असल्यावर माणसाला गाणी सुचली नाहीत, तरच नवल! उजव्या बाजूचा तो टायरेनियन समुद्रदेखील काय विलक्षण निळा होता! पण एवढ्या सुंदर वनश्रीत त्या समुद्राला नारळीच्या वनाचा किनारा नसावा, याचे मला वाईट वाटले. दर्याला नारळासारखा सोबती नाही. ती मजा कोकणात किंवा केरळात. पण आपल्या देशातल्या साऱ्या निसर्गसौंदर्याला माणसांची गरिबी भयानक छेद देऊन जाते. इटली हा काही अतिश्रीमंत देश नाही. पण मला कुठेही हीन-दीन, अस्थिपंजर झालेली माणसे आढळली नाहीत! 'कशाला उद्याची बात' म्हणत जगणाऱ्यांचा उत्साह ह्या लोकांच्या अंगातून ओसंडत असतो.

त्या डोंगरांतून, दर्याच्या साक्षीने वळण घेत घेत आम्ही एका छोट्याशा गावात येऊन पोहोचलो. दाबून भुका लागल्या होत्या. नाक्यावरच हॉटेलची पाटी दिसली. एका गर्द उद्यानात टुमदार बंगली

होती. बंगलीसमोर गाडी नेली आणि एक अक्खेच्या अक्खे इटालियन कुटुंब आमच्यातल्या स्त्रीवर्गाच्या साड्या बघून कुतूहलाने स्वागताला बाहेर आले. तशी दुपारच्या जेवणाची ऑफिशियल वेळ टळून गेली होती. इंग्लंडमध्ये लंच टाइम संपल्याचा बोर्डच बाहेर लटकला असता. इटाली उगीचच वेळेची वगैरे पाबंदी मानीत नाही. उद्यानातच टेबले मांडली होती. तिथून डोंगराखाली पसरलेल्या उपसागराचा देखावाही दिसत होता ! पोटात अशी भूक. जेवणाची अशी सुंदर जागा. स्वागताला असे हसरे कुटुंब ! इथेही पुन्हा एक नाही तर चांगल्या दोन-तीन निळ्या-निळ्या डोळ्यांच्या तरुणी ! त्यांतल्या एकीला थोडेफार इंग्रजी येत होते. आम्ही टेबलाशी बसून मेनू पाहू लागलो. फार वर्षांपूर्वी मी इटालियन बोटीतून प्रवास केल्यामुळे मला पिझ्झा, स्पॅघेटी वगैरे इटालियन इडली-डोशांची नावे आठवत होती. विशेषतः आपल्याकडे जसे भाताचेच वांगीभातापासून कोंबडीच्या पुलावापर्यंत अनंत प्रकार, तसेच इटलीत एका शेवयीला असंख्य लांबीरुंदीतून पिळून काढून नाना प्रकारच्या सॉसेसमध्ये लोळवलेले असते ! त्या शेवयीची लांबी अखंड सत्तर-ऐंशी फूट झाली, आणि बशीवर टॉमेटो सॉसमध्ये जराशी भिजून आली की, स्पाघेटी ! ती अलगदपणे काट्यावर गुंडाळून खायची ! जिथे साध्या चमचा-लिंबू शर्यतीत लिंबूच नव्हे, तर चमचाही पडायचा, तिथे हातातल्या काट्यावर ती स्पॅघेटीची सुतळी गुंडाळीत तोंडापर्यंत नेणे कर्म कठीण. त्याच स्पॅघेटीला जरा अधिक हडकुळी केली की, मॅकेरोनी, चपटी केली की टॅग्लियाटेल, आणि मग आकार आणि लांबीच्या भिन्नत्वाप्रमाणे टॉर्टेलिनी, ॲग्नेलोटी, कॅनेलोनी, रेव्हिओली अशा नाना अवतारांत तिचे दर्शन होते ! 'एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति' म्हणजे काय, ते एकाच शेवयीची ही नाना स्वरूपे पाहिल्यावर कळते ! पण माझ्या सुदैवाने हे हॉटेल समुद्रभाजीचे नाना प्रकार देणारे निघाले. शेवटी आम्ही त्या-त्या पदार्थांपुढच्या लिरांचा हिशोब करून ऑर्डर दिली. इटालियन पैशाचा व्यवहार हा हजारांच्या भाषेतच होतो. उद्या 'दहा रुपये द्या,' म्हणण्याऐवजी 'हजार पैसे द्या,' म्हटले. तर

आपल्याला कसे वाटेल ? पण इटालियनांना मोठ्या आकड्यांचे आकर्षण अधिक असावे !

हां हां म्हणता आमचे टेबल सुंदर रीतीने सजवलेल्या पदार्थांनी भरून गेले. समुद्रभाजीत तर देवदुर्लभ शिंपले होते. गच्च भरलेल्या कुल्र्या होत्या. कालवे होती आणि ऑक्टोपस होता. मी ऑक्टोपसचे यापूर्वी चित्र पाहिले होते. हा प्राणी भयंकर असतो, वगैरे वाचले होते. पण तो इतका चवदार असतो, हे त्या दिवशी कळले ! प्रवासात ज्ञान मिळते म्हणतात ते असे ! ( तसे मला एकदा पुणे-सोलापूर वाटेवरच्या एका हाटेलात ' गरम काय आहे ? ' असे विचारल्यावर ' सोडा ' असे उत्तर मिळाले होते ! त्यावरून लोक गरम सोडाही पितात, हे ज्ञान मिळाले ! मी ' थंड काय आहे ? ' हे विचारले नाही. कारण ' भजी ' हे उत्तर निश्चित होते. समोरच्या एका थाळ्यात भज्यांची थंड कलेवरे दिसतच होती. ) तेवढ्यात इटालियन तिसऱ्यांची ( ज्यांना अभागी शाकाहारी समाज शिंपले म्हणतो ! ) थाळी भरून आली. तिसऱ्यांची एकशिपी मला अतोनात प्रिय आहे. एकशिपी म्हणजे काय, ते कळायला आणि भोगायला रत्नागिरी ते कारवार ह्या पट्ट्यातल्या मत्स्यगोत्री कुळातच जन्म घ्यायला हवा ! खाद्यपदार्थांचे अर्थ कोशात सापडत नसतात. ते खवैय्याच्या जिभेवर लिहिले जातात ! ही एकशिपी नव्हती. तिसऱ्यांच्या शिंपा जराशा उकळलेल्या होत्या. त्या तिसऱ्याही कशा काळ्याभोर होत्या. आपल्या इकडल्या तिसऱ्या इतक्या काळ्या काचेसारख्या नसतात. नाना प्रकारच्या मत्स्यकुळातल्या मंडळींचे आमच्या थाळीत नुसते संमेलन भरले होते. ते दृश्य पाहूनच पोट निवले ! जोडीला तरुणीच्या पदस्पर्शाने लाजलेली ती आरक्त वारुणी ! असल्या भोजनानंतर मला भर मे महिन्यातल्या पुणे–सोलापूर रस्त्यावरची वैराण वाटचालदेखील निसर्ग-वैभवाने नटल्यासारखी दिसली असती.

एखाद्या मस्त गझलच्या शेवटच्या दिलचस्प चरणावर येऊन पोहोचल्यासारखे आम्ही त्या सोरेंतो गावात येऊन पोहोचलो. पार्को द प्रिनचिपी ( म्हणजे रायबाग ) नावाच्या एका जुन्या प्रासादातल्या

हॉटेलमध्ये सुधाकरने व्यवस्था केली होती. तिसऱ्या मजल्यावरच्या खोलीतल्या गॅलरीतून बाहेर पाहिले, आणि समोर नेपल्सचा उपसागर पसरलेला दिसला ! सोरेंतो हे डोंगरमाळेच्या पश्चिमाभिमुख अर्धचंद्राकार कड्यावर वसलेले गाव आहे. कड्याच्या पायथ्याला समुद्राच्या लाटा येऊन भेटत असतात. चिमुकले चिमुकले किनारे. देशोदेशीच्या प्रवाशांचे थवे जलक्रीडा करीत होते. नेपल्सच्या त्या संथ उपसागरावर सर्फ रायडिंग चालले होते. जलाशयावरून अधांतरी चार-पाच फुटांच्या अंतरावरून उडणाऱ्या हॉवरक्रॅफ्ट म्हणतात, त्या नौका भिरभिरत होत्या. डाव्या बाजूला सोरेंतोचे टुमदार बंदर ! त्या कड्याला बिलगलेले धनिकांचे नवे जुने प्रासाद होते. खोलीतदेखील त्या समुद्राच्या आणि आकाशाच्या निळेपणाशी संगती साधणारे निळ्याच्या सगळ्या छटांचे फर्निचर आणि त्यावरची वस्त्राच्छादने होती. पाणी पिण्याच्या सुरया आणि फुलदाण्या-देखील अस्मानी छटेच्या ! समोरच्या निळ्या उपसागरातच दूर ते नीलिम्याचे अपार वैभव दाखवणारे काप्रीचे बेट होते. त्या गॅलरीतून उजव्या डाव्या बाजूने नेपल्सच्या उपसागराला वेढेत घेणारी भूशिरे दिसत होती ! पोट तृप्त होते. डोळे तृप्त होते. आता कानांना मात्र संध्याकाळच्या रागांची भूक लागली होती ! त्या गॅलरीतून समोरचे ते सूर्यास्ताचे अपूर्व दृश्य पाहताना जर चांगला पूरियाधनाश्री ऐकायला मिळता, तर न जाणो आनंदाने कोंदल्यामुळे तिथे माझ्या प्राणांनी कुडीचा शेवटला निरोप घेतला असता ! त्या निळ्या उपसागराला मावळत्या सूर्याने सोन्यात रंगवलेली पश्चिम दिशा आता आपले वैभव दाखवू लागली होती ! पाहता-पाहता ते सुवर्णवैभव मावळले. पुन्हा एकदा नीला-काशात चांदण्या आपल्या निळ्या ज्योतींची आरास मांडू लागल्या. त्या चंद्राकार कड्यावर विजेच्या बत्त्यांनी चमचमायला सुरुवात केली, आणि दूरवरच्या खुल्या मद्यालयाच्या दिशेने वाऱ्याच्या झुळुकीसारखे व्हॉय-लिन्सचे सूर येऊ लागले. पूरियाधनाश्री नाही तर नाही, पण पश्चिमी संगीताने आपले सौम्य रंग भरायला सुरुवात केली. आता कधी एकदा काप्रीला जाऊन पाणी आणि प्रकाश यांनी मांडलेला तो निळ्याचा

सोहळा पाहतो, असे झाले होते.

सकाळच्या सूर्यकिरणांनी पाण्याशी मांडलेला तो खेळ असल्यामुळे तिथे वेळेत जाऊन पोहोचायला हवे होते. म्हणून न्याहरी-बिहिरी लवकर आटपली. युरोपात इंग्लंडसारखे न्याहरीचे फारसे कौतुक नाही. इंग्रजांची न्याहरी अंडी-बेकन वगैरेंशिवाय पुरी होत नाही. कॉन्टिनेण्टल ब्रेकफास्ट म्हणजे चहा-कॉफी आणि पावलोणी. एखादे बिस्किट ! युरोपियनांचा जोर दुपारच्या जेवणावर ! आम्ही सोरेंतो बंदरावर पोहोचलो. सोरेंतोत हिंडायला मोटारीपेक्षा घोड्यांच्या बग्याच चांगल्या. भुर्रकन इकडून तिकडे जायचे हे गाव नव्हे ! घोडागाडीचे टप उघडे टाकून टपक टपक करीत आजूबाजूच्या बंगल्यांची आणि बंगल्यापुढच्या बागांची शोभा पाहत जायचे ! साऱ्या जगाच्या कोनाकोपऱ्यातून येणाऱ्या प्रवाशांशी सतत संबंध येत असल्यामुळे इथले बग्गीवालेदेखील तुमची तबियत गाणी-बिणी म्हणून बहेलावीत असतात ! मधूनच एखादा गमतीदार किस्सा सांगतात ! आम्ही भारतीय हे कळल्यावर एका इटालियन बग्गीवाल्याने गेल्या युद्धात आपण भारतात युद्धकैदी असल्याचे सांगून '---नमस्ते' वगैरे म्हणून दाखवले ! बंदरावर काप्री बेटाकडे जाणारी मध्यम आकाराची आगबोट होती. हवेत सुंदर गारवा होता. युरोपीय प्रवासी स्त्रीपुरुष एकमेकांच्या कमरेभोवती विळखे घालून त्या गारव्याचे सुख भोगीत चालले होते. आम्ही प्रभुरामचंद्र असल्यासारखे सीतामायांना आमच्या मागून चालवीत निघालो होतो. युरोपात गेलो, तरी आम्ही तेलाने भरलेले पातेले घेऊन चालल्यासारखे भारतीय संस्कृती जपत-जपत जायचे ! कशी सुरेल सकाळ होती ! सहप्रवाशांच्या गळ्यातून सहज गाणी उमलत होती. तरुण-तरुणींचे तांडे गळ्यात गळा मिळवून आणि घालून गात-गात निघाले होते. आजीबाई आणि आजोबादेखील त्या तालावर माना डोलावीत होते. त्यांच्या वृद्ध डोळ्यांतून गाणाऱ्या तरुण-तरुणींबद्दलचे कौतुक सांडत होते ! त्या तरुणींनी तर इटलीच्या सूर्याने सर्वांगाला स्पर्श करावा, असे आव्हान देणारा किमानवेष चढवला होता ! फक्त डोळ्यांतल्या निळेपणाला दृष्ट

लागू नये, म्हणून भल्या मोठ्या गोगो गॉगल्सनी डोळे झाकले होते.

उपसागराचे पाणी कापीत बोट निघाली. सोरेंटोचा किनारा पाहता-पाहता दूर गेला. बोटीला भले मोठे फेसाळ पाण्याचे शेपूट चिकटले. आमच्या बोटीसारख्या इतरही बोटी निघाल्या होत्या. इकडल्या डेकवरच्या गाण्यांना तिकडल्या डेकवरची मंडळी प्रतिसाद देत होती. परिचयाचा उपचार गळून पडला होता. नुसत्या हास्याच्या देवघेवीत मंडळी एक झाली होती ! तुम्ही-कुठले-आम्ही-कुठलेच्या गप्पा सहजपणे सुरू झाल्या होत्या ! तास दीड तासानंतर काप्रीच्या धक्क्याला आमची बोट लागली. हे बेट म्हणजे एक चिमुकल्या डोंगराची त्या उपसागरात ठेवलेली सोंगटीच आहे ! विश्वकर्म्याने आपल्या खात्यातल्या चतुरातल्या चतुर कारागिराकडून हे बेट घडवले असावे ! त्याला पुन्हा अत्यंत प्रतिभासंपन्न स्थापत्यकारांनी आणखी नटवले आहे. निसर्गदत्त उंची-खोलीचा अतिशय कलात्मक उपयोग करून रचलेले हे टुमदार शहर आहे. एखाद्या इटालियन संगीत-नाटकातल्या सीनमधून हिंडावे असे ह्या काप्रीतून हिंडताना वाटते असे कुणीसे म्हटले आहे, ते अगदी खरे आहे. इथे चित्रकारांचे कुंचले उचंबळून येतात. वादकांची वाद्ये आपण होऊन झंकारू लागतात आणि कवींची गीते त्यांच्या नकळत फुलून येतात. वळणावळणाला सुंदर चौक, त्याभोवती पांढरी-शुभ्र टुमदार घरे, त्यांचे पाठीराखे असणारे उंच वृक्ष आणि त्या घरांच्या अंगाखांद्यावर खेळणाऱ्या फुलवंती वेली ! मधूनच थुईथुई उडणारी पाण्याची कारंजी. एखाद्या दाराशी कुठल्यातरी भाग्यवंताची वाट पाहत उभी राहिलेली इटालियन तरुणी ! लिओनार्दोच्या किंवा मायकेल एंजेलोच्या चित्रातून उतरून आल्यासारखी ! चौदाव्या शतकापासून आधुनिक काळापर्यंतचे स्थापत्य-कौशल्य इथे निर्मात्यांची प्रतिभा काय होती, ते सांगत उभे आहे. काप्रीत जगायचा एकच नियम : ' तुम्हांला हवे तसे हे सौंदर्य उपभोगा. ' कुणी तिथल्या स्थापत्यातले सौंदर्य टिपावे, कुणी ते रंगवैभव रेखाटावे, कुणी आइल ऑफ काप्रीच्या दर्शनातून स्फुरलेली गीते गावी, पण सर्वांनी कैफ चढवून घ्यावा तो काप्रीला वेढणाऱ्या समुद्रातल्या निळ्या रंगाचा !

इतके नितळ पाणी मी फक्त सिंहगडच्या देवटाक्याचे पाहिले होते. पण समुद्राचा तळ दिसावा असे नितळ पाणी आणि त्या पाण्याचा नीलिमा मी काप्रीत पाहिला. आनंदाच्या अश्रूंनी डबडबलेल्या निळ्या डोळ्यांची क्षणाक्षणाला आठवण व्हावी, असे हे पाणी ! ते पाणी त्या डोळ्यांसारखे आपल्याला कसली तरी कहाणी सांगायला उत्सुक असल्यासारखे वाटत होते. त्या पाण्याने कसले तरी रहस्य दडवलेले होते आणि ते रहस्य एके दिवशी कुण्या एका नावाड्याला अचानक त्या ब्लू ग्रॉटोत म्हणजे नीलकुहरात गवसले.

त्या नीलकुहराच्या दिशेने दुसऱ्या एका लहानशा लाँचमधून आम्ही निघालो. पारदर्शक निळ्या शाईच्या दर्यातून लाँच निघाल्यासारखे वाटत होते. अशा खूप लाँचेस त्या कुहराच्या दिशेला निघाल्या होत्या. काप्री बेटाला प्रदक्षिणा घालीत-घालीत आम्ही एका ठिकाणी आलो. तिथे लाँचेसची आणि चिमुकल्या होडक्यांची झिम्मड उडाली होती. एका वेळी एकच होडी त्या गुहेच्या तोंडातून शिरते. इथे आम्हाला लाँचमधून एका होडक्यात जावे लागले. इटालियन नावाडी कौशल्याने त्या क्यूमध्ये नंबर धरीत होते. मोठमोठ्याने एकमेकांशी बोलत होते. भांडतही होते. थट्टाविनोदही चालला असावा. कारण मधूनमधून नावाड्या-नावाड्यांच्या बोलण्यातून हशाही पिकत होता. देवाच्या गाभाऱ्याशी गर्दी जमावी, तशी त्या गुहेच्या तोंडाशी ही होडकी जमली होती. तिथे लाटांचा नाचदेखील जोरात असल्यामुळे होडकी चांगलीच हिंदकळत होती. अर्ध्या-पाऊण तासाने आमचा नंबर लागला. आमच्या नावाड्याने गुहेत होडी शिरताना आत सपाट आडवे होण्याची सूचना दिली. आम्ही त्या होडक्यात मुंड्या दबवून आडवे झालो. त्या गुहेच्या तोंडातून होडी आत गेली. नावाडी म्हणाला, 'नाऊ लुक'. आम्ही डोकी वर काढली, आणि जे पाहिले ते सत्यात आलेले स्वप्न म्हणावे, तर असले स्वप्नही पडण्याचे भाग्य ह्यापूर्वी लाभले नव्हते.

दीडशे फूट लांब, पन्नास-एक फूट रुंद आणि शंभर-एक फूट उंच अशी ती गुहा होती. खाली पाणी. ते पन्नास फूट खोल आहे असे

नावाडी म्हणाला. समुद्रातून हे पाणी त्या गुहेत आले आहे. त्या गुहेला एक होडके जेमतेम घुसेल अशी दोन्ही बाजूला दोन देवड्यांसारखी दारे, आणि त्यांतून शिरणाऱ्या सूर्यप्रकाशामुळे घडलेला तो एक अपूर्व चमत्कार! ते पाणी म्हणजे साक्षात वितळलेला निळा प्रकाश होता. प्रकाशाचे पाणी झाले होते. त्या पाण्यात हात घातला की हाताला रुपेरी झालर लागल्यासारखी वाटते. त्या निळ्यांतली ती चंदेरी झळाळी तर अपूर्व. असा नीलिमाच नव्हे, तर अशी शीतल पण तेजःपुंज शुभ्रताही मी पाहिली नव्हती. निळ्याच्या पार्श्वभूमीवरच्या शुभ्रतेच्या त्या अननुभूत प्रत्ययामुळे चटकन मला 'शान्ताकारं भुजगशयनम्' मधल्या 'मेघवर्णम् शुभाङ्गम्' ह्या वरपांगी विरोधी वाटणाऱ्या वर्णनातले रहस्य उलगडले. सूर्यप्रकाश त्या पाण्यात म्हणे तळापासून शिरतो. परावर्तित प्रकाशाची ही किमया आहे, असेही म्हणतात. मला त्या विज्ञानाशी सोयरसुतक नव्हते. निळ्या प्रकाशाची असली कोवळीकही मी यापूर्वी कधीही पाहिली नव्हती. एखाद्या रोपाला पहिला कोंब फुटताना जो रंगाचा कोवळेपणा असतो, तसला तो कोवळेपणा होता. मागे होडक्यांची रीघ लागली होती. त्यामुळे त्या कुहरात चार-पाच मिनिटांहून अधिक वेळ होडी थांबवणे शक्य नव्हते. आधाशासारखे ते दृश्य आम्ही पिऊन घेतले. गुहेच्या दुसऱ्या दारातून आमची होडी बाहेर पडली. त्या नीलवर्णाचे अंतर्बाह्य स्नान घडले होते. कृतकृत्य मनाने आम्ही काप्रीच्या दिशेला लागलो. त्या गुहेकडे येताना आजवर वाचलेल्या वर्णनातून तिथल्या अनुभवाविषयी मनात काही कल्पना होत्या. पण प्रत्यक्ष अनुभवाने त्या कल्पनांना थिटे करून टाकले होते. आत दाटलेल्या अनुभवांना मनातून मोकळे करणाऱ्या शब्दांचेच नव्हे, तर रंग-रेषा-नाद-स्वर सगळ्याच माध्यमांचे थिटेपण जाणवून देणारा असा त्या कुहरातला तो अलौकिक अनुभव!

इटलीच्या मातीवर पाय टेवण्याआधीच निळाईने माझ्या मनाचा ठाव घेतला होता. पण त्या निळाईची ही परमसुंदर गर्भकुडी होती. दुनियेतल्या नीलवर्णाच्या गाभाऱ्यात जाऊन निराकार नीलस्वरूपाचे दर्शन घेऊन आम्ही परतत होतो! गाभाऱ्यात धूप कोंदावा, तसा तिथे

निळा प्रकाश कोंदला होता. समाधिसुख भोगणाऱ्यांना शेवटी मिटल्या डोळ्यांपुढे प्रकाश दिसतो, म्हणतात. त्या प्रकाशाची कोवळी झळाळी मला याचि देहीं याचि डोळां अनुभवायला मिळाली होती. ज्ञानेश्वरांनी वर्णिलेला कोटिचंद्रप्रकाश असाच निळा आणि शीतल असणार! त्या घननील स्वरूपालाच त्यांनी 'कृष्णा हाल का रे डोल का रे गुज बोल का रे' अशी आर्जवी हाक घातली होती. का कोण जाणे, मला त्या कुहरात नीलवर्णाचा नवलनयनोत्सव पाहताना तोच अभंग गुणगुणावासा वाटू लागले. आमच्या परतीच्या प्रवासात इतर युरोपीय प्रवाशांदेखत 'तुझिये निटिली कोटी चंद्र प्रकाश, कमलनयन हरीचे वदन भासे—' हे गाताना मला यत्किंचितही संकोच वाटत नव्हता. कारण त्या अनुभवातून न्हाऊन आलेले ते युरोपीय सहप्रवासीदेखील कसल्याशा अलौकिकाच्या जाणिवेने आता गुंगीत गेल्यासारखे शांत झाले होते. अथांग सागर, हिम-चर्चित गिरीशिखर—ह्यांसारख्या निसर्गाच्या विराट स्वरूपाने मनुष्य अवाक होतो. पण ह्या चिमुकल्या गुहेतल्या ह्या निसर्गचमत्काराने कुठल्याही वारुणीने कधीही लाभली नसेल, अशी धुंदी आणली होती. त्या निळाईने सगळ्यांनाच एका अलौकिक आनंदाने भिजवून चिंब केले होते.

आता माथ्यावरच्या निळ्या आकाशाला मी मोठ्या अभिमानाने सांगतो की, तुझ्या निळाईचा अर्थ सांगणाऱ्या त्या नीलकुहरातल्या पाण्याला मी भेटून आलो आहे!

## फ्लोरेन्स आणि आद्य शंकराचार्य

मी शांतिनिकेतनात असताना रूगेरो लोरिया नावाच्या एका इटालियन तरुणाशी शर्वरी रायचौधुरी ह्या माझ्या शिल्पकार-मित्राने ओळख करून दिली होती. शर्वरीबाबू शिल्पकलेच्या शिक्षणासाठी इटालीत होते. त्यामुळे त्यांना इटालियन भाषेत बोलता येते. शर्वरीच्या कुटीरात आमची गाण्याबजावण्याची मैफल चालत असे. तिथे बेल-बागेतल्या पुराणाला जाणाऱ्या भाविकांसारखा हा रूगेरो नित्यनेमाने हजेरी लावायचा. रूगेरोला जितके भारतीय संगीत कळते, तितकेच मला इटालियन कळते. तरीही मी त्याला आणि शर्वरीला इटालियन भाषेत *एकमेकांशी बोलायला लावीत असे. त्या भाषेतला नाद आणि ताल* संगीतासारखाच आहे. वाक्यावाक्यात मृणालिनी – कमलिनी – कादंबिनी – सुहासिनी अशी कुणीतरी नीकारान्त सुंदरी दडल्यासारखी वाटायची. पुन्हा त्या लिनीचा ली ऽ नी अशा हेलकाव्याने उच्चार! इटालियन भाषेत मला वाटते, ली ऽ नी – गी ऽ नी – टी ऽ नी – झी ऽ नी अशी शेकडो यमके जुळतील असे शब्द असावेत. मुसोलिनी – म्याझ्झीनी –

पेगानीनी.... असे. ' लहान मूल ' या अर्थी प्रत्येक भाषेत लाडके-लाडके शब्द आहेत. बहुतेक ' ब '-काराने सुरू होणारे — बेबी, बाबू, बाल, बच्चा, बेटा — पण इटालियन ' बांबी ऽ नो 'ची सर बाबू-बाळूला नाही ! पुन्हा बांबी ऽ नो म्हणताना त्या बी-वर सुरेख हेलकावा. संगीताची भाषा म्हणून युरोपने इटालियनचा स्वीकार केला, तो काही उगीच नाही. सगळे उत्तमोत्तम ऑपेरे इटालियनमध्ये. उत्तम ऑपेरा गायक-गायिका इटालियन. श्रेष्ठ संगीतनिर्देशक इटालियन. इतकेच नव्हे, तर युरोपीय संगीत-शास्त्रातले पारिभाषिक शब्दही इटालियन. रूगेरो फ्लोरेन्सचा राहणारा. आणि फ्लोरेन्सची इटालियन भाषा ही सगळ्यांत शुद्ध मानली जाते. त्यामुळे ' फ्लोरेन्स पाहा ' असा त्याचा आग्रह असायचा. रूगेरो फ्लोरेन्सला ' फिरेंझ ' म्हणायचा. ' फ्लोरेन्स ' हा इंग्रजी उच्चार ! मला वाटते, इंग्रजांनी जगातल्या अनेक शहरांची नावे आपल्या जिभेला मानवतील तशी बदलली. ' पारी 'चे पॅरिस् केले. त्याचा बदला म्हणून फ्रेंचांनी ' लंडन'चे ' लॉन्द्र ' की कायसेसे केले आहे. साहेबाने ' रोमा'चे ' रोम ' ' नापोली 'चे ' नेपल्स ', ' व्हेनेझिया 'चे ' व्हेनीस् ' केले, तसे ' फिरेंझ 'चे ' फ्लोरेन्स ' केले. तसे आपणही साहेबाच्या ' स्टुअर्ट 'चा ' इष्टुर ', ' रिक्रूट 'चा ' रंगरूट ', ' बटलर 'चा ' बुटलेर ' वगैरे करून सूड घेतला आहे म्हणा. मी इटलीला जायचा बेत ठरल्यावर रूगेरो आणि शर्वरीला कळवले. शर्वरीने फ्लोरेन्समधल्या त्याच्या परिचयाच्या एका इटालियन माणसाचे नाव आणि पत्ताही कळवला. आणि त्याच्या घरी भारतीय संगीताच्या ध्वनिमुद्रिकांचा चांगला संग्रह असल्याचेही लिहिले.

आतापर्यंतचे इटलीतले भ्रमण विमानातून किंवा मोटारीने चालले होते. त्यामुळे इटालियन मंडळींशी बोलायला तर जाऊ दे, पण त्यांचे बोलणे ऐकायचाही योग येत नव्हता. हॉटेलातले मॅनेजर इटालियन उच्चारातले इंग्रजी बोलत. फक्त बिलाच्या बेरजांत भरमसाट चुका केलेल्या निदर्शनाला आणल्या, की जणू काय आपल्याला एकही इंग्रजी अक्षर कळत नसल्याचा आव आणीत ! पैशाच्या फसवणुकीच्या बाबतीत

इटालियन लोक उच्च शिक्षणासाठी आपल्या देशात येतात, की आपले दुकानदार, टॅक्सीवाले वगैरे इटलीत जाऊन त्या विद्येत तरबेज होतात, हे सांगणे अवघड आहे. त्यातून विमान सुटायची वेळ होत आलेली असायची. त्यामुळे बिलातल्या चुकांविषयीची हुज्जत घालीत बसायला वेळ नसायचा.

रोमहून फ्लोरेन्सला विमानाने न जाता आगगाडीने जायचे ठरवले. शिटा आधीच रिझर्वड केल्या होत्या. गाडी खचाखच भरली होती. आमच्या रिझर्वड जागांवर येऊन लोक बसले होते. शेवटी रीतसर कंडक्टरला बोलावले. मग त्यांची आणि रेल्वेवाल्यांची झकापक वगैरे इटालियन भाषेतली एक एकांकिका झाली. आणि आम्ही डब्यात सुप्रतिष्ठितमस्तु म्हणत आपापल्या जागांवर टेकलो. जुन्या डेक्कन् क्वीन-मध्ये असायचा, तसा कंपार्टमेंट होता. समोर एक दोन इटालियन पोरी होत्या. त्या आमच्याकडे कुतूहलाने पाहत होत्या. भाषेची अडचण होती. पण त्यांतल्या एकीला पंचवीस इंग्लिश शब्द येत होते. सुट्यांचा मोसम असल्यामुळे सगळी मंडळी हौसेमौजेच्या मूडमध्ये होती. त्यामुळे गप्पा-गोष्टींना ऊत आला होता. ' घ्या, किती इटालियन ऐकायचे ते ! ' म्हणत इटालियन भाषा कानांवर पडत होती. त्याच्या जोडीला युरोपीय भाषांना अत्यंत आवश्यक असे खांदे उडवणे वगैरे चालू होतेच. आगगाडीतले प्रवासी विमानातल्या प्रवाशांसारखे मक्खपणाने कधी प्रवास करीत नाहीत. यच्चयावत् उडाऊ लोकांची गैरसोयच झाली पाहिजे, अशा प्रतिज्ञेने बनवलेल्या त्या खुर्चीत बसून विमानाने प्रवास करायचा, मला वाटते, सगळ्यांनाच पुढेपुढे कंटाळा येत असावा. आगगाडीत गप्पागोष्टी सहजपणाने सुरू होतात. बाजूचा नसला, तर समोरचा माणूस बोलका निघतो. विमानात सगळेच बडे ! आणि अबोल मक्खपणा हे श्रीमंतीचे व्यवच्छेदक लक्षण आहे. विमानात बोलका सहप्रवासी लाभायला आकाशातले ताराबळ-चंद्रबळ वगैरे लागत असावे. त्या इटालियन आगगाडीचा डबा जरी झकपक असला, तरी वातावरण महालक्ष्मी एक्स्प्रेसचेच होते. त्या लोकांच्या गप्पागोष्टींची भाषा कळत नव्हती पण

मात्र कळत होता. त्या भाषेचे संगीत ऐकत आणि खिडकीबाहेरच्या गर्द राया, हिरवळी, नाना जलाशय, तुटुंब भरून वाहणाऱ्या नद्या, फुलांचे बगीचे, द्राक्षांचे मळे, मधूनच डोकावणारी खेडी, डोंगरांच्या अंगावर शुभ्र भस्माचे पट्टे ओढल्यासारखे जाणारे ते पांढरेधोप हायवेज् हे सारेच पाहत पाहत तो पाच सहा तासांचा प्रवास केव्हा संपला ते कळले नाही! शिवाय, नाना प्रकारच्या खाद्यपेयांनी भरलेली चिमुकली ढकलगाडी कॉरिडॉरमधून फिरत होतीच. त्यामुळे तसे नाही, तर असे तोंड चालू होते.

फ्लोरेन्स स्टेशनावर उतरल्यावर तशी थोडीशी निराशा झाली. बडोद्याच्या स्टेशनाबाहेरचा देखावाही माणसांचे वर्ण आणि पोशाख वगळले, तर याहून फारसा निराळा नाही. पण टॅक्सीने एक दोन वळणे काढली आणि फ्लोरेन्सचे वैभव दिसायला लागले.

जुन्या इटालियन शहरांच्या टुमदारपणावर आकाशाला भोक पाडायला निघालेल्या सत्तरऐंशी-मजली इमारतींना कुरघोडी करू दिलेली नाही! फार तर तिमजली उंचीची घरे! नव्या भरमसाट उंच इमारतींची सोय मूळ नगरीपासून दूर अशा नव्या वस्त्या वसवून केली आहे. जुन्या नगरीला ओशाळवाणे करून टाकलेले नाही. प्राचीन चर्चेस् आणि कॅथीड्रलचे कळस आपली उंची टिकवून आहेत. उगीचच शेजारच्या सत्तर-मजली इमारतीने त्यांना ठेंगू करून टाकले नाही. फ्लोरेन्स बुद्रुक आणि फ्लोरेन्स खुर्द स्वतंत्रपणाने उभी आहेत. रस्तारुंदीच्या नावाखाली इतिहासाला जमीनदोस्त केले नाही. जुने गल्ली-बोळ जुन्या इमारतींमधूनच अंग चोरून वळणे घेत असतात. मोटारींची वाहतूक इतकी वाढली, तरी रहदारीचे नियंत्रण कसोशीने संभाळले आहे. इथे सगळ्यांत जास्त वेळा मी वाचलेला बोर्ड म्हणजे 'सेन्सो युनिको'—म्हणजे एकेरी वाहतूक! त्यामुळे मोटारींना बरीच सव्यापसव्ये करावी लागतात. पण इटालियनांना अमेरिकनांसारखी भरमसाट लांबीच्या मोटारींची हौस नाही. त्यामुळे त्यांच्या त्या अटकर बांध्याच्या फियाट गाड्या त्या एकेरी बोळांतून सुळकन जाऊ शकतात. आणि मन मानेल त्या ठिकाणी गाडी पार्क

करण्याला कडक मनाई असल्यामुळे बोळ मोकळे राहतात. खिडक्यांचा उपयोग वारा-उजेड यावा, यासाठी असतो. आपल्यासारखी पानतंबाखूच्या पिचकाऱ्या, केसांचे गुंते आणि इतर केरकचरा टाकण्याची सोय ही खिडकीविषयक कल्पना नाही ! इटालियन लोक स्वच्छतेच्या बाबतीत असेतसेच आहेत, अशी माझी अमेरिकन चित्रपटातील इटली पाहून कल्पना झाली होती. ती फोल ठरली.

हे फ्लोरेन्स शहर कसे टापटिपीने प्रदर्शनात मांडून ठेवलेल्या कलाकृतीसारखे आहे. हे रसिकांचे आणि कलावन्तांचे गाव. एवढ्याशा त्या गावात डझनभर वस्तुसंग्रहालये आणि कलादालने आहेत. उत्तमोत्तम ग्रंथसंग्रहालये आहेत. नाना आकारांची उद्याने, असामान्य स्थापत्य-विशारदांचे प्रतिभावैभव दाखवीत ही नगरी उभी आहे. चित्रकलेत तर फ्लोरेण्टाइन् घराणे आहे. इटालियन महाकवी दान्ते ह्याच रम्य नगरीत मठप्रमुख होता, आणि इटालियन भाषेला आपल्या प्रतिभेचा साज चढवीत होता. इटालियन् चाणक्य माकिव्हेली ह्याच फ्लोरेन्समध्ये राहून राजकारणातल्या कुटिलनीतीचे पाठ देत होता. एकोणीसशे सहासष्ट साली म्हणजे सहा वर्षांपूर्वीच अतिवृष्टीच्या आणि महापुराच्या भीषण तडाख्यात ही नगरी सापडली. एरवी संथपणाने वाहणारी आर्नो नदी भयंकर भडकली आणि सारे फ्लोरेन्स् बुडून जाते की काय, अशी परिस्थिती निर्माण झाली. त्या महापुरात ह्या कलानगरीतले वैभव नष्ट होऊ नये, म्हणून नागरिकांनी प्राण पणाला लावले. आज त्या पुराची कुठेही काही खूण नाही. उलट त्या आपत्तीतून जे वाचून उरले आहे, ते देखील इतके आहे की, याहून आणखी कोणते ऐश्वर्य होते, याची कल्पनाही करवत नाही.

कलेची उपासना हा इथल्या लोकांनी शतकानुशतके संभाळून वाढीला लावलेला वारसा आहे. जीवनाच्या साऱ्या आकर्षक रंगांत रंगणाऱ्या ह्या लोकांनी आपली कला अनेक प्रकारच्या विरोधातून टिकवली आहे. पंधराव्या शतकात साव्होनारोला नावाच्या डॉमिनिक पंथाच्या खिस्ती मठाधिपतीने ह्या साऱ्या कलांच्या उपासनांविरुद्ध फतवा

काढला. कलावंत धर्म-नीती-संस्कृती बुडवून पापाची धन करतात, असा जोरदार प्रचार सुरू केला. असले संस्कृतिसंरक्षक अब्रह्मण्यम् करीत आपल्याच देशात उपटतात, असे नाही. साथीच्या रोगासारखी ह्या रोगाची लागण सगळ्या देशांत होत आली आहे. मुसलमान मुल्ला-मौलवींनी आपल्या देशातल्या मंदिरांचे शिल्प तोडले आहे. आपण बुद्ध-मंदिरे तोडली आहेत. शैवांनी वैष्णवांविरुद्ध, वैष्णवांनी शैवांविरुद्ध झगडे करतानाही सुंदर शिल्पांची नासधूस केली आहे. मठाचे आचार्य भडकले, तर शाप देऊन नरकात टाकतील, ह्या भीतीने भावड्या फ्लोरेण्टाइन लोकांनीही तीनचार वर्षे कलोपासना थांबवली. मठाधिपतींनी जोरदार अशी अश्लीलताविरोधी आघाडी उघडली होती. असल्या महंतांना ढोंगी हैराण आरोळ्या दिल्यावर शुद्ध चारित्र्याचा आव आणून धर्मांध आणि स्वार्थी पंडित-मंडळीही त्या मठाधिपतीभोवती जमली. सस्त्यात चारित्र्यशील म्हणून प्रसिद्धी मिळायची सोय ! हा सारा खेळ स्वतःच्या हाती धार्मिकच नव्हे, तर राजकीय सत्ता घेण्याचाही असतो. 'इस्लाम खतरे में है' अशी आरोळी ठोकणाऱ्या पुढाऱ्यांना जुम्मा मशिदीचा मुख्य मौलवी होण्याची महत्त्वाकांक्षा नसते. त्यांचा डोळा राजसत्तेवर असतो ! ह्या डॉमिनिक पंथाच्या मठाधिपतींना राष्ट्रीयत्वाचाही पुळका आला होता. फ्रेंचांविरुद्ध लढा देताना कचखाऊ धोरण स्वीकारल्याचा आरोप ठेवून त्यांनी आपल्या राजालादेखील पदच्युत करून सत्ता बळकावली; आणि त्या जेत्या फ्रेंच राजाच्या स्वागताला मात्र स्वतः हा साव्होनारोलाच गेला. धंदेवाईक धर्मवाल्यांची हीच तर मजा आहे ! इतरांना 'दूर हो, दूर हो, शिवू नको,' म्हणणाऱ्या काशीच्या पंडितांनी इंग्रज व्हाइसरॉयचा रथ आपल्या हातांनी ओढला होता. आपल्या सत्तामदाने हा साव्होनारोला इतका चेकाळला (शेवटी हे सारे हुकूमशहा असेच चेकाळतात) की, त्याने फ्लोरेन्समधली संगीताची वाद्ये, काव्यग्रंथ, चित्रे, शिल्पकृती यांची होळी करण्याची मोहीम काढली. आणि खुद्द फ्लोरेन्समधल्या एका चौकात हे कलाधन जाळून टाकले ! बरोबर एक वर्षानंतर ज्या चौकात त्याने ही होळी पेटवली होती, त्या ठिकाणी कलेलाच ईश्वर मानणाऱ्या,

पण गुंडगिरीला काही काळ भ्यालेल्या फ्लोरेन्सवासीयांनी त्या उन्मत्त आचार्याला एका खांबाला बांधून जिवंतपणी जाळून टाकले!

वास्तविक ख्रिस्ताला आणि त्याच्या चरित्रातील उद्बोधक प्रसंगांना कलावंतांनी जितके जिवंत ठेवले, त्याच्या लक्षांशानेही ह्या धर्मगुरूंनी ठेवले नाही. मठाधिपती हे धर्मावर स्वतःची तुंबडी भरतात. हा दलालीचा धंदा. म्हणूनच देवळे, मशिदी, चर्चेस् यांची दुकाने मांडली जातात! पोप पापमुक्ततेचे पास विकतात, आणि गयेचे पंडये दक्षिणेच्या नाण्यांनी हात ओले करून घेऊन तुमच्या-आमच्या पितरांसाठी स्वर्गाची दारे उघडून देतात!

फ्लोरेन्समधल्या त्या एकापेक्षा एक सुंदर अशा चर्चेस्मध्ये मी नत-मस्तक झालो, तो त्या तिथले ते विराट ऑर्गन्स् बांधणारांपुढे आणि वाजवणारांपुढे! एवढी प्रचंड वास्तू सुरांच्या लाटांनी भारून टाकण्याचे सामर्थ्य असलेले ते ऑर्गन्स्! माणसांतल्या देवत्वाचा साक्षात्कार कला घडविते! इथल्या सांता मारियाच्या कॅथीड्रलमधला घुमट हा तर विजा-पूरच्या घुमटासारखा स्थापत्यकलेतला चमत्कार आहे. हा बोलघुमट नाही. पण जवळजवळ साडेतीनशे फूट म्हणजे तीस-एक मजले उंचीच्या ह्या घुमटाच्या आतल्या बाजूला ख्रिस्तचरित्रातल्या अखेरच्या निवाड्याचा जो देखावा रंगवला आहे, तो पाहून माणूस अवाक् होतो. ह्या चर्चलाच 'डुओमो' म्हणजे 'घुमट' म्हणतात. हे भव्य चर्च बांधायला एकूण अडतीस वर्षे लागली. त्यांतली चौदा वर्षे नुसता घुमट बांधीत होते. आडवे झोपून ही चित्रे रंगवावी लागतात. ती पाहणारी माणसे साडेतीनशे फूट खाली असल्यामुळे त्या चित्रांच्या प्रमाणबद्धतेचे अंदाज गणिताने करावे लागतात. चर्चेस्मधली ती काचेवरची चित्रे तर नजर खिळवून ठेवतात. मागून सूर्यप्रकाश पडला की ती काचेवरची चित्रे कशी रंगी-बेरंगी फुलांसारखी फुलून येतात. ह्या डुओमोमधल्या भिंतीवरच्या एका भव्य चित्रात मी महाकवी दान्ते फ्लोरेन्स नगरीला आपले महाकाव्य ऐकवीत असल्याचे अप्रतिम प्रस्तरचित्र पाहिले. पाचसहा शतकांपूर्वी काढलेल्या ह्या चित्रातल्या रंगांचे ओले ताजेपण आजही टिकून आहे.

पाद्रीबाबांच्या शंभर प्रवचनांपेक्षा ख्रिस्ताच्या प्रतिमेतल्या डोळ्यांमधले चित्रकारांनी दाखविलेले कारुण्यच भाविकांचे मन अधिक भिजवून टाकीत असेल. कलेतून लाभणाऱ्या ह्या आध्यात्मिक आनंदाच्या आणि कलेचा आस्वाद घेणाऱ्या माणसांच्या मध्ये हे धर्ममार्तंड लुडबुडले नसते, नीती राखणाऱ्या गुरख्यांनी उगीच दंडे बडवले नसते, तर जीवन किती सुंदर झाले असते ! ह्या एका शहरात बॉतिचेली, लिओनार्दो दा व्हिन्ची, राफाएलॅ, व्हॅन डाइक अशा प्रत्येक शतकातल्या इटालियन आणि इतर युरोपियन चित्रकारांच्या असामान्य कलाकृती पाहायला मिळतात. देशोदेशीचे चित्रकार आणि चित्रकलेचे विद्यार्थी भान हरपून ह्या चित्रां-पुढे उभे असतात. किती पाहू आणि कसे पाहू असे होऊन जाते. इथल्या 'बॅप्टिस्ट्री 'मधले दरवाज्याचे कोरीव काम पाहून मला आपल्या देशातले जुन्या मंदिरांतले आणि वाड्यांतले दरवाजे आठवले. सौराष्ट्र-राजस्थानातले दरवाज्यांचे कोरीव काम असामान्य आहे. पण त्यांची आम्ही अभागी लोकांनी निगा ठेवली नाही. हल्ली तर ते दरवाजे उखडून पैशाच्या लोभाने परदेशी प्रवाशांना विकले जातात. पुण्यातल्या राजा केळकर म्यूझियमच्या केळकरांनी धडपडून असले दरवाजे मिळवले आहेत; आणि खूप काळजीपूर्वक जतन करून मांडले आहेत. फ्लोरेन्स-मधल्या ह्या बॅप्टिस्ट्रीतल्या दरवाज्यांवर ख्रिस्तपुराणातले प्रसंग कोरले आहेत. इथे मी हिरव्या छटेचा संगमरवर प्रथमच पाहिला. पांढऱ्या आणि हिरव्या संगमरवरातली ही इमारत आहे. प्रत्येक दिशेच्या दरवाज्यावर उत्तम कलाकुसर. इथला गाइड सांगत होता की, पूर्वदरवाजा पाहून खुद्द मायकेल एंजेलो म्हणाला की, स्वर्गाचे प्रवेशद्वार व्हावे, अशी ह्या दरवाज्याची योग्यता आहे ! सहासष्ठच्या पुरात ह्या दरवाज्यांची नासधूस झाली होती हे त्या गाइडने सांगितले, म्हणून कळले. एरवी ती डागडुजी इतकी बेमालूम आहे की, लक्षातदेखील येत नाही. युरोपातले हे गाइड फार सुरेख माहिती देतात. त्यांच्यापाशी मजेदार चुटके असतात. ते स्वतःच कसे त्या कलेच्या आनंदाने रंगून गेल्यासारखे बोलतात. हा त्यांचा अभिनयही असेल. पण मग ते चांगले नटही आहेत, म्हणायला

हवे. मायकेल एंजेलो, लिओनार्दो दा विन्ची ह्यांच्या कलाकृती दाखवता-दाखवता त्यांच्या जीवनातली अशी एखादी हृद्य कथा सांगतात की, त्या आठवणींच्या साखळीत ते चित्र गुंफले जाते. पण आमचे भारतीय गाइड अशा वेळी कहर करतात. मी एकदा उदयपूरला गेलो होतो. आम्हांला त्या किल्ल्यात देवआनंदच्या 'गाईड' सिनेमाचे शूटिंग कुठे-कुठे झाले आणि देवआनंद आणि वहिदा रेहमान ह्यांच्या चरणस्पर्शाने कुठली-कुठली जमीन पावन झाली, तेच तो दाखवीत सुटला होता. त्याला तिथले संवादही आठवत होते. शेवटी मी त्याला म्हटले,

'माफ करना. हमने इस्कूलमें पढा है— यहाँ कोई एक राणा प्रताप नामका आदमी रहता था।' मला वाटले की, माझ्या उपरोधामुळे तो खजील होईल. पण तो मलाच उलट कोडगेपणाने म्हणाला, 'साब, राना प्रताप तो पुराना हीरो था। देवआनंद नया हीरो हैं।' आणि इतर टूरिस्टांनादेखील 'बरी जिरली ह्या शहाण्याची' असे वाटले. मग त्याने 'तुला राणा प्रतापाची तहान लागली होती ना? मग घे तुझा राणा प्रताप!' अशा सुरात बोलून राणा प्रतापाचा पुतळा दाखवला. एक अश्वारूढ पुतळा संपूर्णपणे गोणपाटांनी झाकला होता. मला त्या घोड्याच्या शेपटाचा केसदेखील दिसला नाही. सुमारे वर्ष-दीडवर्ष तो असा गोणपाटाच्या गोषातच होता. पुतळा-कमेटीच्या ठरावानुसार उद्घाटन राष्ट्रपतींच्या हस्ते व्हायचे होते. राष्ट्रपतींना तिथे येऊन ते गोणपाट वर करायला मुहूर्त मिळत नव्हता. तोवर राणा प्रताप गोण-पाटात! आता राणाजी उघड्यावर आले असतील. सभोवताली जे काही चालते, ते पाहिल्यावर त्यांना पुन्हा एकदा त्या चेतक घोड्यासकट गोणपाटात घुसावे, असेच वाटत असेल. बाकी त्या उदेपुरात राणा प्रतापापेक्षा त्या चेतक घोड्याचेच नाव लोक अधिक वेळा घेतात. कारण तिथे 'चेतक' नावाचे एक सिनेमा थेटर आहे. आणि इथे ह्या फ्लोरेन्स-मध्ये शतकानुशतकापूर्वीची मूर्तिकला, चित्रकला, शिल्पकला कशी काल केल्यासारखी स्वच्छ होती. कुठे धुळीचा कण नाही, की पुतळ्याच्या फुटक्या देहातून गवत फुटलेले नाही. आमच्या देवळाच्या घुमटाच्या

भेगांतून पिंपळ फुटलेले दिसतात! वास्तविक मूर्तिकलेच्या बाबतीत आम्ही भारतीय तसूभरही मागे नाही. असलो तर पुढेच असू. पण संस्कृतीचे संरक्षण म्हणजे आम्ही आमच्या सोवळ्यांचे आणि मुकट्यांचे संरक्षण मानीत आलो. आमच्या शिल्पांचे चित्रांचे, संगीताचे, काव्य-नाटकांचे, नृत्याचे, साहित्याचे संरक्षण आणि संवर्धन म्हणजे संस्कृतीचे संरक्षण, ही कल्पनाच आम्हांला शिवली नाही. उलट, ते संरक्षण करणाऱ्या कलावंतांना आम्ही शूद्रांत ढकलले! आज इटालीत लिओनार्दो किंवा मायकेल एंजेलोची नावे किती अभिमानाने उच्चारतात! त्यांचीही आयुष्ये काही सुखात गेली नाहीत. अनोनात यातना त्यांनी सोसल्या. त्यांची चरित्रे वाचली, की कलानिर्मितीच्या ध्यासासाठी त्यांनी सोसलेल्या हालअपेष्टांची कल्पना येते. पण एवढा छळ सोसूनही त्यांची सौंदर्य निर्मितीवरची श्रद्धा ढळली नाही. आपल्या साऱ्या सौंदर्यानुभूती, स्वतःला झालेले उदात्ताचे दर्शन, भव्यतेची, कारुण्याची अनुभूती, त्यांनी समाजासाठी दगडांतून कोरून काढली आणि चित्रांतून रंगवली. विष्णुसहस्र-नामासारखी यादी होईल इतके कलावंत ह्या एकट्या इटलीने जगाला दिले. पुढल्या पिढ्यांनी आमच्यासारखा करंटेपणा दाखवला नाही. आम्ही आमच्या कलाधनाची वाट लावली. त्यांनी ते वाढीला लावले. आजच्या यंत्रयुगात इटालियन यंत्रांची रचनादेखील एखाद्या सुंदर शिल्पासारखी सुबक असते. आणि सौंदर्याची ही जपणूक शहरापासून ते लहान-लहान खेड्यांपर्यंत दिसते.

फ्लोरेन्सच्या आर्नो नदीच्या पैलतीरावर डोंगरमाळा आहेत. त्या उतरणींवर विस्तीर्ण उद्याने आणि सुंदर-सुंदर बंगल्या आहेत. निसर्गाशी सुसंवाद साधून केलेली वास्तुरचना आहे. प्रत्येक गावाला एक व्यक्तिमत्त्व असते. त्या व्यक्तिमत्त्वाला गालबोट लागेल, अशी वास्तू उभी न करण्याचा इथे कटाक्ष पाळलेला दिसतो.

सकाळी उठून मी हॉटेलमधल्या सज्जात आलो. समोरच ती आर्नो नदी वाहत होती. उजव्या-डाव्या बाजूला सुरेख पूल होते. नदीच्या दोन्ही तीरांना रस्ते. ठिकठिकाणी पाण्यात गळ टाकून माणसे माशांची

प्रतीक्षा करीत तपाला बसलेली. सगळे वातावरणच कसे सुस्नात वाटत होते. नदीच्या पाण्यावर सूर्याची कोवळी किरणे पडलेली. सुंदर हवा. फुलाफळांनी लदलेल्या बागा. विपुल पाणी. मधूनच चर्चमधला घंटानाद. औद्योगिक संस्कृतीचे ह्या नगरीवर भयानक आक्रमण होऊ दिलेले नाही. संगतीला जगन्मान्य असे कलाधन. चिंतनशील माणसाला हवी ती शांती देणारी नगरी. रसिकाला आकंठ रसपानाची सोय. कलांच्या विद्यार्थ्यांचे साधनाक्षेत्र. बाल्य, यौवन, वार्धक्य सर्व काही सुंदर रीतीने परिणत व्हावे असे हे वातावरण. इथे उणीव होती ती इंग्रजी जाणणाऱ्या एखाद्या इटालियन् रसिकाची. मनात विचार आला की, असा कोणी पागल भेटला, तर काय मजा येईल! आणि एकदम शर्वरीबाबूंनी दिलेला पत्ता आठवला. वहीतून नाव, पत्ता शोधून काढला.

डॉ. गास्तोने उगुच्चिओनी असे नाव होते. टेलिफोन डिरेक्टरीतून नंबर शोधून काढला आणि हॉटेलच्या टेलिफोन ऑपरेटरला जोडून द्यायला सांगितले. पलीकडल्या बाजूने कोणी तरी इटालियन बाई खूप गोड पण अगम्य भाषेत बोलली. मी मला इटालियन येत नसल्याबद्दल तिची क्षमा मागितली, आणि इंग्रजीतून संवाद सुरू केला. मी भारतातून आलो आहे, हे ऐकल्याबरोबर ती बाई गडबडीने काही तरी बोलली, आणि काही सेकंदातच सुंदर खर्ज स्वरात खुद्द डॉक्टरच म्हणाले—

'नामास्ते!' सलामीतच चीत झालो. त्यांनी 'देशपांडे–देशपांडे' असे माझे नाव दोनतीनदा नीट म्हणून उच्चार बरोबर असल्याची माझ्याकडून खात्री करून घेतली. मी मात्र 'उगुच्चिओनी की युगुच्चियानी,' ते विचारायला लाजलो! त्यांनी अतिशय आग्रहाने आम्हांला संध्याकाळी आपल्या घरी येण्याचे आमंत्रण दिले. मी लगेच आमच्या हॉटेलच्या मॅनेजरसाहेबाकडून डॉक्टरांविषयी माहिती काढायला सुरुवात केली. त्याला काही ते नाव कळेना. शेवटी पत्त्याचा कागद त्याच्या पुढे धरल्यावर एकदम 'ओह – ओह' करून त्याने असा काही आविर्भाव केला की, डॉक्टर उगुच्चिओनी हे फ्लोरेन्समधले भलतेच मोठे प्रस्थ असावे, अशी मला शंका आली.

' डॉक्टरांना तुम्हांला काही विशेष कामानिमित्त भेटायचे आहे का ?' मॅनेजर.

' छे ! सहज ! ' मी.

' सहज ? ' तो. ' तुम्हांला अपॉइंटमेंट मिळाली ? '

' हो. ' मी.

' आश्चर्य आहे. ' दोन्ही खांदे उडवून, तो !

शेवटी मला कळले की, डॉक्टर गास्तोने उगुच्चिओनी हे तिथले फार प्रसिद्ध असे मानसिक रोगांचे डॉक्टर आहेत. देशी भाषेत ' वेड्यांचे डॉक्टर '. मॅनेजर आता आमच्याकडे विशेष न्याहळून पाहताहेत, अशी मला शंका आली. मी, माझी पत्नी, मीना आणि सुधाकर यांपैकी डॉक्टरांचा पेशंट कोणता हे तो अजमावीत असावा. तेवढ्यात त्याच्या टेबलावर नेहमीप्रमाणे माझ्या काळ्या चष्म्याचे घर विसरून निघाल्याचे आमच्या वर्षानुवर्षाच्या केअरटेकर गव्हर्मेन्टने त्याच्या देखत ध्यानात आणून दिले आणि मीनाला ' ह्यांचे हे नेहमीचेच आहे, ' हा अभिनय करून दाखवला. हॉटेलच्या रजिष्टरात मीना डॉक्टर असल्याचे होतेच. त्यामुळे ह्या मंडळींनी फ्लोरेन्स दाखवण्यासाठी मला आणलेले नसून त्या डॉक्टरला दाखविण्यासाठी आणले आहे, याविषयी त्याची खात्री होऊन त्याने माझ्याकडे एक कारुण्यपूर्ण दृष्टिक्षेप केला. अमुक-एक माणूस वेडा आहे असे एखाद्याच्या डोक्यात वेड शिरले की ते नाहीसे करण्याचा शहाण्याने प्रयत्न करू नये. मॅनेजरसाहेबांनी डॉक्टरांच्या घरापर्यंत पोहोचण्याचा नकाशा काढून दिला. आणि आम्ही पत्ता शोधीत निघालो.

शेसव्वाशे वर्षांपूर्वी बांधलेल्या प्रचंड वाड्यासारख्या इमारतीच्या देवडीपाशी आम्ही उभे होतो. ' व्हिला कॉन्स्टांझा ' नावाचा तो प्रासाद होता. ' कासा डी क्यूरा पर मालेट्टी नर्व्हासे ' ही अक्षरे वाचली. ' मनोरुग्णालय ' असे भाषांतर केले. खुद्द डॉक्टरांचे नाव बारीक अक्षरांत होते. उगाच घोटाळा नको, म्हणून त्या वेड्याच्या इरिपतळाच्या आत शिरण्यापूर्वी हातांतल्या पत्त्यावरच्या अक्षरांशी ते नाव नीट जुळवून

पाहिले. भलताच निघाला आणि मला पेशंट समजला तर काय घ्या! ह्या वेड्यांच्या डॉक्टरांचे केव्हा डोके फिरेल नेम नाही. शेवटी हातातल्या पत्त्याशी बोर्डावरचे नाव जुळल्यावर घंटीची गुंडी दाबली. क्षणातच ते दार आपोआप उघडले गेले. प्रशस्त दालन होते, आणि वरच्या मजल्याकडे नेणारा मुंबईतल्या पारसी धनिकांच्या जुन्या बंगल्यात असायचा तसा चांगल्या लांबरुंद पायऱ्यांचा जिना होता. आम्ही क्षण-दोन-क्षण त्या दालनात घोटाळलो. तेवढ्यात जिन्याच्या वळणावर एक प्रसन्नवदना मध्यमवयीन इटालियन स्त्री उभी असलेली दिसली. तिने—'सिनियॉर देशपांडे?' असे विचारले. आणि मी 'होय,' वगैरे म्हणायच्या आतच 'वेल कोम्—वेल कोम्' म्हणत तिने आम्हा सर्वांशी हस्तांदोलन करून आमचे स्वागत केले. आपल्या मागून 'इत इतो भवान्' करीत एका प्रतीक्षाकक्षात नेले.

'*जरा बसा हं — डॉक्टर एवढ्यात येतील.*' असे म्हणून ती बाई आम्ही आल्याची वर्दी द्यायला आत गेली. आमच्या समोर एक मध्यम-वयीन इटालियन जोडपे, माणसे हॉस्पिटलमध्ये जशी चिंतेत बसलेली असतात — तसे बसले होते. त्या दोघांतला डॉक्टरांचा पेशंट कोण असेल, असा मी उगीचच तर्क करीत होतो. इतक्यात पुन्हा एकदा 'नामास्ते!' असा उद्गार कानांवर आला. आम्ही चमकून उठलो.

सुमारे सहा फूट उंच, त्या उंचीला शोभेल असा रुंद, ठसठशीत नाकडोळे, पांढरे-शुभ्र केस, हसतमुख, असा साठीपलीकडला पण कमालीचा टवटवीत दिसणारा भरभक्कम माणूस 'नमस्ते'बरोबर हात जोडून आमच्यापुढे उभा होता. खास इटालियन् उच्चारांत त्यांनी आम्हांला 'फक्त पाचच मिनिटे थांबा,'— असे इंग्रजीतून सांगितले आणि ते गृहस्थ आतल्या खोलीत गेले. थोड्या वेळाने त्या जोडप्याला आमंत्रण आले. आम्ही ठरल्या वेळेपेक्षा दहा मिनिटे आधीच येऊन तिथे टपकलो होतो. काही वेळाने ते जोडपे बाहेर आले. त्याच्याबरोबर डॉक्टरही आले. त्या जोडप्याने डॉक्टरांना अभिवादन करून त्यांचा निरोप घेतला. डॉक्टर आमच्याकडे येत म्हणाले —

' चला, माझ्या भारतातल्या मित्रांना भेटायच्या खोलीत जाऊ या.' त्या भव्य प्रासादात प्रत्येक देशातल्या पाहुण्यांना भेटायची निराळी खोली बांधणारा हा डॉक्टर मला अजबच वाटला. आमची दिंडी डॉक्टर-साहेबांच्या मागून निघाली. त्या धिप्पाड माणसापुढे आम्ही (मीसुद्धा) भलतेच बुटके वाटत होतो. आमच्या येण्याने डॉक्टरांना मनापासून आनंद झाल्याचे दिसत होतेच. पण चेहऱ्यावर 'जरा थांबा — तुम्हांला मोठा मजेदार धक्का बसणार आहे.' असा मिस्किल भावही होता. एका दालनापाशी आम्ही आलो. दार बंद होते. त्या दाराच्या लांबीरुंदी-वरूनच दालनाच्या प्रशस्तपणाची कल्पना येत होती. डॉक्टरांनी दार उघडले. आपण पुढे गेले आणि चटकन् वळून म्हणाले, 'सुस्वागतम् ! भारतातल्या माझ्या सगळ्या आठवणी इथं साठवल्या आहेत.'

त्या दारातून त्या दालनाचे जे पहिले दर्शन झाले, ते अपूर्व होते.

समोरच्या भिंतीवर आद्य शंकराचार्य आपल्या शिष्यांना एका वृक्षाच्या पारावर बसून पाठ देत असल्याचे सुंदर चित्र होते. त्या दालनाच्या चारी भिंती छतापर्यंत ग्रंथांनी भरलेल्या होत्या. मुंबईच्या एशियाटिक सोसायटीत असले एक जुने दालन आहे. तिथेही छतापर्यंत जाणारी उंच कपाटे आहेत. डॉक्टरांची ही अभ्यासिका तशीच होती. तिथेही छतापर्यंत जाणारी उंच कपाटे होती. एके ठिकाणी एका सुरेख कोरीव काम केलेल्या टेबलावर समया होत्या. छोटा देव्हारा, पूजेची उपकरणे होती. उदबत्तीचा पुडा होता. देव्हाऱ्यात शंख, शिवलिंग — मला वाटते शाळिग्रामही असावा. एका उघड्या बुक शेल्फचा निम्मा भाग टेपरेकॉर्डर, रेकॉर्डप्लेअर यांनी भरला होता, आणि उरलेल्या भागात किती तरी लाँग प्लेइंग रेकॉर्डस् होत्या. टेपची बॉक्से होती. त्या बुकशेल्फ जवळच्याच भिंतीवरच्या थोड्याशा मोकळ्या जागेत ख्रिस्ताचे एक फार सुंदर चित्र होते. मी त्या चित्राकडे टक लावून पाहत होतो. एक तर मला ख्रिस्ताचे चित्र पाहायला फार आवडते. माझ्या काही निमित्ताने झालेल्या वेळोवेळीच्या पश्चिमेकडल्या प्रवासात मी ख्रिस्ताची असंख्य चित्रे आणि मूर्ती पाहिल्या आहेत. मेरीमातेचे बाळ म्हणून रंगवलेल्या

ख्रिस्तापासून ते क्रूसावरच्या ख्रिस्तापर्यंत त्याची मी असंख्य दर्शने घेतली आहेत. त्या चित्राकडे पाहताना डॉक्टरांना ह्या गृहस्थाच्या डोक्यात ख्रिस्त आणि शंकराचार्य एकमेकांसमोर कसे, हा किडा वळवळत असेल, अशी शंका आली की काय, कोण जाणे! ते न विचारताच म्हणाले –

'माझ्या पूर्वजन्मीचा गुरू हा, आणि या जन्मीचा गुरू हा.' असे म्हणत दोन्ही हातांची ओंजळ त्यांनी शंकराचार्यांच्या फोटोकडे नेली. डॉक्टरांचा तो भक्तिभाव पाहून मी चकित झालो. ज्या नगरीतल्या कणाकणावर ख्रिस्ती जीवनाचा इतका सुंदर कलात्मक संस्कार घडला आहे त्या फ्लोरेन्समधला एक अत्यंत यशस्वी मनोरोगतज्ज्ञ त्या ख्रिस्ताला आपल्या पूर्वजन्मीचा गुरू म्हणत होता – आणि हजारो मैलांवरच्या एका अत्यंत भिन्न संस्कृतीतल्या आद्य शंकराचार्यांच्या तसबिरीपुढे 'ह्या ओंजळीत तुझा कृपाप्रसाद दे.' असे मागणे मागत उभा होता! ज्याच्याशी वंश, धर्म, भाषा, देश यांपैकी कसलेही नाते नाही, अशा एका संन्याशाला ह्या जन्मीचा आपला बाप–आई–गुरू–सखा–बंधू सारे काही मानीत होता.

'ही इज् माय् गुरू – माय् एव्हरिथिंग्.'

फ्लोरेन्समधल्या त्या सुंदर चर्चेसमधून हिंडताना क्रूसापुढे नतमस्तक होऊन गुडघे टेकून बसलेली पुष्कळ भाविक माणसे मी पाहिली होती. इथे त्याच शहरातला एक माणसांच्या मेंदूतल्या गुंतागुंती सोडवणारा भिषग्वर्य आद्य शंकराचार्यांच्या तसबिरीपुढे हात जोडून उभा होता. आर्नो नदीच्या काठी वाढलेल्या माणसाला ओढ लागली होती पेरियार नदीच्या तीराची, आणि मी हिंदुस्थानातून फ्लोरेन्सचे कलावैभव पाहायला आलो होतो. मी त्या कलावैभवाने दिपलो होतो. डॉक्टर उगुच्चिओनी आद्य शंकराचार्यांच्या बुद्धिवैभवाने दिपून गेले होते. नव्हे, अंतर्बाह्य त्या तेजाने उजळून निघाले होते· हा तपोधन वृद्ध देहाने फ्लोरेन्समधे असला, तरी मनाने भारतात राहत होता. नित्याचा व्यवहार संपला, की त्या दालनात येऊन भोवतालचे फ्लोरेन्स विसरत होता. मी त्याचा तो अफाट ग्रंथसंग्रह

पाहायला लागलो. वेद, उपनिषदे, गीता ह्या ग्रंथांवरची भाष्ये, भारतीय इतिहास, भारतीय संतांची चरित्रे – भारतीय तत्त्वज्ञानगंगेच्या कावडी भरून ठेवल्या होत्या. मी काही पुस्तके चाळून पाहिली. पानांच्या मोकळ्या कोपऱ्यांवर डॉक्टरांनी मुद्दे काढलेले दिसत होते. कुठे प्रश्न-चिन्हे होती. कुठे एखादे वाक्य अधोरेखित केलेले होते. डॉक्टर आपण होऊन काही चांगली चांगली, काही दुर्मिळ अशी पुस्तके दाखवीत होते. त्या संग्रहात तत्त्वज्ञानविषयक पुस्तकांप्रमाणेच भारतीय शिल्पकलेवरची कुमारस्वामींसारख्या महापंडिताने लिहिलेली पुस्तकेही होती. आम्ही हे सारे पाहत होतो. त्या पुस्तकांविषयी बोलत होतो. पण इतक्या वेळात डॉक्टरांनी मी कुठून आलो, काय करतो, कसलीही चौकशी केली नाही. मी भारतीय आहे, एवढेच भांडवल त्यांना भरपूर होते. 'माहेरचा माणूस' म्हटल्यावर जसा एके काळी आगतस्वागताचा आपोआपच धनी व्हायचा, तशासारखेच हे होते.

इतक्यात दार उघडून हातातल्या ट्रेवर बऱ्या आणि कसल्या तरी पेयाने भरलेली ग्लासे घेऊन मघाशी भेटलेली ती स्त्री आली. एका मोठ्या बशीत चक्क आंब्याच्या फोडी होत्या.

'भारतातले आंबे आहेत.' डॉक्टर म्हणाले. मग फळांवरून गोष्टी निघाल्या. मी इटलीतल्या 'पीच'ची तारीफ केली. खरोखरीच इतकी चांगली पीचची फळे मी यापूर्वी कधीच खाल्ली नव्हती. पण डॉक्टरांना भारताने पार झपाटले होते.

'भारतीय आंब्यासारखे फळ नाही,' असे त्यांचे मत होते. आम्ही फलाहार केला. मी खाद्यपदार्थांची चर्चा थांबवली. कारण इटालियन् पिझ्झ्यापेक्षा बटाट्याच्या भाजीचा लगदा भरलेला मसाला डोसा अधिक श्रेष्ठ आहे, हे ऐकण्याची माझी तयारी नव्हती. माझे लक्ष पेयावर होते. ते लिंबूपाणी निघाले. आता ह्या पेयापेक्षा इटालीत चिआंटी, बार्दोलीनो, कोरोनाता, कास्तेली, रोमानी अशी नावे धारण करणारी काही पेये अधिक आनंददायी असतात. पण लिंबूपाण्याच्या घोटाबरोबरच मी ती नावे गिळली.

डॉक्टरांनी आपल्या कोचात बसल्या-बसल्या एक कळ दाबली आणि समोरच्या स्टँडवर आपोआप एक चित्रपटाचा पडदा वर गेला.

'चला – जरा भारतात हिंडून येऊ या –'

आणि मग मी त्यांना यापूर्वी अनेकांनी केलेला प्रश्न टाकला.

'पण डॉक्टर, आमच्या देशाबद्दल तुम्हांला इतकी ओढ कशी निर्माण झाली?'

'ईत ईज ए मीस्तरी – ते एक कोडेच आहे –'

असे म्हणून त्यांनी जी कथा मला सांगितली, ती ऐकून मीदेखील कोड्यातच पडलो आहे. हातांतल्या स्लाइड्स् त्या प्रोजेक्टरवर फिरणाऱ्या चक्राकार ट्रेमध्ये बसवीत-बसवीत डॉक्टर सांगू लागले.....

'मी लहान होतो. नऊ-दहा वर्षांचा असेन. त्या वेळी मला स्वप्नात एक देवळासारखी इमारत दिसायची. आणि कोणीतरी तिथे मला चलण्याविषयी आग्रह करतोय, असे वाटायचे. एकदा, दोनदा नाही, अनेकदा मी हे स्वप्न पाहिले.' मनोरुग्णांच्या डॉक्टरांना मानसिक व्याधींनी पछाडलेले लोक त्यांच्यापुढल्या कोचावर आडवे पडून आपल्या पूर्वायुष्यातल्या कथा सांगत असतात. इथे स्वतः मानसिक रोगांचा एक प्रसिद्ध डॉक्टर आपल्या कोचावर बसून आपलीच कथा मला ऐकवीत होता.

'– त्या देवळाचे चित्र माझ्या मनावर स्वच्छ उमटलं होतं. ते स्थापत्यच निराळं होतं. आमच्या फ्लोरेन्समधल्या वास्तू तुम्ही पाहिल्या असतील. त्या वास्तुशिल्पाशी ह्या वास्तूचे काहीही साधर्म्य नव्हते. मला त्या स्वप्नातल्या देवळाचं रहस्य कळेना. एवढेच नव्हे, ते देऊळ आहे की काय आहे, याचंही मला ज्ञान नव्हतं. मी माझ्या वडिलांना त्या वास्तूचं वर्णन करून सांगितलं. ते म्हणाले, ओरिएंटल् पागोडा असे असतात. मग मी ग्रंथालयात जाऊन देशोदेशीच्या वास्तुशिल्पांवरची पुस्तकं पालथी घालायला सुरुवात केली. आणि एका पुस्तकात मला स्वप्नात जे देऊळ दिसत होतं, तेच चित्र पाहायला मिळालं. थांबा –'

असं म्हणून कपाटातून त्यांनी एक जीर्णशीर्ण ग्रंथ काढला.

' हे ते देऊळ! ' दक्षिण हिंदुस्थानातले कांचीतले ते आद्य शंकराचार्यांनी वसवलेले कामाक्षीचे मंदिर होते. मी डॉक्टरांना म्हटले, ' कदाचित् जागेपणी तुम्ही तुमच्या शाळेतल्या पुस्तकात ते चित्र पाहिले असेल –' आता मनोरुग्णांच्या एवढ्या प्रसिद्ध डॉक्टरांशी मी स्वप्नाच्या शास्त्राविषयी बोलणे हा थोडा आगाऊपणाच होता. पण डॉक्टर शांतपणे म्हणाले, ' आमच्या लहानपणी पाठ्यपुस्तकात पूर्वेकडच्या संस्कृतीविषयी फारशी अशी माहिती नसे. ' आता असली जी अघटिते असतात, त्यांच्या फारशा खोलात मी शिरत नाही. चमत्कार आणि गैरसमज यांचा माणसाने फारसा पाठलाग करू नये. कोणत्या का कारणाने असेना, ते देऊळ डॉक्टरांच्या मनात घर करून बसले होते. हे त्यातले सत्य मला पुरेसे होते. ते देऊळ शंकराचार्यांनी वसवलेले होते. त्यामुळे शंकराचार्यांविषयी ओढ उत्पन्न झाली. एकदा पांडुरंगावर श्रद्धा जडली, की पंढरपूर पवित्र वाटते. आणि काब्यावर जडली की मक्केवर श्रद्धा जडते, ह्या न्यायाने शंकराचार्यांमुळे त्यांचे भारतावर प्रेम जडले. प्रेमच नव्हे, तर भक्ती. मग दर दोन वर्षांनी भारतीय तीर्थांची वारी सुरू झाली. गीतेचा, उपनिषदांचा अभ्यास सुरू झाला. भारतीय तत्त्वज्ञान आणि संस्कृत भाषेचा अभ्यास करणारे जे इटालियन पंडित आहेत, त्यांच्याशी स्नेह जमला. आणि फ्लोरेन्ससारख्या कलानगरीतला नागरिक असल्यामुळे भारतीय स्थापत्य, प्राचीन शिल्प यांच्यावर अतोनात जीव जडला.

डॉक्टरांनी त्या दालनातला दिव्यांचा प्रकाश मंद केला आणि समोरच्या पडद्यावर एकामागून एक अशी दक्षिणेतल्या मंदिरांची चित्रे दिसायला लागली. डॉक्टर उगुच्चिओनींची छायाचित्रकलेतली गतीही फार चांगली होती. डॉक्टरांनी बिसमिल्लाच्या सनईची ध्वनिमुद्रिका लावून सौम्य अशा पार्श्वसंगीताची त्या चित्रांना साथ दिली होती.

' हे ते देऊळ, ' पडद्यावर कांचीच्या कामाक्षीच्या मंदिराचे सुंदर चित्र आले होते. ' शिवोऽहम् शिवोऽहम् शिवोऽहम् ' डॉक्टर पुटपुटत होते. सुमारे दीड-एक तास आम्ही पडद्यावर ती चित्रे पाहत होतो. मधूनच डॉक्टर माहिती पुरवायचे. माझ्या नशिबाने मी दक्षिण

हिंदुस्थानातील बरीचशी मंदिरे पाहिली आहेत. त्यामुळे मीही मधूनच त्या मंदिरांची ओळख दाखवीत होतो. होता-होता कन्याकुमारीच्या महासागरांच्या मीलनक्षेत्राचे चित्र आले. सूर्यास्ताचा समय पडद्यावर उभा राहिला. अप्रतिम चित्र होते. एखाद्या अलौकिक भाग्याचा क्षण पकडून चिरंजीव करावा, तसा तो सूर्यास्ताचा अपूर्व क्षण डॉक्टरांनी आपल्या कॅमेऱ्यातून टिपून घेतला होता. त्या दृश्याने मात्र आम्ही सगळेच भारावलो. कदाचित तासभर पाहिलेली ती सुंदर शिल्पे, ते सौम्य पार्श्वसंगीत, डॉक्टरांचे ते खर्जातले मधुर बोलणे, एका संपूर्ण निराळ्या संस्कृतीत वाढलेल्या त्या वृद्ध माणसाचा माझ्या देशातल्या संस्कृतीविषयीचा भक्तिभाव ह्या साऱ्यांचेच संमोहन झाल्यामुळे की काय कोण जाणे, कन्याकुमारीच्या सागरसंगमाचे दृश्य पाहिल्याबरोबर नकळत माझ्याही तोंडून त्या विराट शांतिस्वरूपाच्या दर्शनाने उद्गार आले—
'ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः !'

ह्या थोर माणसाला भेटायला मी रिक्त हस्ताने आलो, ह्याची मला हळहळ वाटत होती. मी म्हणालो 'डॉक्टर, तुम्ही आम्हांला एवढे दिलेत. मी तुमच्यासाठी काहीच आणले नाही !'

'तुम्ही स्वतः आलात, हाच मला फार मोठा आनंद आहे.'

'मी तुम्हाला काय देऊ ?'

'तुमची हरकत नसेल, तर एक गोष्ट मला हवी आहे. तुम्हांला संस्कृत चांगलं येत असावं. मघाशी तुम्ही त्या पुस्तकातला एक श्लोक वाचत होता. ते कानाला फार गोड वाटलं. संस्कृत भाषा किती मधुर आहे !' मी म्हणत होतो 'इटालियन किती मधुर आहे !' आणि डॉक्टर उगुच्चिओनी संस्कृताच्या माधुर्याची तारीफ करीत होते. माझ्या संस्कृताची प्रशस्ती ऐकून मला 'निरस्तपादपे देशे एरण्डोपि द्रुमायते' हे वचन आठवले. माझे संस्कृत भाषेवर अतिशय प्रेम आहे. पण त्या भाषासुंदरीने आपले मन आमच्याशी मोकळेच केले नाही. इतकेच नव्हे तर माझ्या प्रारब्धयोगामुळे शाळा-कॉलेजांतल्या माझ्या गुरुजनांनी गीर्वाणसुंदरीच्या प्रेमात आम्ही पडू नये, याचीच अधिक खबरदारी घेतली. एखाद्या

रूपवतीच्या रूपाचा आस्वाद घेण्याचा मोह होईल, ह्या भयाने तिच्या शरीरात हाडे किती आहेत, तिची यकृत, प्लीहा वगैरे कोठे आहे, आणि तिच्या गालावरची लज्जेची लाली म्हणजे विशिष्ट तऱ्हेने होणारे रुधिराभिसरण कसे असते, ही माहिती देऊन त्या सुंदरीविषयी घृणाच उत्पन्न करावी तसा प्रकार आमच्या संस्कृत शिकवणाऱ्या गुरूंनी त्या भाषेच्या भक्तिप्रत्ययाऐवजी विभक्तिप्रत्ययात गुंतवून शब्द पच् मुचिरिंच्या चिखलातून चालायला लावून केला! शाळा-कॉलेजापासून कायदेशीर विभक्त झाल्याचा दाखला डिग्रीच्या रूपाने मिळवल्यानंतर मी संस्कृताशी स्नेह जमवला. मी बुचकळ्यात पडलो आहे, हे त्या मानसशास्त्रज्ञाच्या लगेच ध्यानात आले. ते अधिक नम्रपणाने म्हणाले,

'मला काही संस्कृत श्लोक रेकॉर्ड करून द्याल का?'

'बघतो प्रयत्न करून,' मी म्हणालो. लगेच त्यांनी कपाटातून आद्य शंकराचार्यांच्या स्तोत्रांच्या पोथ्या काढल्या. आचार्यांची ही स्तोत्रे माझ्या फार आवडीची. विलक्षण कळवळ्याने भरलेली. मी त्यांतले काही श्लोक आधी तीनचार वेळा मोठ्याने वाचले आणि त्यांना रेकॉर्ड करून दिले.

'आता आणखी एकच –'

'काय?'

'तुम्हांला गायत्रीमंत्र येतो का?'

'येतो.' माझ्या बुद्धीला प्रचोदना दे, अशी साक्षात् सूर्यापाशी मागणी करणारा हा मंत्रही मला आवडतो. बुद्धीची मागणी करणारा हा गायत्री मंत्र म्हणायची शूद्रांना आणि स्त्रियांना उगीचच बंदी नव्हती. एकदा बुद्धिप्रामाण्य आले की चिकित्सा आली. म्हणजे मग 'मी सांगतो म्हणून ऐक,' ही दमदाटी संपली. शहाणपणाची मक्तेदारी नाहीशी झाली. अष्टवर्षे चतुर्वेदी झालेल्या आणि आपल्या बुद्धिसामर्थ्याने केरळापासून काश्मीरपर्यंत उत्तम युक्तिवादाने विरोधकांची अंतःकरणे काबीज करणाऱ्या, जिथे बुद्धीला समन्वय पटला तिथे समन्वय साधणाऱ्या ह्या महान् अद्वैती आद्य शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानामुळे अंतर्बाह्य उजळून निघालेला हा इटालियन गृहस्थ माझ्यापाशी गायत्री मंत्राची मागणी करीत होता.

मीदेखील ' वत्सा, तुजप्रत कल्याण असो, ' असा आव आणून सुरुवात केली– 'ॐ .... भूर्भुवः स्वः ........' पुढेमागे एखादा संस्कृत भाषाशास्त्री डॉक्टरांच्या घरी गेला, तर माझे ते मंत्रपठण ऐकून त्याला फेफरे येईल. गायत्री हा गाणाऱ्यांचे रक्षण करणारा मंत्र, असे मी कुठेसे वाचलेले आहे. तसा मी थोडासा गाणाराही असल्यामुळे आमच्या घराण्यात आम्ही हा मंत्र अशाच आघातांनी गातो, असे म्हणून मी आपले रक्षण करीन. स्वतःचे अवगुण झाकायला घराणी, परंपरा ह्यांच्या ढाली खूप मजबूत असतात.

डॉक्टर उगुच्चिओनी आद्य शंकराचार्यांच्या असामान्य बुद्धिमत्तेविषयी उचंबळून येऊन बोलत होते. खरे तर असल्याच द्विजाला मंत्र म्हणण्याचा अधिकार.

जाता-जाता मला एकच वाटले की, जवळपासच्या चर्चेसमधली बुद्धी गहाण टाकणारी अंधश्रद्धा त्यांना दिसली. दूरवरच्या भारतातली दिसली नसावी. आद्य शंकराचार्यांचे अद्वैतविचार आमच्याकडे पोथ्यांतूनच राहिले आहेत. त्यांच्या पीठाचे वारस त्या समतेच्या आणि समन्वयाच्या पीठावरून विषमताच कशी खरी आहे, हे सांगत पाद्यपूजा घेत हिंडत आहेत. उभ्या भारतखंडातल्या आपल्या विरोधकांना स्वतःच्या बुद्धिनिष्ठ वादाने जिंकून त्यांना स्वपक्षात घेणाऱ्या त्या शंकराचार्यांचे हे वारस वादाचे शड्डू ठोकतात आणि आपला विचार मांडायची संधी विरोधकाला देण्यापूर्वीच जितं मयाचा गदारोळ करतात. द्वैताचा एवढा मोठा जय आद्य शंकराचार्यांच्या द्वैतवादी विरोधकांनादेखील मिळवता आला नसेल ! डॉक्टर उगुच्चिओनींच्या पहिल्याच भेटीत मी त्यांना हे बोललो नाही. कारण तूर्त त्यांची टाळी त्या अद्वैततत्त्वज्ञानाच्या आनंदी लागली आहे. तो आनंद त्यांच्या साऱ्या व्यक्तिमत्त्वातून ओसंडतो आहे. कशातही तल्लीन झालेला माणूस पाहणे हाच केवढा आनंद आहे !

जीवनात कशाशी तरी एकरूप होता यायला मिळणे हे महत्त्वाचे. मग ती तल्लीनता देणारी तरुणी असो, वारुणी असो, की शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान असो. कशात तरी स्वतःला विरून टाकल्याशिवाय अद्वैताचा

अमृतानुभव येत नाही. मग त्या फ्लोरेन्समध्ये आपले सारे आयुष्य चित्र, शिल्प, संगीत, काव्य ह्यांच्यात विरघळवून टाकणारे कलावंत कोण होते तर? ह्याच फ्लोरेन्समध्ये मायकेल एँजेलोला दगडादगडांतून ख्रिस्ताचे ते त्यागमय जीवनच दिसत होते आणि छिन्नी-हातोड्यांनी त्या दगडात दडलेले जीवन बाहेर काढून हजारो लोकांपुढे तो ते उभे करीत होता. हा अद्वैती नाही, तर कोण होता? आत्मसमर्पणाखेरीज अद्वैत संभवतच नाही. मनोरुग्णांच्या कथांतून त्यांच्या व्यथा शोधून काढण्यात तल्लीन झालेले डॉक्टरही असल्या अद्वैती माणसाचेच दर्शन घडवीत होते. ध्यानधारणेत मग्न झालेल्या डॉक्टरांप्रमाणेच मला व्याधि-संशोधनात मग्न झालेले डॉक्टरही पाहायला आवडले असते. त्यांचे चित्र मग पूर्ण झाले असते. पण जे दर्शन घडले, त्यानेही खूप प्रसन्न होऊन आम्ही त्यांचा निरोप घेतला.

हॉटेलमध्ये परतल्यावर मॅनेजरसाहेब म्हणाले,

'काय, डॉक्टरांची भेट झाली?'

'हो.'

'काय म्हणाले डॉक्टर?'

'भारतीय आंब्यासारखे जगात दुसरे फळ नाही, म्हणाले!'

मॅनेजरच्या डोळ्यात विलक्षण कणव साठली होती. दोन्ही खांदे हताशपणे ढिले करीत तो म्हणाला, 'गुड् नाइट्!'

'आपल्या हॉटेलात उतरलेला हा वेडा रात्री काय करतो, देव जाणे!' ह्या विचाराने त्याची एका रात्रीची झोप मी निश्चित उडवली, याची मला खात्री पटूनही मी त्याला म्हणालो—गुड् नाइट्!'

# एक बेपत्ता देश

पत्ता शोधणे यासारखी अवघड गोष्ट नसेल. रस्त्यातली सारी माणसे कशी शहाणी वाटत असतात. आपणच फक्त येडबंबूसारखे हातात पत्ता लिहिलेली चिट्ठी घेऊन हिंडत असतो. वास्तविक न्यूयॉर्कमध्ये ॲव्हेन्यू, स्ट्रीट आणि घरनंबर बरोबर लिहिलेला असला, आणि आपल्याला थोडेफार इंग्रजी वाचता येत असले, तर नेमका पत्ता सापडणे कठीण नसते. तरीही मी त्या न्यूयॉर्क शहरात वाट चुकलो होतो. अशा वेळी पोष्टात जाऊन पत्ता विचारावा, असा सल्ला अनाहूत-आहूतपणे अनेकांनी अनेकांना दिला आहे. पण मी मुळी मुदलात पोष्टाचाच पत्ता शोधीत होतो. न्यूयॉर्कच्या मॅनहॅटन बेटावर तर रस्त्यांची बेतशुद्ध आखणी आहे. हडसन नदीकडे जातात ते स्ट्रीट, आणि त्या रस्त्यांना फासळ्यांसारखे आडवे कापीत जातात, ते ॲव्हेन्यू ! माझा पेन्सिलीसारखा हरवण्याचा गुणधर्म ओळखणाऱ्या मित्रांनी माझ्याकडून हे कोष्टक पाठ करून घेतले होते. तरीही वाट चुकणे ही माझी करामत होती. माझ्या जमेच्या बाजूला एकच गोष्ट आहे. मी पत्ता विचारायला लाजत नाही. एकतर लाज

वाटावी, असा पत्ता हुडकण्याची माझ्यावर पाळी आली नाही, आणि दुसरे म्हणजे एखाद्याचा पत्ता माहीत नसणे ही काही मी मोठ्या नामुष्कीची गोष्ट मानीत नाही. खुद्द माझा पत्तादेखील मी अतिशय तपशीलवार सांगतो. मी कुठेही चुकणार नाही, अशी खात्री करून देऊन मी माझ्या न्यूयॉर्कमधल्या मित्राच्या घरून पोष्ट शोधीत निघालो.

सकाळचे दहा-सव्वादहा वाजले होते. लख्ख ऊन पडले होते. तरीही हवेत मस्त गारवा होता. हवे तेवढे भटकत रहावे, असे वातावरण होते. पण पत्ता शोधायला निघालेल्या माणसाचे दातांत सुपारी अडकलेल्या माणसासारखे असते. ती सुपारी निघाल्याशिवाय चैन पडत नाही. अगदी एखाद्या त्रैलोक्यसुंदरीचे चुंबन घेण्याचा योग आला, तरी दातात सुपारी अडकलेली असताना तो आनंद लुटण्याची इच्छा होईल की नाही, याची शंका आहे. आजवर माझ्या दातांत असंख्य वेळा सुपारी अडकली आहे. परंतु चुंबनातुर त्रैलोक्यसुंदरी जाऊ दे, जिल्हापातळीवरची सुंदरीदेखील न भेटल्यामुळे 'दातांत सुपारी अडकलेल्या अवस्थेतील चुंबन' ह्या विषयावर अधिक लिहिणे शक्य नाही ! तात्पर्य, ती खुषगवार हवा, ते सुरेख ऊन, ते सगळे ताजेताजे वातावरण आणि फुटपाथवरून लगबगीने निघालेल्या त्या सुंदर-सुंदर गौरांगना — काही तितक्याच देखण्या कृष्णांगनाही — ह्यांतले कुठलेच सौंदर्य टिपणे अशक्य होते. विमा-एजंटाला जसा जगातला प्रत्येक तरुण माणूस हा फक्त भावी 'पॉलिसी'च्या रूपात दिसतो, तसे मला ते सारे पादचारी आणि पादचारिणी तिथल्या पोष्टाचा पत्ता ठाऊक असलेले वाटत होते. 'अर्जुन आणि झाडावरच्या पक्ष्याचा त्याला दिसणारा डोळा' ह्या कथेचा माझ्या मनावर फार परिणाम झालेला आहे.

परक्या गावात अनोळखी माणसाला हटकणे ही किती कठीण गोष्ट आहे, हे न्यूयॉर्कसारख्या महानगरात ज्याला पत्ता शोधीत हिंडावे लागले आहे, त्यासच कळावे. माझ्या 'एक्सक्यूज मी'कडे एकजण ढुंकून पाहायला तयार असेल तर शपथ ! ह्या थंड देशात माणसे भलतीच जलद चालतात. त्यामुळे त्यांना अडवणे अवघड ! बरे, अडवून

' एक्सक्यूज मी ' म्हटले तर त्यांना वाटते, धक्का लागला, म्हणून हा बाबा माफी मागतोय् ! ' नेव्हर माइंड –' म्हणून पुढे निघाले ! चक्क एखाद्या दुकानात जाऊन विचारावे म्हटले, तर न जाणो, पत्ता सांगितल्याचा सर्व्हिस चार्ज म्हणून तिथला माणूस डॉलर मागायचा ! आई भाजीला गेली असताना धाकट्या भावाकडे लक्ष दिल्याबद्दल जिथे त्या भावड्याची ताई आपल्या आईकडून तितक्या वेळेच्या ' बेबी सिटिंग'चा मोबदला ताशी डॉलर-अर्धा डॉलरच्या रेटने मागते, तिथे माझ्यासारख्या परक्या माणसाची काय कथा ?

जेरीला आलो होतो. इतक्यात समोरूनच फूटपाथवरून बाबागाडी ढकलीत येणारी एक म्हातारी दिसली. त्या बाबागाडीत बाबा नव्हता. आजीबाईंची मंडई होती. मी बाबागाडीपुढे जाऊन उभा राहिलो आणि म्हटले, ' एक्सक्यूज मी, मॅडम – '.

लुगडे नेसवून ठसठशीत कुंकू लावले असते, तर आपल्या इथल्या एखाद्या सत्यभामाबाईसारखी किंवा जानकीकाकूसारखी वाटली असती, अशी ती ठेंगणी आणि बरीचशी कृश अशी म्हातारी होती. कसल्या नादात चालली होती खिस्त जाणे ! माझे ते आवाजात कहर मार्दव आणून म्हटलेले ' एक्सक्यूज मी ! ' ऐकल्यावर तिने दचकून वर मान करून माझ्याकडे पाहिले आणि भेदरून एकदम थरथरायलाच लागली. तिचा तो भेदरलेला चेहरा, ते केविलवाणे डोळे, एकाएकी लटलटायला लागलेली मान पाहिली आणि मला वाटले, आजीबाईंना कसला तरी झटका आला ! मीही गांगरून गेलो. काय बोलावे, ते सुचेना. मी म्हटले – ' आरंच्यू फीलिंग वेल, मॅडम् ? ' तिच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. काही क्षण तसेच गेले. मग थरथरत्या आवाजात ती म्हणाली – ' काय हवंय् तुला ? ' ( कदाचित् ' तुम्हांला ' असेल. हा इंग्लिश ' यू ' एकेरीही असतो आणि अनेकेरीही असतो. )

' मला एक पत्ता हवाय्. ' मी हातातली चिठी पुराव्यादाखल पुढे करीत म्हणालो. ' इथले पोस्ट ऑफिस् कुठे आहे ? '

' काय ? '

'पोस्ट ऑफिस्!' मनात म्हटले, ह्या अमेरिकन इंग्रजीत पोस्टाला आणखी काही म्हणत असले तर मेलो! वाहत्या पेट्रोलला 'ग्यास्' म्हणणारे हे लोक पोस्टाला 'लेटर थ्रोअर' म्हणायचे! गरजूंनी अमेरिकेत जाण्यापूर्वी अमेरिकन इंग्रजी शिकावे. इथे हॉटेलचे बिल् मागताना 'चेक' मागवावा लागतो; आणि आपण पैसे टिकवतो त्या पैशांना 'बिल्' म्हणतात. तिसाव्या आणि चाळिसाव्या मजल्यावर नेणारे इतर सर्व इंग्रजी भाषिक देशांत 'लिफ्ट' असले, तरी इथे 'एलेव्हेटर'! आणि मोटारीतून 'लिफ्ट' द्या म्हटले, तर बाहेर ढकलीत असावेत. कारण अमेरिकन माणूस मोटारीतून 'राइड्' देतो! मी ह्या भाषिक समस्येत घुटमळलो असताना ती म्हातारी पूर्णपणे सावध झाली होती. त्या वृद्धेने एखाद्या आगगाडीच्या इंजिनाने 'फ्रुऽऽस्' करून वाफ सोडावी तितका मोठा नसला, तरी त्याच्या आसपास येईल, एवढा निःश्वास टाकला! मीही टाकला. माझा इंजिनाच्या निःश्वासाच्या अधिक जवळ आला होता.

'डिड् यू से पोस्ट ऑफिस्?' म्हातारी म्हणाली.

'यस्, पोस्ट ऑफिस–मला काही स्टॅम्प्स घ्यावयाचे आहेत.'

'ओह्! आय् ॲम् सॉरी–' म्हणजे इतक्या रोमहर्षक प्रसंगानंतर म्हातारी मला पोस्टाची इमारत ठाऊक नाही, हेच सांगणार की काय? 'आय् ॲम् सो सॉरी! प्लीज्, प्लीज् डोंट मिसण्डस्टॅण्ड मी–माफ कर–कृपा करून माझ्याविषयी गैरसमज करून घेऊ नकोस–'

मला काही कळेना. नसेल पोस्टाचा पत्ता ठाऊक. पण त्यासाठी इतके काकुळतीला कशाला यायला हवे? मी सांगणार होतो तिला, 'आजीबाई, इतकी वर्षं मी पुण्यात राहिलोय, पण मलादेखील गंज-पेठेतले पोस्ट ऑफिस कुठं आहे, ते ठाऊक नाही!' पण ही क्षमा तिला पोस्ट ऑफिस ठाऊक नसल्याबद्दल नव्हती. कारण लगेच ती म्हणाली, 'ये माझ्याबरोबर–मी दाखवते–'

'कशाला? तुम्ही मला सांगा कसं जायचं ते–मी जाईन!'

'तसं नाही–पण मी तुझा उगीचच अपमान केला!'

ही आफत आली ! परदेशात जाणाऱ्या साहित्यिकांना न चुकता देखण्या तरुणी भेटतात. आम्हांला दैवे गाठ पडली ती ह्या सत्तरीतल्या बयाबाईची — वर म्हणते 'तुझा अपमान केला.' म्हणजे एकतर म्हातारी, शिवाय डोक्यात अंमळ अधू ! स्त्रियांच्या मैत्रीचा योग नसावा म्हणजे किती नसावा, ह्याला काही सुमार ! धिक् तां च तं च मदनं च वगैरे वगैरे !

'तुम्ही कसला अपमान केलात आजीबाई —'

'बाबा रे, काय सांगू ? ह्या शहरात आयुष्य गेलं माझं ! पण असे दिवस आले नव्हते !'

मला पुन्हा शंका आली. म्हातारी 'बघा, एखादा डॉलर निघतो का' म्हणणार. म्हातारी सांगू लागली, "माय् गॉड ! काय दिवस हे ! चांगलं कोण, वाईट कोण काही कळायला मार्ग नाही ! तू '—एक्सक्यूज मी' म्हणालास आणि ब्रह्माण्ड आठवलं !"

'म्हणजे ?'

'कधी आलास तू न्यूयॉर्कला ?'

'झाले तीनचार दिवस !'

'कुठून आलास ?'

'इंडियातून —'

'नेहरू ?' म्हातारीने भारताविषयीची पुष्कळच माहिती असल्याचा पुरावा दिला. सांगणार होतो की, 'आजी, ते गेले. आता त्यांची कन्या राज्य चालवते, वगैरे वगैरे'. पण मोह आवरला. पुन्हा म्हातारी बोलायला लागली —

'काय दिवस आले आहेत ! रस्त्यात कुणीही अनोळखी माणसाने हटकलं, की वाटतं साक्षात् मृत्यू उभा राहिला समोर !'

आजवर या-ना-त्या कारणाने मी अनेक आज्यांच्या पुढे उभा राहिलो आहे. पण कुठल्याही आजीला माझ्या रूपाने काळ उभा राहिल्यासारखे वाटल्याचे स्मरत नव्हते ! माझी सख्खी आजी 'खायला काळ' असे-देखील म्हणाली नाही मला !

'– जपून राहा बाबा ह्या शहरात!'

आणि मग मला त्या म्हातारीची सर्व हकीगत तिच्याकडून कळली. त्या अफाट शहरात एका दीड खोलीच्या जागेत ती म्हातारी एकटी राहत होती. तसे कमावते मुलगे होते. दोन मुलीही होत्या.

'त्या आपापल्या नवऱ्यांकडे असतील –' माझा अत्यंत देशी शेरा!

'छे छे – एक सत्तावीस वर्षांची आहे आणि दुसरी बत्तीस! दोघीही कमावत्या आहेत. अविवाहित आहेत. स्वतंत्र राहतात........'

'तुम्ही एकट्याच राहता?'

'ह्या देशात माझ्यासारख्या लाखो म्हाताऱ्या एकट्या राहतात.' अमेरिकेत म्हाताऱ्यांना 'सीनियर सिटिझन्स' म्हणतात. 'मी ही अशी दहा-साडेदहाला बाजारहाट करायला निघते, आणि अकराला खोलीत परतते. मग दुसऱ्या दिवशी दहापर्यंत एकटी! आताशा सेंट्रल पार्कमधे-सुद्धा जायची सोय नाही –' न्यूयॉर्कसारख्या अत्यंत गजबजलेल्या शहरात मैलभर लांबीचे सेंट्रल पार्क हे एक सुंदर उद्यान आहे.

'का सोय नाही?'

'मगिंग्!'

'काय?'

'मगिंग्.' मगिंग म्हणजे रस्त्यात एकट्यादुकट्याला गाठून मरेमरेस्तो बडवून त्याच्याजवळचे पैसे उपटणे! 'कुठल्या क्षणी आपला मुडदा पडेल, सांगता येत नाही.'

ही बाई मला गुंड समजली होती. तिला बडवून मी तिचे पैसे पळवीन, अशी तिला भीती वाटली होती. त्या म्हातारीने मला पोष्टाकडे नेऊन पोहोचवीपर्यंत सतत खून-हाणामारीच्या भयाने तिला आणि तिच्या इमारतीतल्या इतर म्हाताऱ्यांना कसे जगावे लागते, ह्याच्या कथा सांगितल्या. एक आठवड्यापूर्वी तिच्या वृद्ध शेजारणीचे डोके फोडून तिची पर्स लांबवली होती.

'दारावरची बेल अवेळी वाजली, तर मी दारदेखील उघडत नाही!'

मग माझ्या लक्षात आले की, इथे पोस्टमनदेखील तळमजल्यावर

प्रत्येकाच्या नावाच्या पेट्यातून पत्रे टाकत असतात. दूधवाले दारात बाहेरच बाटल्या ठेवून जातात. कित्येकदा दारातल्या त्या बाटल्या तशाच पडलेल्या असल्या, तर त्याला शंका येऊन तो पोलिसला कळवतो. पोलीस दार फोडून आत जातात. म्हातारी मरून पडलेली असते. त्या एकाकी जीवनाच्या अन्ताची बातमीदेखील अशा भयानक तऱ्हेने लागते !

दोनच दिवसांपूर्वी त्या न्यूयॉर्क शहराला वेढा देणाऱ्या नद्यांच्या विस्तीर्ण पात्रांतून छोटयाशा बोटीतून आम्ही शहराभोवती प्रदक्षिणा घातली होती किती सुंदर दिसत होते ते शहर ! नदीच्या काठांवरचे ते सुंदर बगीचे, विश्वविद्यालयांचे ते रम्य परिसर, ती क्रीडांगणे, त्यांत तरुण-तरुणींचे चाललेले खेळ, नदीवर टाकलेले ते प्रचंड पूल ! नदीतला तरुण-तरुणींचा नौकाविहार ! हडसन नदीवरचा तो न्यू जर्सीकडे जाणारा केवढा मोठा पूल ! ते तिमजली रस्ते, लक्षावधी मोटारींच्या रांगा, उत्तुंग इमारती, पण तितकीच गर्द झाडी ! स्वातंत्र्यदेवतेच्या पुतळ्याकडून मॅनहॅटनच्या दिशेला बोट वळल्यावर आपल्या शंभर-सवाशे मजल्यांच्या इमारतींतला विद्युत्-दीपांचा झगमगाट मिरविणारी ती न्यूयॉर्क नगरी ! सहस्र कुबेरांचे ऐश्वर्य दाखवणारी ! मनात म्हणत होतो, काय भाग्यवान माणसे ! पण मग हा काय आतून सडलेल्या गुलाबी-गुलाबी सफरचंदांचा बगीचा होता ?

शहरे आणि गुन्हेगारी ही पाठीला पाठ लावून येतात. मी दहा वर्षांपूर्वी ह्या न्यूयॉर्कमध्ये आलो होतो. त्या सेंट्रल पार्कमधून मनमुराद हिंडलो होतो. आम्हांला कधीही कोणी रात्री-बेरात्री भटकू नका, वगैरे पोक्तपणाचा सल्लाही दिला नव्हता. आणि आज इथे भरदिवसा सकाळी दहा-साडेदहा वाजता ही म्हातारी माझ्या नुसत्या 'एक्सक्यूज मी'ने थरथरा कापायला लागली होती. जो-तो बजावीत होता, 'संध्याकाळी कुठे एकटे-दुकटे जाऊ नका !' दर दहा-पंधरा मिनिटांनी पोलिसांच्या गाड्या वांय्-वांय्-वांय्-वांय असा तो भेसूर सायरन वाजवीत गुन्ह्याची वर्दी आल्यामुळे रस्त्यातून धावत होत्या. दुसऱ्याच दिवशी वर्तमानपत्रात

बातमी वाचली की, पाच डॉलरसाठी एका नामांकित वृद्ध प्रोफेसराचा अवघ्या सोळा वर्षांच्या पोराने भरदिवसा भररस्त्यात खून केला. प्रोफेसर आपल्या मोटारीत बसता-बसता हा पोरगा आला आणि पंचवीस सेंट मागू लागला. ' जाऊ दे शिंची कटकट ! ' म्हणून प्रोफेसरांनी त्याला पैसे दिले. ते घेताना त्या पोराने त्या प्रोफेसराच्या हातातले घड्याळ पाहिले. तो ते घड्याळ मागू लागला. प्रोफेसर म्हणाले, ' घड्याळ-बिड्याळ मिळणार नाही – ' दुसऱ्याच क्षणी ते रक्ताच्या थारोळ्यात पडले होते !

वास्तविक मी राहत होतो, ती उच्च-मध्यमवर्गीय वस्ती होती. एके दिवशी बाहेर पडतो, तर वातावरण तंग ! आम्ही सुज्ञपणाने यशस्वी माघार घेतली. मग हकीगत समजली. तिथल्या शाळेला दोन रस्त्यांवरून दोन्ही दिशांची प्रवेशद्वारे होती. एका रस्त्यावरच्या पोरांच्या टोळीने ' आमच्या रस्त्यावरून तुमच्या शाळेतल्या पोरांना शाळेत शिरू देणार नाही, ' अशी धमकी घातली. तिथून बाचाबाची. मग ह्या रस्त्यावरच्या पोरांची टोळी आणि त्या रस्त्यावरच्या पोरांची टोळी ह्यांचे भीषण युद्ध ! त्यात पाच-पन्नास डोकी फुटली ! पोलिसांना रिव्हॉल्वर्स, लोखंडी कांबी अशी नाना शस्त्रे सापडली. बरे, ही काळ्या-गोऱ्यांची मारामारी नाही – गोऱ्या-गोऱ्यांचीच !

किती संपन्न देश ! प्रचंड वस्तुभांडारे ! नजर ठरत नाही, अशा एकेक वास्तू. पण प्रत्येक मजल्यावर रिव्हॉल्वर्स घेऊन पोलीस उभे ! कुठल्या क्षणी भडका उडेल, सांगता येत नाही. अमेरिकन विचारवंतांची डोकी सुन्न झालेली. कुठल्याही अमेरिकन माणसाशी ह्या बाबतीत बोलावे – अनेक कारणे सांगतात. आणि शेवटी असहायपणे माना हलवीत बसतात. कुणी व्हिएतनाम युद्ध म्हणतो – कुणी राजकारणी लोकांवर खापर फोडतो, कुणी अतोनात समृद्धीचे हे सैतानी अर्भक आहे म्हणतो, आम्ही अर्धपोटी म्हणून अभागी, तर अमेरिकेला अत्याहारामुळे झालेले अपचनाचे रोग !

न्यूयॉर्कच्या रस्त्यातून जाताना अंगावर अक्षरशः लक्तरे घालून

हिंडणाऱ्या सोळा-सतरा वर्षांच्या सोन्यासारख्या मुली पाहून मी तर सुन्न होत असे. स्वातंत्र्याच्या शोधात ह्या आपल्या घरांना आणि आईबापांना सोडून पळून आलेल्या मुली! एकदा ह्या अभागी मुलींचा टेलिव्हिजनवर पोलिसांनी सादर केलेला कार्यक्रम पाहिला. घरट्यातून पडलेल्या पाखराच्या पिलांसारख्या त्या पोरी! कोणी गांजा-अफूसारख्या मादक पदार्थांत सुखाचा आणि स्वातंत्र्याचा शोध घेत होत्या! कुणी त्या चुकलेल्या वाटेवर भेटणाऱ्या त्यांच्याचसारख्या पौगंडदशेतल्या पोरांबरोबर सार्वजनिक बागांतून कुत्र्या-मांजरांसारखे देहाचे भोग भोगीत होत्या! ह्या अभागी भटकभवान्यांच्या कथा विलक्षण करुण होत्या. वयाच्या दहाव्या-अकराव्या वर्षीच इथे कौमार्यभंग व्हायला लागले आहेत. वास्तविक चांगल्या सधन घरातल्या ह्या मुली. पोटासाठी देह विकावा लागला म्हणावे, तर तसेही नाही. शाळेपासूनच कुठल्यातरी गटात खेचल्या गेलेल्या. एक पोरगी तर त्या पोलीस चौकीवर आपण आपल्या त्या हिप्पीसारख्या गटाच्या नावाने सगळ्या देहाचा पाचोळा कसा केला याची कथा सांगत होती. शेवटी त्या अधिकाऱ्याने विचारले, 'तुझ्या आईची आठवण होते का तुला?' आणि नुसत्या ह्या प्रश्नानंतर ती पोरगी 'मॉSम्' अशी किंकाळी फोडून ओक्साबोक्शी रडायला लागली.

थर्टीन् टु नाइन्टीन् ह्या वयाच्या मुलांना 'टीन एजर्स' म्हणायचे! अमेरिकन लोकांना तर असले आचरट शब्दप्रयोग करून कशालाही लेबले मारायची भयंकर खोड आहे. त्यातूनच हे मॉड्स, हिप्पीज्, टीनएजर्स आले. त्यात पुन्हा थर्टीन ते फोर्टीनपर्यंतचे टीन निराळे, असे नाइन्टीन्पर्यंत निरनिराळे 'टीन' पाडलेले असतात. आणि ह्या मुलामुलींना उच्छाद मांडायची परवानगी असते. त्या त्या गटांच्या पोषाखांच्या खास तऱ्हा! वन्य जमातींचे जसे आपापल्या जमातींच्या खास खुणा दाखवणारे पोषाख असतात, तसेच ह्यांचेही. पोषाखाची सुप्रतिष्ठित समाजाने लादलेली सक्ती झुगारणाऱ्या हिप्पींनीदेखील शेवटी 'हिप्पी' वेशभूषा आणि केशभूषा स्वीकारलीच! चांगल्या कपड्यांचीही मुद्दाम चिरफाड करून त्यांची लक्तरे तयार करून वापरायची, ही देखील एका

गटाची फॅशनच झाली. फॅशन न मानणे ही देखील फॅशन होते. कारण शेवटी गतानुगतिकांची संख्याच अधिक असते. मग तो एस्टॅब्लिशमेंट-वाला असो, की अॅन्टी-एस्टॅब्लिशमेंटवाला असो.

न्यूयॉर्कमधले ग्रीनिच व्हिलेज ही ह्या गौर-बैराग्यांची आणि बैरागिणींची उतारपेठ आहे. इथे मला जर सगळ्यात कुणाचे कौतुक वाटले असेल, तर ह्या पंथांना लागणाऱ्या सर्व साहित्याची विक्री करून गबर होणाऱ्या दुकानदारांचे! उत्तम सूट आणि उत्तम झगे हे प्रस्थापितांच्या जगाचे वैशिष्ट्य. प्रस्थापितांविरुद्ध बंडाला उठलेल्या तरुण-तरुणींनी आपला विरोध तो पोषाख झुगारून देऊन प्रकट केला. वाढलेले केस आणि फाटके कपडे हा बंडखोरांचा गणवेश झाला. व्यापाऱ्यांनी ह्या लक्तरांच्या गणवेशांचीही दुकाने काढून पैसे मिळवायला सुरुवात केली. व्यापाऱ्याला काय! खपेल ते तो विकणार. म्हणजे परंपरेवर श्रद्धा ठेवून वागणाऱ्यांची शेंडी आणि ती झुगारून दाढ्यामिश्यांचे जंगल वाढवणाऱ्यांची दाढी शेवटी बनियाच्याच हातात!

कधीकधी वाटते की, खरोखरीच ही जी तरुण मुलेमुली जीवनाची अशी जाणून-बुजून वैतागवाडी करून टाकतात, ह्याच्या मागे काही विचार आहे का? की साथीच्या रोगाला माणसं बळी पडतात, तशी या महाभयंकर प्रचारयंत्रांनी त्यांच्या साऱ्या सारासार-विचारशक्ती गुंगवून टाकून त्यांना दरवेळी कसल्यातरी मानसिक साथीच्या रोगाचे बळी केले आहे? एकतर ह्या मुलामुलींशी संवादच संभवत नाही. अमेरिकन लोक तसे अतिशय अनौपचारिक. 'हाय्' म्हणून अनोळखी माणसालाही अभिवादन करतील. गप्पागोष्टी करतील. पण ही या नव्या जोग्यांची जमात अजिबात दाद लागू देत नाही. आपल्या गटापलीकडे इतरांशी एक अक्षर बोलायला तयार नसतात. एकतर भयानक मादक पदार्थांच्या सेवनामुळे ते सदैव भ्रमिष्टांसारखे असतात, नाही तर तरुण-तरुणी रस्त्यांतून, बाकीच्या दुनियेची फिकीर न करता, आपल्याच नादात हिंडत असतात. आपल्या नानातऱ्हेच्या वैराग्यांच्या पंथांसारखे ह्यांचेही पंथ. प्रत्येकाच्या आता टिळे-माळाही आहेत. त्यातच पुन्हा 'हरे रामा हरे कृष्णा'वाले!

दिवसभर त्या एकाच तालावर ती एकच ओळ त्या एकाच सुरात गात हिंडल्यामुळे आत्मसंमोहनावस्थेत असतात. तुळतुळीत गोटे, लांब पिंगट शेंड्या, चेहऱ्यावर मुद्रा छापलेल्या, उघडेबागडे, पिवळे धोतर, गळ्यात माळा. तंबोऱ्या-मृदंग-टाळ-चिपळ्या वडवताहेत, आणि रस्त्यांतून दिंड्या काढून भटकताहेत. कुणी उघडेबंब! कुणी टॉपलेस—म्हणजे अंगात चोळीविळी काही नाही. कमरेखाली मिनी! म्हणजे चार इंच लांबीचा झगा, तर एका गटात सगळ्या पोरी मॅक्सी, म्हणजे मारवाडी भगिनींचे घागरे घातलेल्या.

हॅरी रॅमाऽऽ हॅरी क्रीस्नाऽऽपैकी एकाने मला धरले आणि तो पंथ-प्रचाराचे वाङ्मय विकायला लागला. मी विचारले,

'हे काय आहे?'

'हा क्रीस्ना कॉन्शसनेस् आहे.' ते खुळे म्हणाले.

'क्रीस्ना कॉन्शस्नेस्? ओह्—आय् ॲम् सॉरी!' मी म्हणालो.

'व्हाय?'

'आय विलीव्ह इन रामा कॉन्शस्नेस्!'

'रामा कॉन्शस्नेस्?'

'यस्! रामा कॉन्शस्नेस्—'

'व्हॉट् इज रामा कॉन्शस्नेस्?'

'द ऑपोझिट् ऑफ् क्रीस्ना कॉन्शस्नेस्—' असे म्हणून त्याला रामः रामौ:रामाः, रामं रामौ रामाः, रामेण रामाभ्याम् रामेभ्यः—करीत रामाच्या संबोधनापर्यंत विभक्तिप्रत्यय ऐकवीत गेलो. ते पोरगं बिचारं भेलकांडत गेलं!

ह्या भ्रमिष्टांच्या देशात भारतीय बुवामंडळींनी भलताच जम बसवलाय्! मी एका अमेरिकन कुटुंबात जेवायला गेलो होतो. तिथल्या गृहस्थांना मी या 'हारे रामा हारे कृष्णा'बद्दल विचारले. मी त्यांना सांगत होतो की, ही वरीचशी बनवाबनवी आहे. 'तुमची पोरं जशी कामधंदा, अभ्यास, शिक्षण सोडून रस्त्यातून 'हारे रामा हारे क्रीश्ना' करीत हिंडतात, तशी आमची मुलं आणि त्यांच्यावरोवर मुलीदेखील हिंडायला

लागल्या, तर आम्हांला ते आवडणार नाही ! तुम्ही आमच्या ह्या भोंदू लोकांवर विश्वास ठेवू नका. हिंदुधर्मात आपली कर्तव्ये सोडून दिवसरात्र रस्त्यावून ढोलकी बडवीत 'हरे रामा हरे कृष्णा' करीत हिंडायचा उपदेश केलेला नाही. सणासुदीला, एखाद्या गुरुवारी, शनिवारी भजन वगैरे ठीक आहे. हे भलतं व्यसन जडू देऊ नका.'

'रागावू नका मिस्टर देशपांडे—पण आम्हांला वाटतं, एल्. एस्. डी.—हाशीशच्या व्यसनापेक्षा हे बरं!' त्या गृहस्थाची बायको कळवळून म्हणाली.

व्हिएतनामच्या युद्धात सक्तीने बकऱ्यांसारखी बळींची भरती केलेले तरुण परत येताना ह्या भयानक व्यसनांचे बळी होऊन आले आहेत. त्या बाईंचा एक मुलगा असाच परत आला. ह्या सैनिकांना 'व्हेटरन्स' म्हणतात. पंचविशीतली पोरे आणि 'व्हेटरन्स'! अमेरिकन लोकांनी चांगल्या-चांगल्या शब्दांचादेखील कसा निकाल लावला आहे ! ज्याला आपल्या व्यवसायाचा चांगली चाळीस-पन्नास वर्षे उत्तम अनुभव आहे—मग तो नट असो, खेळाडू असो, की योद्धा असो,—असल्या गुणसंपन्न अनुभवी वीराला 'व्हेटरन्' म्हणतात. पण मिसरूड फुटण्यापूर्वी सक्तीने युद्धावर पाठवून पंचविशीच्या आसपास येईपर्यंत परत आणलेली पोरे 'व्हेटरन्स'! त्यांना पुढले वाटेल ते शिक्षण फुकट द्यायची व्यवस्था असते. पण ही मुले मुली परतताना अशी भकास होऊन परततात की, जीवनात काही चांगले असू शकते, ह्यावरची त्यांची श्रद्धाच उडालेली असते. सारे जीवन हे सुंदर उद्यान आहे, असे वाटायच्या वयात त्यांनी माणसांच्या मुडद्यांचे चिखल पाहिलेले असतात. सैनिकांच्या छावण्यांभोवती घोंघावणाऱ्या वारांगनांनी त्यांच्या नाजूक शृंगार-कल्पनांचा चुथडा केलेला असतो. वर्षानुवर्षे मृत्यूच्या जबड्यात लपंडाव खेळत राहिलेली ही तरुण मुले—त्यांनी एखाद्या भयानक अमली पदार्थाच्या आहारी जाऊन जीवन्मृतावस्थेतच मोक्ष मानावा, ह्यात नवल काय ? त्या दुर्दैवी आईचा सोन्यासारखा मुलगा अशाच एल्. एस्. डी. किंवा हाशीश-सारख्या व्यसनाचा बळी होऊन कुठेतरी पडलेला आहे. शिवाय,

'कसा का असेना, माझ्या पोटचा गोळा आहे – मलाच सांभाळलं पाहिजे त्याला –' ह्या वाक्याचे अमेरिकन भाषेत भाषांतरदेखील करता येणार नाही.

इंग्लंडला आपण दुकानदारांचा देश म्हणतो, ते अगदी चूक आहे. आज अमेरिकनांचे सगळे नमस्कार डॉलरम् प्रतिगच्छन्ति. आणि म्हणूनच यांच्या जीवनाची व्याख्या 'डॉलर कमावण्याची संधी' एवढीच असावी, असे मला ठायीठायी वाटत होते. आणि आयुष्यात कमविण्याचा काळ किती टिकेल, हे सांगता येत नसल्यामुळे इथे प्रत्येक गोष्टीची घाई आहे. 'सेल' ह्या मंत्राच्या जोडीचा दुसरा मंत्र म्हणजे 'इन्स्टंट'–'लगेच!' इन्स्टंट कॉफी, इन्स्टंट चहा, इन्स्टंट भात – एका मिनिटात जेवण तयार! कागदी पिशव्यांतून सर्व पाकसिद्धता असते. करा पिशवी उपडी उकळत्या पाण्यात – एका मिनिटात जेवण तयार! मग एका मिनिटात जेवण तयार करणाऱ्या 'जेवण कंपनी'चा प्रतिस्पर्धी जाहिरात करतो – 'बापरे! एऽऽक मिनिट? व्हॉट् अ वेस्ट ऑफ टाइम् – ही पाहा फलाण्या-ढकाण्या कंपनीची पिशवी – थर्टी सेकंड्समध्ये सूप, स्टेक, पुडिंग, कॉफी –' आणि मग असली पिशवी आणून आयुष्यातले तीस सेकंद वाचवणाऱ्या प्रियकराचे ती प्रेयसी कडकडून चुंबन घेते, हे दृश्य सांजसकाळ नित्य टी. व्ही.वर झळकायला लागते! विकायचा माल कोणताही असेना, शेवटी त्याचे पर्यवसान कडाडून दिलेल्या आलिंगन-चुंबनातच झाले पाहिजे. आता ती दृश्ये पाहून-पाहून त्यातून येणाऱ्या झिणझिण्याही गेल्या, म्हणून मग रंगमंचावर संपूर्ण नग्नावस्थेतला धिंगाणा!

'ओ कलकत्ता' हे त्यातले 'फॅण्टॅस्टिक' पर्यवसान मी त्यातल्या 'कलकत्ता' शब्दामुळे फसून ते पाहायला गेलो. पडदा वर गेला आणि नांदीसारखे गाणे म्हणायला तीनचार पुरुष आणि तीनचार बायका अंगावर 'टोगे' पांघरून आल्या आणि पहिल्या समेला त्यांनी ते टोगे फेकून देऊन आपल्या संपूर्ण नग्न देहाचे दर्शन घडवले. त्यांतले एक-दोन पुरुष तर अशा ओंगळपणाने आपल्या लिंगाचे प्रदर्शन करीत होते की,

त्या निर्लज्जपणात 'कला' कुठे आली तेच मला कळेना. आयुष्यात मी एकाहून एक सुंदर असे अनेक नग्न पुतळे पाहिले आहेत. पण ही नग्नता निर्लज्ज होती. कोडगी होती. दुकानदारांच्या दारांशी भीक मागणारे हिजडे भीक घातली नाही, तर लुगडे वर करण्याची धमकी देतात, तसली ही भीतिदायक नग्नता होती. पॅरिसच्या 'फोलीज्'मध्ये शिल्पांसारखी सुंदर शरीरे असलेल्या नृत्यांगनांची बराचसा देह अनावृत ठेवून नृत्ये असतात. ती काही फार वरच्या दर्जाची कला नव्हे. पण त्यात निदान तालबद्ध कवाइतीतली तरी आकर्षकता असते. पण इथली ही केवळ विक्रीला काढलेली नग्नता! असली तमासगिरी करून केवळ डॉलरची धन करणाऱ्यांविषयीचीच मला अधिक उबग आली, आणि म्हणूनच असल्या धनाधिष्ठित जीवनाशी सगळी नाती तोडून 'शय्या भूमितलं दिशोऽपि वसनम्' असा संकल्प सोडून निघालेल्या हिप्पींच्या दुनियेचा ताबादेखील ह्या दुकानदारांनी घेतलेला पाहिला, आणि त्या बनियांच्या अमानुष धनतृष्णेचे कौतुकच वाटले. अमेरिकेत प्रत्येक गोष्ट 'झटपट' बनविणाऱ्या ह्या दुकानदारांनी ह्या दुकानांतून झटपट हिप्पी बनविण्याचीही सोय केलेली आहे. 'इन्स्टंट कॉफी'सारखे 'इन्स्टंट हिप्पी'! तुम्ही त्यातल्या ज्या पंथाचे असाल, त्याचा यतिवेष गणवेषासारखा हजर आहे. तिथे रेडिमेड केस आणि दाढ्यादेखील विकत असतील.

हे सारे अमेरिकन जोगी आणि जोगडे फार मोठी निवृत्ती बाणल्यामुळे असे वागत असतील, असे नसावे. कारण अमेरिकेला सगळ्यांत मोठा रोग लागला आहे, तो रोज काहीतरी निराळे हवे असण्याचा. या रोगातून आपल्याला पैसा कसा कमावता येईल, याचा दुकानदार लोक बरोबर विचार करतात. फाटक्या पॅण्टीची फॅशन आली रे आली, की चांगल्या पॅण्टी फाडून फाटक्या करून ते विकायला मांडतात. तूर्त अनवाणी चालायची फॅशन असल्यामुळे बूटवाले चिंतेत असावेत. त्यांतल्या धूर्त लोकांनी चामड्याच्या जाड जाड कंबरपट्ट्यांची फॅशन रूढ केली! मला वाटते, हे व्यापारी फॅशनच्या मॉडेल्ससारखे पगारी हिप्पी ठेवून त्यांच्याकडून या

फॅशनी लोकप्रिय करीत असावेत. ह्या व्यापाऱ्यांनी आपल्या राक्षसी प्रचारयंत्रणेतून अमेरिकेतल्या जनतेची डोकी बधिर केली आहेत. रेडियो, टेलिव्हिजन, वर्तमानपत्रे असल्या प्रभावी माध्यमांतून हे लोक समाजात त्यांना जे काही विकायचे असेल, त्या मालाची अशी काही जाहिरात करतात, की दुकानात गेलेली माणसे झोपेत जाबडल्यासारखी ती वस्तू मागतात. माणसाच्या नैसर्गिक कमकुवतपणावर नेमके बोट ठेवले जाते.

माणसाला नाना तऱ्हेच्या भुका असतात. त्यांतली 'सेक्स' किंवा 'काम' ही सर्वांत मोठी भूक. सर्व आकर्षणांत 'कामाकर्षण' अत्यंत प्रभावी! मोटारींपासून संडासात हुंगण पुसायची कागदाची भेंडोळी तयार करणाऱ्यांपर्यंत सर्व उत्पादकांनी आपल्या मालाच्या विक्रीचे नाते सुरुवातीपासून अखेरपर्यंत ह्या कामवासनेशी नेऊन जोडले आहे. तुमची मोटार अत्याधुनिक का हवी? कारण असली मोटार बाळगणाऱ्याच्या गळ्यात कुठलीही युवती पडेल! तुझी लिप्स्टिक ह्याच रंगाची का हवी? कारण ती पाहिल्यावर 'तो' लगेच तुझे कडकडून चुंबन घेईल! हे इतके परमावधीला गेले आहे, की एका जाहिरातीत एक तरुण एका तरुणीला कडकडून आलिंगन देण्याचे कारण, ती नेहमी अमुक-अमुक कंपनीच्याच 'जुलाबाच्या गोळ्या' घेते! अमेरिकन साहित्यातही पहिल्या दोनतीन पानांत जबरी संभोग किंवा खून असले, की पुस्तकाच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या!

स्वयंचलित वाहनांनी त्यांना गतीचे वरदान दिले होते – आता तो शाप झाला आहे. ही गती आता मनांचा ताबा घेऊन बसल्यामुळे रस्त्यातल्या भ्रमंतीहूनही भयंकर अशी मनांची भ्रमंती चालू आहे! माझ्या मित्रांच्या घरी मी मुलांची खेळणी पाहत असे. 'आमच्या बेबीला रोज नवे खेळणे हवे' हे कौतुकाने सांगणाऱ्या आया मला भेटत. आपल्या, अमेरिकेत नोकरीला गेलेल्या नवऱ्यामागून जाऊन भलत्याच अमेरिकन झालेल्या या बायकांना मला सांगावेसे वाटे, की आणखी थोडक्याच वर्षांनी तुमच्या बेबीला रोज नवा बॉय फ्रेंडही हवासा वाटणार आहे! काही भारतीय अमेरिकन 'धी' बघून तिथे गेले. मुले मोठी

होऊ लागल्याबरोबर त्यांना ' बडगा'ही दिसू लागला आहे.

न्यूयॉर्कच्या रस्त्यातली म्हातारीच भयग्रस्त नाही, तर हा सारा समाजच भयग्रस्त आणि भ्रमिष्ट झाल्यासारखा मला वाटत होता. ' सेल ' (' विका ') हा इथला मूलमंत्र आहे ! वस्तू विका – बुद्धी विका – कला विका – कौमार्य विका – तारुण्य विका – विकण्यासारखे उरत नाही फक्त वार्धक्य ! म्हणूनच ते निरुपयोगी होते. कुणालाच ते नको असते. ' विक्री ' हा ज्या संस्कृतीचा युगधर्म होतो, तिथे वार्धक्याचे निर्माल्य होत नाही, – पाचोळा होतो ! ह्या विक्रीची परमावधी झालेली एक गोष्ट माझ्या एका भारतीय मित्राच्या पत्नीने सांगितली.

एका भारतीय गृहस्थाने अमेरिकेतल्या एका मोठ्या शहरात नवा बंगला विकत घेतला. झटपट चहा – झटपट कॉफी यांसारखे इथे महिन्या-दीड-महिन्यात झटपट बंगलेही बांधून विकतात. खिडक्या-दारेच नव्हेत, तर भांड्याकुंड्यांपर्यंत सगळा संसार सजवून देणारे दुकानदार आहेत. आता तर कॉम्प्यूटरवर तुमच्या आवडीनिवडीचे गणित मांडून तुमच्या तबियतीला बहेलविणारी शय्यासोबतीणदेखील भाड्याने मिळते. ही अतिशयोक्ती नाही. तुम्ही फक्त आवडीनिवडीचा फॉर्म भरून पाठवायचा. तुम्ही सांगाल त्या वेळेला आणि सांगाल त्या गरजा पुरवायला, सांगाल त्या कटि-नितंब-वक्षाच्या मापाची सहेली हजर ! मला वाटते, त्या दुकानात हा अर्ज गेला, की दुकानदार आपल्या गुमास्त्याला सांगत असेल – ' अरे, ह्या पत्त्यावर आपलं सोळा नंबरचं मॉडेल पाठव. शंभर डॉलर-तासवाले. शनिवार-रविवार डबल चार्ज आहे, ते कळव. ' हे मराठीतून वाचायला भयंकर वाटेल, पण इंग्रजीतून फारच आधुनिक वाटते !

त्या भारतीय गृहस्थाने तसल्या त्या रेडिमेड अमेरिकन घरातही वास्तुशांत केली. मनाच्या समाधानाला चार मंत्र टेप रेकॉर्डरवर वाजले. बिसमिल्लांच्या सनईची ध्वनिमुद्रिका लावली. इष्टमित्रांना जिलेबीचे जेवणही दिले. बॅगेत भरून आणलेल्या देवांची पूजाही झाली असेल. तशी आपली भारतीय मंडळी आपली संस्कृती आपापल्या मगदुराप्रमाणे

सांभाळीत असतात. एका घरात तर मी समई लावलेली पाहिली होती. अमेरिकन लोक मेणबत्त्यांच्या प्रकाशातले भोजन करतात, तसे समयांच्या प्रकाशातले अस्सल भारतीय भोजनही मी पाहिले आहे. त्यात एका भारतीय भगिनीला त्या समईच्या ज्योतीवर सिगरेट पेटवताना पाहून पूर्वपश्चिमेच्या अपूर्व मीलनाच्या दृश्याने माझ्या डोळ्यांतून फक्त अश्रुधाराच वहायच्या राहिल्या होत्या. तर ह्या गृहस्थाच्या वास्तुशांतीचा सोहळा चांगला साजरा झाला. पाहुण्या-मंडळींचे हात ओले झाले. "अय्या ! तुम्ही इंडियातून येताना विदाउट फेल मसाल्याची सुपारीदेखील आणलीत वाटतं –" वगैरे कौतुकेही झाली असतील. नव्या घराच्या मालकीणबाई खूष होऊन जराशा हुश्श करीत नव्या कोचावर बसल्या होत्या. तेवढ्यात फोन वाजला. बाईंनी फोन उचलला.

"अभिनंदन ! मनःपूर्वक अभिनंदन !" पलीकडून कुणीतरी अमेरिकन गृहस्थ बोलत होता. बहुधा त्या शहराच्या महापौरांचाच फोन असावा, अशा कल्पनेने बाईंच्या हनुवटीखालच्या तीन वळकट्यांच्या चार झाल्या ! त्यांनी परिश्रमपूर्वक उचललेल्या अमेरिकन भाषेच्या आघातात म्हटले – "थँऽऽक्यू – आपण कोण बोलत आहा ? –"

"आपला एक हितचिंतक ! स्वतःच्या मालकीच्या घरात राहणं ही एक अभिमानाची गोष्ट आहे. आपल्या मालकीच्या बेडरूममध्ये पतीच्या कुशीत विसावणं ही एक फॅण्टॅस्टिक अॅचीव्हमेंट आहे !"

बाई त्या कल्पनेने लाजून जांभळ्या झाल्या. "ओह – हाव् नाऽऽटी आऽऽफ याव् –" बाईंचे अमेरिकन इंग्रजी बिनचूक ! "हौ नॉटी ऑफ यू' हा हुजूरपागेतल्या इंग्रजीच्या मेहेंदळे किंवा तत्सम ए-कारान्त आडनावाच्या बाईंचा उच्चार त्यांनी इतर देशी आचारांबरोबर केव्हाच टाकला होता. तात्पर्य, हे अमेरिकन भाषेतले 'इश्य ! – चला, तुमचं काहीतरीच ........' वगैरे आटोपल्यावर बाईंनी विचारले, "आपण कोण बोलत आहा ?"

"आपल्या सेवेसाठी सदैव तत्पर असलेल्या अंत्यविधिकार्यालयाचा दिग्दर्शक !"

" कोण ? " बाई बसल्या ठिकाणी पुन्हा कोसळल्या.

" डायरेक्टर – फ्यूनरल कॉर्पोरेशन ! "

बाईंचा घसा सुकला. तिकडच्या बाजूच्या माणसाचा मोकळा झाला होता !

" मॅडम्, आपण नवीन घर बांधून इथं स्थायिक होणार, हे ऐकून आम्हांला अतिशय आनंद झाला. आमच्या कंपनीतर्फे आम्ही दफनाची सर्व व्यवस्था करीत असतो. इथल्या दफनभूमीत आता सहा-बाय-चारचे दोन प्लॉट्स विकायचे आहेत. जस्ट फॉर टू ! आपण पैसे सावकाश पाठवा. आम्ही टेलिफोनवरून ऑर्डरी स्वीकारतो. उद्या आपण हवं तर जागा पाहून येऊ. अगदी पॉप्लर वृक्षाखालीच आहेत. दिवसभर उत्तम सावली ! सावलीत विसावलेली थडगी ही एक फॅण्टॅस्टिक गोष्ट आहे – सो पीसफुल् .... "

बाईंच्या हातातला रिसीव्हर गळून पडला होता. तेवढ्यात अमेरिकन पद्धतीप्रमाणे साहेब स्वयंपाकघरातले आवरून आले. बाईंचा चेहरा पाहून घाबरले. त्यांना तिसरीच भीती ! " ह्या गोऱ्या लोकांच्या वस्तीत कसं राहता, ते बघतो. चोवीस तासांत घर सोडा, नाही तर जाळून टाकू– " वगैरे अमेरिकेत आलेल्या उपऱ्यांना हाकलून काढायच्या एखाद्या 'क्लॅन्'च्या गुंडाचा फोन की काय ? त्यांनी विचारले, " व्हाट्स् रांऽऽग ? " ( अमेरिकेत 'रांग्'ला रॉन्ग् म्हणणे रॉन्ग आहे. 'रांऽऽग ' इज राइट् ! )

" तुम्हीच ऐका. अभद्र मेला ! अशुभ बोलतोय ! " बाईंच्या मनावरची अमेरिकन पुटे झडून, अळू, वऱ्याचे तांदूळ, रताळी, साबुदाणा, शिंगाडे ह्यांवर तयार झालेल्या त्यांच्या रक्तपेशीतले जंतू उफाळून आले होते. साहेबांनी फोन उचलला. " हॅलो – "

" आह् ! मिस्टर साहासराब्यूढिये – " पुन्हा एकदा सुपरसेल्समनशिप सुरू झाली. दफनभूमीचा सौदा पटविण्यासाठी त्याने आपली विक्रीशास्त्रातली विद्वत्ता पुन्हा पणाला लावली. साहेब पुण्यात असते आणि अंत्यसंस्काराच्या भांडारवाल्याने " साहेब, अगदी सरळ बांबू आले

आहेत – चार राखून ठेवू का ?" असे विचारले असते, तर साहेबांनी त्याची त्याच्या जिवंतपणी तिरडी बांधली असती. पण ही अमेरिका होती. साहेब नम्रपणाने म्हणाले, "थँक्यू, थँक्यू सो मच् ! आमच्या धर्मात बेरियल नसतं – क्रिमेशन असतं."

"इजण्ट दॅट् बार्बरस् ? गुड नाइट !" तिकडून तो अंत्यविधि-दिग्दर्शक म्हणत होता, "काय जंगली चाल आहे ! बराय् शुभरात्री." ही कपोलकल्पित कथा नाही. केवळ पात्रांची नावे आणि आकार बदलले आहेत.

जिथे जीवन म्हणजे काहीतरी विकून श्रीमंत होण्याची संधी एवढाच अर्थ होतो, तिथे मढी पुरायची जागा विकली काय, किंवा पिढीच्या-पिढी गारद करणारी एल्. एस्. डी. – पॉट्-गांजा-अफू विकली काय, सारे काही संस्कृतीला साजेसेच आहे. शस्त्रास्त्रांची विक्री थांबेल म्हणून ज्यांचे सोयरसुतक नाही, अशा देशांत जाऊन बॉम्बचा वर्षाव करायचा ! काय विकतो आणि त्या विक्रीच्या वस्तूंचे काय परिणाम होतील, याचा विचार न करता विकत रहायचे. त्यांच्या बाजारपेठा शोधायच्या, त्या विक्रीसाठी जाहिरातीच्या नव्या-नव्या क्लृप्त्या काढायच्या, त्यांत मग विकणाऱ्या-विकणाऱ्यांची भयानक चढाओढ ! बाजारात येणारा दुसऱ्याचा माल हुसकता-हुसकता तो माल विकणाऱ्या-लाच कसे हुसकता येईल, याच्या योजना आखायच्या. गिऱ्हाइकाची हे बरे की ते बरे ? याचा विचार करण्याची विचारशक्तीच नष्ट करायची. हे सारे करताना कसलाही विधिनिषेध बाळगायचा नाही. बारा-तेरा वर्षांच्या मुलामुलींना मादक पदार्थ विकणाऱ्या दुकानदारापुढे त्या पोरांचे भवितव्य येतच नाही. टेलिव्हिजनवर 'खून कसा करावा,' याचे सशास्त्र शिक्षण देणाऱ्या चित्रपटवाल्यांना बालमनावर आपण काय संस्कार करतो, याची फिकीरच नाही ! दिवसभर हाणामाऱ्यांचे चित्रपट चालू असताना मधूनमधून कितीही चांगले 'सीसमी स्ट्रीट'सारखे शैक्षणिक कार्यक्रम केले, तरी त्या पोरांच्या डोळ्यांपुढे आदर्श म्हणून नाचत असतात, ते बंदुकीच्या फैरी झाडून धडाधड मुडदे पाडणारे

नायक आणि अशा नायकांच्या गळ्यात उघड्या-नागड्या होऊन मिठ्या घालणाऱ्या नायिका ! वयाचे पंधरावे वर्ष उलटण्याच्या आत शरिराचे सगळे भोग कुठल्याही जबाबदारीचे घोंगडे गळ्यात अडकवून न घेता भोगून झाले की, पुढे कसले तरी कृत्रिम उत्तेजन मिळाल्याखेरीज जगणेच अशक्य ! त्यातूनच मग त्या उत्तेजनासाठी मोटर-सायकलवरून भन्नाट भटकणे सुरू होते. दिशाहीन भ्रमंती चालू होते. अनोळखी तरुण-तरुणींची भरमसाट शय्यासोबत घडायला लागते. आणि या साऱ्यांच्या अतिरेकाने ती झिंगही भराभर ओसरायला लागते. मग ती जोरदार करण्यासाठी सायकेडेलिक विद्युद्दीपांच्या घेरी आणणाऱ्या प्रकाशात आणि कानठळ्या बसविणाऱ्या संगीतात बेहोषीचा शोध सुरू होतो, आणि शेवटी साऱ्या संवेदनांचा मेंदूत ठेचून-ठेचून भरलेला चिखल मात्र उरतो !

आपल्या जोगड्यांचे जसे आखाडे असतात, तशीच अमेरिकन हिप्पींची ' पॅड्स् ' असतात. आपल्या जोगड्यांसारखे हेदेखील गांजेकस. अमली पदार्थांमुळे ' इन्स्टंट ' समाधी मिळते. मग हा मणामणांनी लागणारा हाशीश-गांजा पुरविणाऱ्या टोळ्या ! त्यांचे ते चोरटे व्यापार. त्या टोळ्यांच्या मारामाऱ्या. त्यांतली ' माफिया ' ही भयानक संघटना तर आंतरराष्ट्रीय पातळीवर व्यवहार चालवते. त्या टोळीत माणसांचे मुडदे पाडणे हा नित्याचा खेळ !

न्यूयॉर्क, शिकागो, डिट्रॉइट्, वॉशिंग्टन्, अशा ह्या यमपुरीसारख्या भयपुरी ! कुठे काळ्यागोऱ्यांची खुनाखुनी, कुठे अत्याधुनिक दरोडेखोरी, कुठे ह्या अत्याधुनिक पंथातल्या लोकांच्या चकमकी ! आणि ह्या साऱ्यांना बेसुमार प्रसिद्धी ! सगळ्यांचेच बेसुमार उत्पादन. डिट्रॉइट्चा फोर्ड मोटारींचा कारखाना पाहायला गेलो होतो, तिथे जवळजवळ दर मिनिटाला एक नवी मोटार बाहेर पडत असते. कारखान्याच्या एका टोकाला लोखंडाचा रस उकळतो आहे, फिरत्या पट्ट्यांवरून त्या रसाचा प्रवास सुरू होतो, त्याचे पत्रे होतात, पत्र्यांना आकार येतो, चारी दिशांतून मोटारीचे नाना तऱ्हांचे सुटे भाग येतात, कॉम्प्यूटर्सच्या

साहाय्याने ज्याला ज्या रंगाची आणि ज्या ढंगाची मोटर हवी, तिचे हे सुटे भाग आकड्यांवरून टांगलेले असतात, ते आपोआप इष्ट स्थळी सरकत येतात. ठिकठिकाणी तीन-चार फूट खोल अशा चरांत स्क्रू फिरविणारे कामगार उभे असतात. नेमून दिलेले भाग ते स्क्रू पिळून जोडत असतात, मोटर बनत जाते, चाके बसतात, दारे बसतात, काचा बसतात, दिवे बसतात, यंत्रे बसतात, आणि पाहता-पाहता मोटर तयार होऊन बाहेर पडते. जिलब्या तळाव्या, तशा मोटरी तयार होतात. शेवटल्या थांब्याला आली, की तिच्यात पेट्रोल भरले जाते. ड्रायव्हर आत चढतो आणि गाडी रस्त्याला लागते! दिवसाला आठ-आठशे नव्या-कोऱ्या मोटरी. फोर्डचा असा हा एक कारखाना झाला. असे कितीतरी कारखाने दिवसातून हजारो मोटरी तयार करीत असतात. मग जाहिरातपटू नाना युक्त्या योजून नव्या मोटरींची स्तुतिस्तोत्रे गातात. रेडिओ-सिनेमा-टेलिव्हिजनवरून त्या नव्या मोटरींचा नुसता जयघोष चाललेला असतो. अमेरिकेत आता तर जवळ-जवळ दर माणशी मोटर आहे. नवे मॉडेल आले, की वर्षापूर्वी घेतलेली गाडी नकोशी होते. शिवाय, आपल्याला जुनाट म्हणतील ही भीती! मातीमोलाने जुनी मोटर फुंकून टाकायची आणि नवी घ्यायची.

त्यातून असल्या वस्तू हप्तेबंदीने मिळतात. अमेरिकेतल्या घराघरातून दिसणारे फ्रीज, फर्निचर, नाना तऱ्हांची विजेवर चालणारी उपकरणी, एवढेच नव्हे, तर घरसुद्धा हप्त्याहप्त्याने पैसे भरून मिळते. त्यामुळे वस्तू घेत सुटायचे आणि त्या वस्तूंचे पैसे भरण्यासाठी राबत सुटायचे! त्यातून सतत बदलणाऱ्या फॅशन्स! विंटर फॅशन्स, समर फॅशन्स, ख्रिसमस् फॅशन्स! गेल्या थंडीतला कोट ह्या थंडीत चालत नाही. गेल्या महिन्यातला झगा ह्या महिन्यात चालत नाही. सासूबाईंची पैठणी सूनबाई वापरताहेत, हा प्रकार नाही! फेकून द्या! झगे चारचौघांत दिसतात तरी. पण अन्तर्वस्त्रांच्यादेखील फॅशन्स महिन्या-महिन्याला बदलतात. स्त्रियांच्या केशभूषाकारांचाही धंदा भयंकर तेजीत. आता तर शेकडा नव्वद बायका नाना तऱ्हांच्या केशरचना केलेले टोपच

वापरतात. त्यामुळे प्रत्येकीकडे डझन-डझन टोप! पण ही झाली तारुण्य ओसरत आलेल्या बायकांची धडपड. साठीतल्या म्हाताऱ्यादेखील वार्धक्यातल्या सुरकुत्या बुजवायच्या फिकिरीत. तर नवयौवना आता केस मोकळे सोडून लक्तरांत वावरण्यात धन्यता मानीत असतात. पण एकदा पंचविशीत आल्या, की त्यांची गणना जुन्यांत होते. मग कायमच्या जोडीदाराची शोधाशोध! दैवयोगाने एकमेकांची जोड जमली, तर ठीक. नाहीतर पतंग भिरभिरत, झोले घेत, फाटत-फाटत एकलकोंड्या वार्धक्याकडे चालला!

ह्या भ्रमिष्टांच्या समाजात घेरी आणणारी अस्थिरता हेच सत्य आहे. कुटुंबसंस्था तर अशी काही डगमगू लागली आहे की, हे जहाज कुठे फुटणार ते कळत नाही! हाताशी मोटर आणि चांगले रुंद गुळगुळीत गतिमार्ग असल्यामुळे माणसे शंभर-शंभर-दीड-दीडशे मैलां-वरून कामधंद्याला येतात. फारच श्रीमंत स्वतःच्या विमानांतून येतात. त्यामुळे उपनगरांतून सारा पुरुषवर्ग दिवसभर घराबाहेर. बहुतेकांच्या बायकाही नोकरीधंद्याला जातात. त्यातून अनेक समस्या आणि त्या समस्यांहूनही भयानक असे नवे अनाचार. त्यातला एक प्रकार म्हणजे 'वाइफ स्वॅपिंग!' अनेक जोडपी शरीरसुखासाठी आपापसांत अदला-बदल करतात. नित्यनूतनामागून भ्रमण्याच्या वेडातले हे आणखी एक वेड! अपस्माराच्या झटक्यासारखे हे नाना अपस्मरांचे झटके! ह्या स्मरलीलांतली आणखी एक अगाध लीला म्हणजे समकामी पुरुषांची आपापसांत लग्ने! म्हणजे लग्नात वधू नाहीच. दोघेही वर. ह्या विकृतीचा इतका चमत्कारिक परिणाम झाला आहे की, दोन मित्र एकत्र हिंडत-फिरत असले, तर ते आता अनैसर्गिक मानले जाते! समसंभोगी लोकांचाही आता पंथ निघाला आहे. त्यांची अधिवेशने होतात. त्यांना 'गे' म्हणजे 'आनंदी' म्हणतात! भलताच आनंद!! विवाहाच्या कायद्यात बदल करण्याची ह्या 'गे' लोकांची चळवळ सुरू झाली आहे. म्हणजे आईबापांना नवी भीती. मुलगा घरात सून आणणार की जावई! 'हा आमच्या मुलाचा नवरा!' अशी ओळख करून द्यायची पाळी

येतेय की काय, ही भीती !

रोज काही तरी 'नवे' पाहिजे. मनाला आणि देहाला नव्या झिणझिण्या पाहिजेत, डोळ्यांना नवे दृश्य पाहिजे. उन्हाळ्याच्या सुट्या झाल्या, की मोटरी-स्कूटर तर जाऊ दे, मोटरीमागे जोडलेले घरच्या घर घेऊन ही माणसे शेकडो मैलांचे प्रवास करीत असतात. एके काळी निदान घर ही तरी स्थिर वस्तू होती. पण आता घरांनाही चाके फुटली आहेत. अगदी घरासारखी घरे ! बसायू-उठायची खोली, शयनगृह, पाकगृह, सगळे काही त्यात असते. फक्त खाली आठ दहा चाके ! त्यातून भ्रमन्ती चाललेली. असल्या फिरत्या घरांसाठी जागजागी मोकळी मैदाने आहेत. त्या मैदानातल्या जागा पैसे भरून अडवायच्या. काही सुंदर अरण्ये आहेत, तिथे तंबू घेऊन जायचे. मोकळ्यावर रहायचे. पण त्या अरण्यात सुटीच्या दिवसांत हजारो तंबू पडलेले असतात. म्हणजे पुन्हा भयंकर गर्दी ! फक्त मनाची समजूत करून घ्यायची, की आपण शहरापासून दूर-दूर आलो ! तिथेही पोर्टेबल टेलिव्हिजन आहे. रात्र-रात्र नाच-गाण्यांचा उच्छृंखल दंगा आहे पण भ्रमंतीतून शांती लाभेल, अशीही एक श्रद्धा आहे.

असल्या ह्या दिशाहीन भ्रमंतीतूनच जगभर हिंडणाऱ्या अमेरिकन टूरिस्टांचा उदय झाला. आता 'टूरिझम' हा फारच प्रचंड धंदा झाला आहे. इतकेच नव्हे, तर अमेरिकन टूरिस्टांना आपापल्या देशात ओढून आणण्याची चढाओढ सुरू झाली आहे. कुठलीही प्राचीन वास्तू किंवा दृश्य सतत कॅमेऱ्याने टिपीत भ्रमण करणाऱ्या ह्या टूरिस्टांना 'भ्रमिष्ट'च म्हणायला हवे ! भारतातल्या स्मशानांचीदेखील आता 'टूरिस्ट अॅट्रॅक्शन सेंटर्स' झाली आहेत. हिंदूंच्या प्रेतदहनाचे ह्या लोकांना भयंकर विकृत आकर्षण ! ताजमहालपेक्षाही, जिथे किड्यासारखे मानवी जीवन वळवळत असते असल्या झोपडपट्ट्या पाहण्याचा उत्साह मोठा ! कारण समृद्ध अमेरिकेतल्या लोकांना त्यांत 'न्यू' आणि 'एक्सायटिंग' असे काही-तरी पाहायला मिळते. त्यांची 'एक्साइटमेंट' कशाने होईल, सांगता येत नाही. दिवाकरांच्या एका नाट्यछटेत एक हलवाई आपल्या साखरेच्या

उंटाची आणि हत्तीची विक्री करीत असतो. इथे तर मिठाईवाले माणसाच्या आकाराचे माणूस करतात. चॉकलेट, साखरेचा रंगीबेरंगी पाक, ह्यांतूनच. पण सारा बनाव आडव्या पडलेल्या जिवंत माणसासारखा. मग त्याच्या फाडलेल्या पोटात साखरेची आतडीसुद्धा असतात. त्यांची चिरफाड करून तो 'माणूस' खाणारी गिऱ्हाइकेदेखील चवीने त्या हलवायाने केलेल्या साखर-पुतळ्याचे नाक, कान, डोळे, काळीज मजेत खात असतात! "हौ एक्सायटिंग!"

ह्या 'हौ एक्सायटिंग'मधूनच असंख्य समस्या निर्माण झाल्या आहेत. कित्येक खून केवळ खुनाच्या एक्साइटमेंटसाठी! एका सौंदर्यप्रसाधन-गृहात एक तरुण गेला आणि तिथे केशभूषा करून घेत असलेल्या आठ-दहा बायकांचे काही कारण नसताना पिस्तुलाने त्याने मुडदे पाडले! मुडदे पाडण्यावरच त्या तरुणाचे निर्हेतुक प्रेम होते! आमच्या देशात दारिद्र्यामुळे मरण स्वस्त आहे, पण अमेरिकेत मात्र अतोनात श्रीमंतीमुळे असले मरण स्वस्त आहे. पण नैसर्गिक मृत्यू भयंकर महाग. 'दफन' म्हटले, की जिवंत मरण ओढवते. आपल्या मंगल कार्यालय-वाल्यांसारखे तिथले अमंगल कार्यालयवाले फर्स्ट क्लास–सेकंड क्लास–थर्ड क्लास–कार्यशोभा करून देतात. आपण फक्त मुडदा आणि पाच-पंधरा हजार रुपये त्यांच्या हवाली करायचे! बाकी बॅण्ड, पाद्री, शव-पेटिका, खड्डा खणणे, हारतुरे, फोटो, वर्तमानपत्र-प्रसिद्धी, 'करस्या-करस्याकडे पाहायला नको!'

मला तर वाटतं, अमेरिकेत जगण्यापेक्षा मरणे अधिक महाग आहे. मरणेच कशाला, साधे आजारी पडणेही महाग. पण सगळे आजार परवडले, दाढदुखीचा आजार हा माणसाला दिवाळेच फुंकायला लावतो. दातांचे डॉक्टर एकेका दाताबरोबर अक्षरशः हजार-हजार रुपये उपटतात! दंतवैद्यकी ही एक प्रतिष्ठित वाटमारी आहे. माझ्या एका मित्राच्या बायकोच्या दातसफाईचे बिल ऐकल्यावर मला वाटले की, आमच्या भारतीय डेंटिस्टाने तेवढ्या पैशांत राणीच्या बागेतल्या डझनभर सुसरींचेदेखील दात साफ करून दिले असते! पण दंतवैद्याकडे जाणे

आणि मग त्यासंबंधी पार्टीमध्ये बोलणे ह्याला विलक्षण सामाजिक प्रतिष्ठा आहे. आपल्याकडे जसे ' काल आम्ही ताजमध्ये लंचला गेलो होतो, तिथे–' या तिथे काय झाले, ह्याला महत्त्व नसते; 'ताजमध्ये लंचला गेलो,–' हे ऐकवणे महत्त्वाचे असते; तसेच 'सॉरी–उद्या नाही बाई मला जमायचं रमी खेळायला–माझी आमच्या डेंटिस्टची अपॉइंटमेंट आहे–' हे वाक्य, ऐकणाऱ्या बाईच्या दातांवर टिच्चून मारायचे असते ! कारण ह्या देशातले सारे मोठेपण तुमच्या बँकबुकावर असते ! ' सर्वे गुणाः काञ्चनमाश्रयन्ते ' हे खरे, पण ह्या देशात डॉलरचा उल्लेख जितक्या वेळा होत असेल, तितका इतर कुठेही होत नसेल. टेलिव्हिजनवरून तासन्-तास हजारो डॉलर्सच्या बक्षिसांचे कार्यक्रम चालू असतात. साहित्य, संगीत, कला, सगळ्यांचे यश त्यातून किती अब्ज डॉलर्स मिळाले, ह्याच्यावर जोखले जाते. त्यामुळे जीवनातल्या प्रत्येक कृतीचे पर्यवसान डॉलर्सच्या संग्रहात होते. हे शिक्षण बालपणापासून मिळत असते. नवऱ्याच्या खिशातले डॉलर्स संपले, की बायको संपली ! बापाच्या खिशातले डॉलर्स संपले, की मुले घर सोडून निघाली ! विलक्षण साखर-पेरणी करून हप्तेबंदीने घर-फर्निचर-फ्रीज-वॉशिंग मशीन गळ्यात बांधणाऱ्या विक्रेत्याचा हप्ता चुकला, की त्याने साऱ्या कुटुंबाला घरा-बाहेर काढलेच !

ह्या साऱ्याचा उबग आलेल्या तरुण पिढीनेही बुडी घेतली, ती अफू-गांजासारख्या भयानक व्यसनात ! वरवर पाहिले, तर किती सुंदर दिसते सारे काही ! दृष्ट लागण्यासारखी घरे. सुंदर बगीचे. बाजारात जावे, तर अन्नधान्य-फळफळावळ-फुले-दूधदुभते पाहूनच डोळे दिपतात. वॉशिंग्टन-मधून मी हिंडत होतो. कोट्यवधी डॉलर्स खर्च करून बांधलेले ' केनेडी नाट्यगृह ' तिथल्या पोटोमॅक् नदीच्या तीरावर उभे आहे. त्या विराट नाट्य-गृहात नाटकांचे आणि संगीताचे एका वेळी तीन कार्यक्रम चालतील, अशी विशाल सभागृहे आहेत. त्या नाट्यगृहाच्या गच्चीवरून वॉशिंग्टन शहराचा देखावा काय सुंदर दिसतो ! पोटोमॅक् नदी संथ वाहत असते.

" काय सुंदर नदी आहे ! अशा वर्षभर तुडुंब वाहणाऱ्या नद्या

असल्यावर काय पाहिजे –"

" फक्त दिसायला सुंदर आहे ही नदी ! "

" म्हणजे ? "

" सगळं पाणी पोल्यूटेड् आहे – दूषित आहे. एक घोटभर पाणी पिण्याच्या लायकीचं नाही. " माझा अमेरिकेत राहणारा मित्र म्हणाला. " इथं सगळंच असं आहे. माझ्या ऑफिसमधल्या मित्राची आई वारली. ऑफिसात नेहमीप्रमाणे आमचा हा अमेरिकन् कलीग् धंद्याची बात करीत होता. मी चाचरत म्हटले, 'तुझी आई वारल्याचं कळलं, – वाईट झालं – तू फ्यूनरलला केव्हा जाणार ?' त्याची आई जवळच्या एका सबर्बमध्ये राहत होती. 'फ्यूनरलला मी कशाला ? फ्यूनरल कंपनीला मी फोनवरून कळवलंय – ते घेतील काळजी –' हे त्याचं उत्तर ! "

आणि ह्या देशात 'मातृदिन' खूप मोठ्या प्रमाणावर साजरा करतात ! मला अमेरिकेतल्या पोष्टाचा पत्ता सापडला. पण ही अमेरिका म्हणजे काय, याचा पत्ता मात्र लागला नाही ! खरं म्हणजे खुद्द अमेरिकनांचाच स्वतःचा पत्ता हरवला आहे !

## मिस्टर सान्फ्रान्सिस्को

प्रथमदर्शनी प्रेमाला द्वितीय दर्शन हा उतारा आहे, असे म्हणतात. एखाद्या शहराची पहिली भेट मन जिंकून जाते आणि दुसऱ्या भेटीत आपण पहिल्या भेटीत उगीच हरलो, असे वाटू लागते. सोनेरी सान्फ्रान्सिस्कोने ही समजूत खोटी पाडली. जगातली खूप सुंदर-सुंदर शहरे मला पाहायला मिळाली. पण दुसऱ्यांदा तिथे जायला मला भीती वाटते. पण ह्या सान्फ्रान्सिस्कोने मात्र पहिल्या भेटीइतकीच नव्हे, तर त्याहूनही अधिक भुरळ दुसऱ्या भेटीत टाकली.

जे मागाल ते देते, असे म्हणणारी ही सुवर्णनगरी आहे. इथे हाकेच्या अंतरावर डोंगरमाळ आहे, अथांग प्रशांत सागर आहे, नदी आहे, विस्तीर्ण सरोवरे आहेत, गगनचुंबी इमारती आहेत आणि केवळ परी-कथेतल्या मंडळींनी रहावे, अशी देखणी चिमुकली घरे आहेत. इथे मोटरींइतक्याच छोट्यामोठ्या बोटीही भिरभिरतात. डोळे गरगरायला लावणाऱ्या प्रचंड पुलावरून भरधाव येणाऱ्या मोटरींना डोंगरावरून गिरक्या घेत जाणाऱ्या चिमुकल्या गल्लयांतून देतादेताने वाट काढावी

लागते. इथे माणसांची गर्दी आहे; निवान्तताही आहे. हजारो पानांचा एखादा सुरस ग्रंथ वाचावा, तसे हे शहर वाचीत जावे. आणि हा ग्रंथ-देखील कसा? वेळोवेळी निरनिराळ्या प्रतिभावंतांनी भर टाकलेल्या महाकाव्यासारखा! इंग्रजीत असल्या महाकाव्यांना 'एपिक्स ऑफ् ग्रोथ' — 'वर्धमान महाकाव्य' — म्हणतात. सान्फ्रान्सिस्को हे निसर्गाने आणि माणसाने मिळून रचलेले एक वर्धमान महाकाव्य आहे.

सान्फ्रान्सिस्कोमधल्या विविध आकारांच्या नुसत्या खिडक्या पाहायच्या म्हटल्या तरी काही महिन्यांचा मुक्काम टाकावा लागेल! हे शहर आधुनिक शहरांसारखे आधी कागदावर आखून घडवलेले नाही. तसली शहरे रेखीव असतात. पण शो-केसमधल्या प्रेक्षणीय वस्तूंसारखी. हाउसिंग बोर्डाने बांधलेल्या वसाहतीतसुद्धा बागा असतात, पोहण्याचे तलाव असतात, रंगमंदिरे असतात, क्रीडांगणे असतात, — सगळे काही असते. पण त्या वसाहतींना इतिहास नसतो. असलाच तर बोर्डाच्या सदस्यांनी लाच खाल्ल्याचा! सान्फ्रान्सिस्कोत ज्यांना शिस्तच हवी, त्यांना शिस्तही आहे. पण ज्यांना नुसत्या शिस्ती पलीकडल्या आणि सोयींपलीकडल्या जीवनाची ओढ असते, त्यांना तर सान्फ्रान्सिस्को हा स्वर्ग वाटेल. हे डोळ्यांत भरणारे आणि मनात घर करून रहाणारे शहर. एका क्षणात आपला परकेपणा नाहीसा करणारे!

इथे पूर्व-पश्चिमेचे मजेदार मीलन आहे. नाना देशांतली आणि नाना वंशांतली माणसे इथे कशी नानारंगी पिसांच्या पक्ष्यांसारखी जमली, आणि आपापली घरटी बांधून पिसे फुलवीत राहिली. इथल्या बंदरावर इटालियन 'पिझ्झा-पाय्था' खाऊन दुपारचे जेवण करावे. किंवा ताज्या मासळीचा, कुल्र्यांचा आणि कालवांचा स्वाद चाखावा; आणि रात्री चिनी कसब्यात जाऊन पाककौशल्याची परमावधी अनुभवावी. आणि इतकी विविधता असून भिन्न संस्कृतींचा नुसताच काला झालेला नाही. प्रत्येक संस्कृती आपली चव दाखवून आहे. वैशिष्ट्ये टिकवून आहे. एखाद्या इष्ट देवतेची अनेकरंगी फुलांनी पूजा बांधावी, तशी इथल्या विविध सांस्कृतिक परंपरांनी ह्या नगरीची पूजा बांधली

आहे. इथे बर्कले आणि स्टॅनफोर्ड यांसारखी विश्वविद्यालये ज्ञानोपासनेत दंग आहेत. तिथे 'प्रसादही प्रमादही प्रमोद आणखी दया' ह्या यौवनाच्या साऱ्या वैशिष्ट्यांची मौज पाहावी. इथल्या त्या विस्तीर्ण उद्यानांत तर पृथ्वी-तलावरच्या सर्व वृक्षवेली आणि झाडेझुडपे आहेत. विराट आफ्रिकी वृक्षां-प्रमाणे नाजुकांतली नाजूक जपानी चेरीदेखील इथे आहे. ऊनपावसाच्या आणि आलटून-पालटून येणाऱ्या थंड आणि ऊबदार झुळकांच्या लपंडावाचे तर या शहराला वरदान आहे! मधूनच उत्तरेचे वारे तिथल्या हिमखंडांवरून वाहत-वाहत येताना गारव्यात विलक्षण कैफ घेऊन येतात आणि ऑक्टोबरात एखाद्या दिवशी वाऱ्याचे डोके भयंकर भडकते. कुणीसे गमतीने सांगत होते की, अशा वेळी बंबवाले एकमेकांच्या अंगावर पाण्याचे फवारे उडवून स्वतः आधी थंड होत असतात, आणि पोलिस गंजिफ्रॉकात रहदारीचे नियंत्रण करतात.

पूर्वीच्या काळी धनिक लोक इच्छाभोजन घालीत. सान्फ्रान्सिस्को शहरच ज्याची जी इच्छा असेल, त्याला जणू काय इच्छाभोजन घालायला सिद्ध आहे. मग ती इच्छा पंचेन्द्रियांपैकी कुठल्याही इन्द्रियाची असो. इथे वस्तूंचे आदानप्रदान आहे, विचारांचे आहे, कलांचे आहे आणि उच्चनीच वासनांचेही आहे. त्यांतून हे शहर कसे स्वतःचे एक देखणे व्यक्तिमत्त्व घेऊन उभे आहे. अमेरिकेतल्या इतर महानगरांप्रमाणे इथेही रोजगाराची आणि धनसंचयाची विपुल संधी आहे. शहरी सोयी आहेत. पण त्यापलीकडे आणखी असे काहीतरी या शहरात आहे की, इथे असताना एखाद्या असामान्य व्यक्तीच्या स्वभावातल्या नाना प्रकारच्या मोहक पैलूंचे दर्शन घडत गेल्यासारखे वाटते. पॅरिसमध्येही अशीच एक जादू आहे. पण तिथे भाषेची अडचण! इथे ती नाही. पॅरिस जाल तिथे फ्रेंच संस्कृतीचाच शिक्का उठवीत जाते. सान्फ्रान्सिस्कोला कुणीसे 'अतिपश्चिमेचे पॅरिस' म्हटल्यावर एक अस्सल सान्फ्रान्सिस्कोवाला म्हणाला, "हे पॅरिस आहे, नेपल्स आहे, क्योटो आहे आणि हाँगकाँगही आहे. पण हे सगळे असूनही हे सान्फ्रान्सिस्को आहे."

एक तर कॅलिफोर्निया राज्याला निसर्गाने आपले वैभव उदार हातांनी दिले आहे. मैलोन्‌-मैल फुलांच्या बागा. फळेही तशीच. मित्रावरुणांनी हातात हात घालून ही भूमी समृद्ध केली आहे. इथे पर्जन्यामागून ऊन धावत येते. धरती जरा कुठे उन्हाने गोरीमोरी झाली, की आकाशातून धारास्नान सुरू. जरा हाशहुश्श करते आहे असे वाटले, की उत्तरेकडच्या शीतल वाऱ्याचा पंखा चालू! त्यामुळे सान्फ्रान्सिस्कोच नव्हे, तर भोवतालच्या शेकडो मैलांच्या परिसरात गर्द राया, फळभाज्यांचे हजारो एकरांचे मळे, फुलांचे बगीचे, घनदाट वने आणि उपवने यांशिवाय बात नाही! कॅनडात किंवा अमेरिकेत हिंडताना वृक्षांची सोबत कुठेच सुटत नाही. पण कॅलिफोर्नियाच्या ऊनपावसाच्या खेळात झाडे कशी रसरसून आलेली असतात.

निसर्ग रसरसलेला असला, की जीवनही रसरसते. सान्फ्रान्सिस्कोच्या मुक्कामात सतत जाणवत होते ते हे रसरसलेपण. व्हॅंकूव्हरहून विमानाने निघाल्यापासून खाली पाहावे तिथे हिरवळ आणि पाण्याचे पाट दिसत होते. हवा स्वच्छ होती. कुठे एखादी तुरळक ढगांची पलटण रेंगाळत निघालेली. सान्फ्रान्सिस्कोच्या विमानतळावर मला उतरवून घ्यायला राजा गव्हाणकर येणार होते. राजाभाऊंचा आणि माझा पूर्वपरिचय नव्हता. परंतु विमानातून उतरलेल्या गोऱ्यांतून मला निवडणे त्यांना जड गेले नाही. परदेशच्या प्रवासात माझ्या पुष्कळ नव्या ओळखी झाल्या. त्यांत इतक्या अल्पपरिचयात राजाभाऊ आणि त्यांची पत्नी मोनिका यांनी खूपच जिव्हाळा उत्पन्न केला. ह्या सुसंस्कृत तरुण जोडप्यावरोबर सान्फ्रान्सिस्कोसारख्या जादूनगरीत राहणे हा एक आनंद द्विगुणित करणारा योग होता. माणसे एखाद्या शहरात वर्षानुवर्षे राहतात. पण त्यांचा त्या शहराशी स्नेहच जमलेला नसतो. वर्षानुवर्षे पुण्यात राहणाऱ्या माणसाने बालमूर्तिऱ्यांच्या मोसमात मंडईत जाऊन ती काकड्यांची रास पाहिली नसेल, तर तो पुण्यात राहिला काय किंवा आणखी कुठे कडमडला काय, — अर्थ एकच! तुमचा देवावर विश्वास असो वा नसो, — कोल्हापूरला राहणाऱ्या माणसाने नवरात्राच्या उत्सवात

धक्काबुक्की करून अंबाबाईचे दर्शन घेतलेच पाहिजे. तिथे उसळलेल्या गर्दीची खुषी अंबाबाईच्या मुखमंडलावर दिसते, ती पाहिली पाहिजे. आपल्या राहत्या घरासारखा आपल्या राहत्या शहराशी जीव गुंतवला पाहिजे. सगळ्यांनाच जीव गुंतवायला सान्फ्रान्सिस्कोसारखे शहर मिळेल, असे नाही. अर्थात् सान्फ्रान्सिस्कोत रहायला मिळाले, म्हणून त्या शहराशी सगळेचजण असा स्नेह संपादन करतातच, असेही नाही. सुदैवाने गव्हाणकर पतिपत्नी ह्याला अपवाद होते.

राजाभाऊंबरोबर आम्ही सान्फ्रान्सिस्कोची दोस्ती संपादन करीत होतो. खरोखरीच गळ्यात पडावे, अशी ही नगरी! भारतात अवध देशातील संध्याकाळ आणि माळव्यातील रात्र — 'शामे अवध' आणि 'शबे मालव' — सगळ्यांत सुखद मानली जातात. सान्फ्रान्सिस्कोत तर दिवसाच्या प्रत्येक प्रहराला मजा आहे. एखाद्याच्या गायनात 'चैन' असते, तशी ह्या शहराच्या स्वभावातच 'चैन' आहे. पण इथली संध्याकाळ आणि तीमागून उमलत जाणारे,— दिलीप चित्र्यांच्या भाषेत सांगायचे तर—रात्रीचे 'पद्मपात्र' अद्‌भुत आहे. वर, खाली — जिथे पहावे तिथे दिव्यांची अपूर्व शोभा! जहाजांवरचे ते तरंगते दिवे. डोंगर-उतरणींवरच्या त्या घरांत लुकलुकणाऱ्या दिव्यांचे तर दुरून पाहताना झगमगते गालिचे उतरल्यासारखे दिसतात. ऐलतीर पैलतीराला जोडणाऱ्या त्या गोल्डन ब्रिज–बे ब्रिज यांसारख्या प्रचंड पुलांवरच्या दिव्यांच्या झाले टाकीत गेलेल्या दीपमाळा! इथे रोजचीच दिवाळी. इथला सूर्यदेखील मावळता-मावळता असंख्य खिडक्यांच्या तावदानांतून प्रकट होऊन सागरतळाला जातो आणि मग लक्षलक्ष नक्षत्रे लेऊन रात्र प्रकटते. आणि सान्फ्रान्सिस्कोचे निशाजीवन सुरू होते. ती रात्र भोगणारा प्रत्येक पुरुष आता मदन आहे आणि प्रत्येक स्त्री रती आहे. सान्फ्रान्सिस्कोची हवा हे वरदान साऱ्यांनाच देते. आता आपले कायदेशीर वयाचे दाखले विसरायचे. सारी हॉटेल्स, मद्यालये, रंगमंदिरे, गणिकांचे महाल तुडुंब भरलेले.

अशाच एका रात्री आम्ही नाटक पाहायला निघालो. नाट्यगृहाबाहेर

झरझरझरझर मोटारी येऊन लागत होत्या. आतून विविध वेषभूषा आणि केशभूषा केलेल्या गौरांगना उतरत होत्या. त्यांतच जातीच्या सुंदरांना काहीही शोभते, अशा विश्वासाने वाटेल तसला पोषाख घातलेले आणि भरमसाट वाढू दिलेल्या केसांचे तरुण, तरुणीही मिसळत होते. दहाबारा वर्षांपूर्वी मी सान्फ्रान्सिस्कोच्या नाट्यगृहात 'ऑलिव्हर ट्विस्ट' ही संगीतिका पाहिली होती. योगायोग असा की, बरोबर दोन नोव्हेंबरलाच मी पुन्हा त्याच नाट्यगृहात 'सिरॅनो द बर्जिरॅक'चा प्रयोग पाहत होतो. सान्फ्रान्सिस्कोच्याच नाटक-मंडळीने हा प्रयोग केला. 'सिरॅनो' हे मुळातच मोठे गोड नाटक आहे. गडकऱ्यांचे 'राजसंन्यास' जसे मराठीचे मधुर घुटके घेतघेत पाहायचे, तसे हे नाटक! एका बुद्धिवान्, कविमनाच्या, पण लांबलचक नाकामुळे कुरूप दिसणाऱ्या शूर शिले-दाराची ही दुर्दैवी कहाणी. माझ्या शेजारी एक टेक्ससहून आलेले जोडपे बसले होते. दोघेही तिथल्या विद्यापीठात अध्यापन करीत होते. मध्यंतरात त्यांच्याशी परिचय झाला. ती बाई म्हणाली, "काय सुंदर नाटक आहे! कितीही वेळा पाहिलं, तरी समाधान होत नाही!" मी ह्या नाटकाचा सुंदर चित्रपट पाहिला होता. व्होसे फेरार नावाच्या नामांकित नटाने सिरॅनोचे काम केले होते. पण नाटक हे नाटक म्हणून पाहताना काही निराळाच आनंद मिळत होता. मी त्या बाईला म्हणालो, "हे नाटक आपण सान्फ्रान्सिस्कोत पाहतो आहो, त्यामुळे तर ते अधिकच गोड वाटतं."

"का?"

"कारण हे सान्फ्रान्सिस्को शहरदेखील कुणाच्या तरी चिरंतन पण अपूर्त प्रेमात पडल्यासारखंच मला वाटतं!"

ती बाई पटकन् म्हणाली, "देअर इज ऑल्वेज अ टच ऑफ सॅडनेस अराउंड द मोस्ट ब्यूटिफुल इन् लाइफ! – अप्रतिम सौंदर्याला कसल्या तरी अलौकिक कारुण्याचा स्पर्श असतो."

"नॉट् नेसेसरिली, डार्लिंग!" तिचा नवरा म्हणाला, "आय नेव्हर फाउंड इट् अराउंड यू! – असंच काही नाही, डार्लिंग. ('डार्लिंग' ह्या

शब्दाला मराठी प्रतिशब्द नाही.) तुझ्याभोवती मला नाही कधी आढळला तो असल्या अलौकिक कारुण्याचा स्पर्श ! " असे म्हणून त्या फोय्यरमध्ये त्याने आपल्या त्या 'मोस्ट ब्यूटिफुल डार्लिंग'ला प्रेमभराने जवळ घेतले. ( अमेरिकन बायकादेखील कधीकधी लाजून लाल होतात. ) मी ओळखले की, त्या नाटकाइतकेच सान्फ्रान्सिस्कोने त्यांना झपाटले आहे ! नाटक संपवून बाहेर आलो. रात्र अजूनही जवानीत होती.

एखाद्या शहरात अशी काही जादू असते की, तिथे सारखे चालत रहावे असे वाटते. पॅरिस हे एक असे शहर आहे. सान्फ्रान्सिस्को हे दुसरे असे शहर की, चालण्याविषयी खास प्रेम नसणाऱ्या माझ्या-सारख्यालाही सतत वाटे की ह्या शहरात मोटरीतून हिंडू नये; नुसते पायीपायी हिंडत रहावे. पॅरिससारखेच ह्या सान्फ्रान्सिस्को शहरात अमुक-एकच स्थळ पाहावे, असे नाही. उदाहरणार्थ, वॉशिंग्टनमध्ये 'लिंकन्स मेमोरियल' किंवा 'वॉशिंग्टन मेमोरियल', जिथे केनेडीचे थडगे आहे ती आर्लिंग्टन दफनभूमी ही स्थळे पाहिल्यावर अमुक-एक स्थळ पाहायचे म्हणून नव्हे, तर मनाला येईल ते पाहत हिंडावे म्हणून हिंडावे, असे नाही वाटत ! वॉशिंग्टन रेखीव आहे. रस्ते रुंद आहेत. झाडे आहेत. नदी आहे --- सगळे काही आहे ! पण ते शहर आपले दोस्त नाही होत. तिथल्या 'स्मिथ्सोनियन इन्स्टिट्यूशन'मधली संग्रहालये आणि कला-दालने थक्क करून टाकतात. तिथले 'केनेडी सेंटर' तर असू नये तितके भव्य आहे. म्हणजे तिथे नाटक पाहायला किंवा संगीत ऐकायला जाणाऱ्या रसिकाला आपण किती क्षुद्र आहोत, असेच वाटायला लागते. ती इमारत जवळीक उत्पन्न करीत नाही. 'आलात ? — ठीक आहे. पण तसा तुमचा-आमचा काही संबंध नाही' -- असे सांगतच आपल्या श्रीमंतीला जपणाऱ्या बड्या माणसांसारख्या काही इमारती आणि शहरे असतात. सान्फ्रान्सिस्को तसे खूपच भव्य आहे. एका विशाल उप-सागराच्या गळ्यात हात टाकून उभे आहे. पर्वतांचे किरीट झगमगत असतात. एवढे सारे असूनही त्या शहराच्या स्वभावात असा काही गोडवा आहे, की घटकेत ते आपल्याला जवळ घेते. अवघ्या पाच-सात

दिवसांच्या सहवासात त्या शहराने मलादेखील सान्फ्रान्सिस्कन् बनवून टाकले. हे शहर सारखे ' अरे इकडे पाहा ना, ' म्हणत असते. म्हणूनच की काय कोण जाणे, या शहरातल्या घरांना खिडक्यांचा भारी शौक! पॅरिसच्या फुटपाथवरच्या हॉटेलात बसून जसे तास-न्-तास ते वाहते रस्ते पाहत बसण्यासारखा आनंद नाही, तसाच ह्या सान्फ्रान्सिस्कोतल्या घरातल्या खिडकीतून बाहेरचा देखावा तास-न्-तास पाहत बसावा. प्रत्येक रस्त्याला आणि आळीला आपापल्या खिडकीतून काही-ना-काही तरी पाहत बसावे असे आहेच.

याखेरीज अस्सल सान्फ्रान्सिस्कोवाल्यांनी मोठ्या कसोशीने जतन करून ठेवलेल्याही काही गोष्टी आहेत. ह्या शहराने नागरिकांची सोय एवढाच व्यावहारिक विचार केला नाही. एके काळी ट्रामगाडी हे पब्लिकला भलते सोयीचे आणि स्वस्त वाहन होते. आता प्रत्येकाजवळ मोटर आली. मोटर-सायकली आल्या. बसेस् आल्या. पण सान्फ्रान्सिस्कोने एखाददुसरी ट्राम अजूनही संभाळली आहे. तिला ' केबल कार ' म्हणतात. आकाशातून लटकत वरखाली येणारीजाणारी नव्हे. ट्रामसारखी ट्राम. पण लोखंडी दोरखंडावर रस्त्यातून ओढली जाणारी. तिथला कंडक्टरसुद्धा मुंबईच्या ट्राम कंडक्टरसारखा तिकिटांना भोक पाडायचा चिमटा वाजवीत बोलत असतो. त्याचे ते बोलणे ऐकून मला पूर्वीच्या आमच्या ट्राम-कंडक्टरच्या ' माजगाव – पायधुणी – तांबाकाटा बदली करो ऽ ऽ ऽ'-च्या घोषणेची आठवण झाली. जुन्या काळाला जोडणाऱ्या अशा सगळ्या साखळ्या न तोडता त्यांतल्या दोनचार तरी ठेवल्या की बरे वाटते. मुंबईतली शेवटली ट्राम गेल्यावर मला तर आपली आजी गेल्यासारखे दुःख झाले होते. सान्फ्रान्सिस्कोतल्या त्या ट्रामगाडीत बसले, की ते हल्लीचे तसे अफाट शहर पूर्वीच्या चिमुकल्या सान्फ्रान्सिस्कोची आठवण करून देते. वास्तविक ही ट्रामगाडी सान्फ्रान्सिस्कोच्या नगरपालिकेला हल्ली परवडत नाही. तरीही त्यांनी तशा दोनचार ट्रामगाड्या ठेवून दिल्या आहेत. ह्या म्हाताऱ्या ट्रामगाडीचा सान्फ्रान्सिस्कोवाल्यांना खूप अभिमान आहे. घरातल्या म्हातारीसारखीच

तिच्यावर त्यांची माया आहे.

बदलत्या काळाबरोबर शहरालाही बदलावे लागते. सान्फ्रान्सिस्को *शहरातल्या ऐलतीर पैलतीरांना जोडणारे प्रचंड पूल बांधल्यावर* साहजिकच इकडून तिकडे फेऱ्या करणाऱ्या शे-सव्वाशे छोट्या बोटींची गिऱ्हाइकी कमी झाली. तरीही त्या बोटींनी केलेल्या कामगिरीविषयी कृतज्ञता बाळगून ह्या लोकांनी एकदोन जुन्या बोटी तरंगत ठेवल्या आहेत. एखादा म्हातारा नातवाला घेऊन त्या बोटीतून हिंडत जुन्या सान्फ्रान्सिस्कोची कथा सांगत असतो. सान्फ्रान्सिस्कोमधल्या ट्रामेतून जाताना मला दादरहून गिरगावापर्यंत एका आण्यात सहा नंबरच्या ट्राममधून केलेल्या फेऱ्या आठवल्या. चांगला तास–दीड तास लागायचा. सगळी मुंबई पाहत-पाहत जायचे. नाना वस्त्यांचे बदलते रंगढंग ! दादर सोडले, की परळची कामगारवस्ती. पुढे फोरास रोडवरची ती ओंगळ वेश्यावस्ती ! तिथून पुढे मध्यमवर्गीय सभ्यता जपत बसलेले गिरगाव. नाक्यावरचा प्रार्थनासमाज. त्यांच्या प्रार्थनांचे सूर अवघ्या मैला-दीड *मैलावरच्या त्या वासनासमाजापर्यंत कधीच पोहोचू शकले नाहीत.* गिरगावातून म्यूझियमला निघाल्यावर चिराबझारातल्या एखाद्या उपाहार-गृहाच्या दारात तळलेल्या कांद्याच्या भज्यांचा वास नाकात दरवळायचा. आणि जरा पुढे ट्राम सरकली, की पारशी अग्यारीजवळच्या एखाद्या पारश्याच्या घरात संध्याकाळी घातलेल्या चंदनाच्या धुपाचा सुगंध मन प्रसन्न करून जायचा. वासाप्रमाणे नादही. गिरगावातल्या पहिल्या मजल्यावरच्या गायन-क्लासातून कुणाची तरी पेटीवर चाललेली 'कृष्ण-मुरारी'च्या पट्ट्या शोधण्याची आटापीट कानांवर पडायची. आणि धोबी तलावाकडे ट्राम निघाली, की एखाद्या पेद्रू गोन्सालिव्हसची ट्रंपेटची प्रॅक्टिस ऐकू यायची. भुर्रकन् मोटरीतून गेले, की शहर असे घुटक्या-घुटक्यांनी पिता येत नाही.

सान्फ्रान्सिस्को आपली निरनिराळी नाद-गंधांची वैशिष्ट्ये टिकवून *आहे. इथे फ्रेंच, इटालियन, चिनी अशा पाककलेतल्या उस्तादमंडळींनी* जिव्हालौल्याची आव्हाने स्वीकारली आहेत. पण त्यांत चिन्यांचा नंबर

पहिला. इथल्या चिनी कसब्यात शिरले, की आपण अमेरिकेत आहोत, याचा विसर पडतो. चिन्यांनी आपल्या पाककलेच्या सामर्थ्यावर जग जिंकले आहे. ह्या शहरांतली नाना देशांतल्या खाद्यपदार्थांची मजा लुटायला लावणारी असंख्य हॉटेले रोज अशी तुडुंब भरलेली पाहून इथले लोक बहुधा रोज बाहेरच जेवत असतील, अशी मला शंका आली. लाखो टूरिस्ट इथे येत असतात, हे खरे. पण इतकी हॉटेले भरायला ह्या गावातले रहिवासीदेखील चांगले खव्वये असले पाहिजेत. चिनीच काय, पण इथल्या भारतीय भोजनालयातसुद्धा गर्दी होती ती अमेरिकनांचीच ! चिनी भोजन ही एकट्याने खात बसायची चीज नव्हे. किमान दोन माणसे हवीच्च. जितकी अधिक, तितकी चांगली. कारण बऱ्या भरण्यात कंजूषी नसते इथे खास कोट्याधीशांनीच आत शिरण्याचे धैर्य करावे, अशीही भोजनालये आहेत, आणि सर्वसामान्य माणसांसाठीही आहेत. पण चवीत फरक नाही. खरे म्हणजे चवीचा हॉटेलच्या इमारतीच्या भव्यपणाशी आणि इंटीरियर डेकोरेशनशी काही संबंध नसतो. असलाच तर व्यस्त. सान्फ्रान्सिस्कोमधल्या खूप महागड्या हॉटेलांतही मी दहा वर्षांपूर्वी एका अमेरिकन फाउंडेशनच्या कृपेने जेवलो होतो. आता छोट्या-छोट्या हॉटेलसमध्ये जात होतो. मोठ्या हॉटेल्समधून पदार्थांपेक्षा ते पदार्थ भरून आणायच्या पात्रांना महत्त्व अधिक. सान्फ्रान्सिस्कोमधल्या एका लहानशा चिनी हॉटेलवाल्याने आमची तबियत इतकी खूष केली, की, चुकून मी ' हिंदी-चिनी भाई-भाई ' म्हणायच्या घाईला आलो होतो. ह्या हॉटेलात लांब केसांच्या तरुण-तरुणींचीच गर्दी जास्ती होती. गप्पागोष्टींचा भरपूर दंगा चालला होता. सगळी माणसे कशी आपली फार दिवसांची ओळख असल्यासारखी वागत होती. एकमेकांना तिथला ' आजचा ताजा पदार्थ ' कुठला ते सांगत होती. आमच्या पलीकडच्या टेबलावर दोन तरुण आणि दोन तरुणी बसून आम्ही काय मागवतो ते पाहून चिनी भोजनातली आमची जाणकारी अजमावीत होते. आमचे पदार्थ टेबलावर आल्यावर त्यांतल्या एका तरुणाने तिथूनच खुणेने ' क्या बात है ! तुम्हारा भी जवाब नही यार ! ' अशा ढंगात आम्हांला

दाद दिली. त्याच्याबरोबरची पोरगीही भलतीच सुरेख होती. अंगावर जाणूनबुजून टरकावलेले हिप्पीछाप कपडे होते. आणि मोकळे सोडलेले केस खरोखरीच खुर्चीवरून जमिनीपर्यंत आले होते. इतके लांब केस क्वचित पाहायला मिळतात. मीदेखील त्याला ' अशी मैत्रीण मिळवलीस तू! तुझाही जवाब नही यार ! ' म्हणणार होतो. पण अशा वेळी नेमके आमचे भारतीय संस्कार, परंपरा, शील, पावित्र्य, मांगल्य आणि मंडळी आड येतात ! एखादा फ्रेंच माणसाने त्या अनोळखी पोरीचे ते सुंदर केस हातात धरून ' फोर्मिदाब्ल ' म्हणत त्यांचे चुंबनही घेतले असते. आम्ही आमचे लक्ष भोजनाकडे केंद्रित केले ! !

मनात विचार आला : ' छे छे ! ह्या सान्फ्रान्सिस्कोत फार दिवस राहता कामा नये. हां-हां म्हणता हे शहर आपल्याला बिघडवून टाकायचे ! इथे धुंद व्हायला कसल्याही दारूची गरज नाही. हे शहरच बेहोष करते. एखाद्या तरुणीसारखे नाना प्रकारचे विभ्रम आणि लडिवाळपणा करणारी ही यक्षनगरी !

ह्या शहरात एक नागमोडी वळणाचा छोटा रस्ता आहे. पर्वतीच्या टेकडीवरून पायथ्याशी यावे इतक्याच उंचीचा. त्या वाटेवरून फक्त खाली उतरण्याची मोटरींना परवानगी आहे. आता त्या वाटेने किती म्हणून मुरडावे ! तिला ' द मोस्ट क्रुकेड स्ट्रीट इन् द वर्ल्ड ' म्हणतात. असेलही नुसतीच क्रुकेड नाही. एखाद्या छोट्या झऱ्यासारखी डोंगरमाथ्यावरून पायथ्याशी येणारी ही वाट. बरे, त्या एवढ्याशा वाटेच्या वळणावळणावरची घरे इतकी टुमदार की, वरच्या खिडकीतल्या ज्यूलिएटच्या हाताचे खालच्या अंगणात उभे राहून तिच्या रोमियोने चुंबन घ्यावे ! तेवढ्यातल्या तेवढ्यात चिमुकल्या फुलबागा आणि फुलवेली. त्या क्रुकेड स्ट्रीटवरून धडपणाने मोटर पायथ्याशी आणणारा तो खरा सान्फ्रान्सिस्कोचा नागरिक ! राजाभाऊंनी सराईतपणे गाडी खाली आणली. ही क्रुकेड स्ट्रीट कसली ? सान्फ्रान्सिस्कोनगरीची कुरळी बट सुटल्यासारखी ती वाट ! असले कितीतरी लहानमोठे अलंकार ह्या शहराला लाभले आहेत. ह्या शहराच्या सौंदर्याचे रहस्य शोधणारा एक

चित्रकार म्हणाला होता, "मी जगातली खूप मोठमोठी शहरं पाहिली आहेत. पण या शहराला जे एक देणं लाभलं आहे, ते निराळंच आहे. ह्या टेकड्या किंवा पाणी हे नाही मी म्हणत. मला म्हणायचा तो प्रकाश ! अद्‌भुत प्रकाश ! प्रकाशानं झटपट बदलत जाणाऱ्या रंगांची किमया मी ह्या शहराइतकी दुसऱ्या कुठल्याच शहरात पाहिली नाही. राखी रंगातून शुभ्र. लगेच निळा. घटकेत गुलाबी. पाहता-पाहता सोनेरी. पुन्हा गुलाबी....कधीकधी तर साऱ्याच रंगांची एकदम उधळण ! रंगाची नवी छटा आली, की दृश्याचा अर्थही बदलतो. जांभळी टेकडी, पिवळ्या वाटा किंवा एखादं हिरवं घर तुमच्या डोळ्यांदेखत नारिंगी होऊन जात असतं."

तसे ह्या शहराने आघातही खूप सोसले आहेत. प्रचंड आगीत भस्मसात होऊन त्या राखेतून पुन्हा उभे राहिलेले हे शहर आहे. त्याने भूकंपाचे जबरदस्त धक्केही खाल्ले आहेत. त्यामुळेच की काय कोण जाणे, इथली प्रत्येक जुनी वास्तू आणि गल्ली जपण्याकडे अजूनही थोडीफार प्रवृत्ती आहे. आधुनिक जीवनाच्या सोयीसाठी त्यांना काही ठिकाणी जुन्याची जवळीक सोडावीही लागली आहे. त्या उपसागरावर प्रचंड पूल आले आणि फेरीबोटी गेल्या. पण एवढेच जात नसते. बंदर ही एक बोटी जिथे लागतात अशी जागा, यापलीकडे काहीतरी असते. सान्फ्रान्सिस्कोचे जाऊ दे. पणजीच्या बेतीचा पूल झाला. वाफोर गेले ! पण वाफोर गेले म्हणजे माणसा-माणसांना जोडणारी विचारपूस गेली. वाफोराची वाट पाहत चालणाऱ्या सुखदुःखांच्या कथा गेल्या ! 'कितें दामूबाब बरो मूं ?' गेले. 'भुरगी कशीं ?' ही चौकशी गेली. सहज म्हणून दिलेले फेणी पिण्याचे आमंत्रण गेले ! सान्फ्रान्सिस्कोचेही थोडफार तसे होत आहे. त्याला इलाज नाही. पण काही स्थळे मात्र बदलल्या काळावर मात करून उभी आहेत. त्यांतली ती साऱ्या शहरावर डोकी काढून उभी असलेली जुळी शिखरे ! ट्विन् पीक्स् ! प्रकाशाच्या असंख्य लीला दाखवणारी !

एकदा राजाभाऊ म्हणाले, "चला शिखरावर जाऊ या." निघालो

तेव्हाच दिवेलागण होऊन गेली होती. हां-हां म्हणता ते एवढे विस्तीर्ण शहर, तो उपसागर — सारे काही दाट धुक्याची दुलई पांघरून घेऊन गुप्त झाले. आम्ही शिखरावरून यापूर्वी रात्री त्या शहराचा केवढा झगमगता दिमाख पाहिला होता! आता दहा फुटांवरचे दिसत नव्हते. पण तसल्या धुक्यात शिखरावर जाण्याचा शौक करणारे आणखीही वेडे-पीर होते. त्या शिखरावर थेटपर्यंत मोटर जाते. एका दिव्याच्या खांबापाशी एक तरुण-तरुणी एकमेकांना गाढ आलिंगन देत उभे होते. त्या धुक्यात प्रकाशाची अशी काही जादूगिरी झाली होती की, ते जोडपे अधांतरी असल्यासारखे वाटत होते. जातीच्या सुंदरांना काहीही शोभते, तसे ह्या शहराला धुकेदेखील साजून दिसते. थंडी होती. पण त्या थंडीला बोचरेपणा नव्हता. उबदार कपडे घालून हिंडत रहायला लावणारी ती थंडी होती. 'घरात काय बसून राहता? चला बाहेर!' म्हणणारी!

पण सान्फ्रान्सिस्कोत पायीपायी हिंडत राहणे दिवसेंदिवस कठीण होत चालले आहे. अमेरिकन जीवनातली मोटरीपुढे इतर सर्व गोष्टींना गौणत्व देण्याची राष्ट्रीय सवय ह्याही शहराला जडली आहे. सान्फ्रान्सिस्कोतल्या जुन्या सरंजामशाहीतल्या खुणा भराभर नष्ट होऊ लागल्या आहेत. अमेरिकेत तशी सरंजामशाही नसली, तरी इंग्लंडातून आणि युरोपातून येऊन इथे धनाढ्य झालेल्या लोकांनी सरंजामशाहीचा सारा सोनेरी आणि नक्षीदार डामडौल इथेही आणला होता. सान्फ्रान्सिस्कोतल्या रस्त्यातल्या साध्या दिव्यांच्या खांबांचादेखील नक्षीदारपणा त्या जुन्या जमान्याची आठवण करून देतो. पण आता ती सरंजामशाही गेली. आता ट्रॅफिकजामशाहीचा अंमल आहे. अमेरिकन ॲरिस्टॉक्रसीला कुणीसे 'कारिस्टॉक्रसी' म्हटले आहे. पहिली सोय पाहायची, ती मोटरींची. 'पार्क' याचा अर्थ उपवन असा नसून 'कार पार्क' असा घ्यायचा. हजारो मोटरींची सोय करण्यासाठी जुन्या इमारती पाडून जागा मोकळी करावी लागते. रस्ते रुंद करावे लागतात. दुसऱ्या कुणाला खिडकीतून दिसणाऱ्या दृश्याच्या आनंदाला आपण पारखे करीत आहोत, याचा विचार न करता तिथे आकाश पोखरणाऱ्या

नुसती उंचउंच बॉक्से रचल्यासारख्या इमारती उठत आहेत. आमच्या लहान गावांना जशी मुंबई-फॅशनीची इमारत हवी, तशी अमेरिकेत सगळ्यांना न्यूयॉर्कच्या मॅनहॅटन्-फॅशनची ओढ आहे.

जागा मोकळी करण्याच्या मागे कोट्यवधी डॉलर्स मिळवण्याचीही ओढ आहेच. जमिनीला भाव येतो म्हटले, की ह्या वास्तूला माझ्या आईवडिलांचे पाय लागले होते, ह्या झोपाळ्यावर बसून आजोबांनी श्लोक शिकविले होते, ह्या अंगणात ताई आणि तिच्या मैत्रिणी सागरगोटे खेळत होत्या — असल्या आठवणींचा भाव उतरतो. सान्फ्रान्सिस्कोत आता बऱ्याच स्कायस्क्रेपर्स उभ्या आहेत. त्यांतल्या एका स्कायस्क्रेपरची कथा ऐकून मला खूप वाईट वाटले. तिथे म्हणे पूर्वी 'ऑर्फियम्' नावाचे नाट्यगृह होते. ते पाडले. जुन्या इमारती पाडायची क्रियादेखील भयंकर असते. एका क्रेनच्या साखळीला भरभक्कम लोखंडी गोळा बांधतात. आणि त्या जुन्या भिंतीवर त्या क्रेनच्या साहाय्याने 'दाण–दाण–दाण–दाण' करीत तो गोळा आदळतात. मग ती भिंत कोलमडत जाते. हे थिएटर असेच पाडत होते. ते पाडून तिथे ती साठसत्तर-मजली इमारत उठविणारा मॉरिस् मॉस्कोविझ् नावाचा कंत्राटदार होता. इमारत ढासळविणाऱ्यांनी आपले काम सुरू करण्यापूर्वी तो त्या जुन्या थिएटरात गेला. आपल्या आवडत्या खुर्चीवर जाऊन बसला. समोर रिकामा रंगमंच होता. त्याच्या डोळ्यांसमोर नाटकातले अनेक प्रसंग नाचायला लागले, आणि डोळ्यांतून अश्रुपात सुरू झाला. पण द्रव्यदेवतेच्या उपासकाला असे द्रवून चालत नाही! — तो बाहेर आला, आणि कामगारांना 'करा काम सुरू.' म्हणून त्याने हुकूम दिला.

हां-हां म्हणता ते थिएटर आणि त्या आठवणी भुईसपाट झाल्या. आता तिथे प्रचंड स्कायस्क्रेपर उभी आहे. आधुनिकांची उत्तम सोय! जुन्यांना त्यांच्या लाडक्या 'ऑर्फियम्'चे ते थडगे वाटत असेल! – वाटू दे. असे किती दिवस वाटणार? तसे वाटणारेही थडग्यातच जाण्याच्या मार्गावर आहेत. यापुढे गाव किंवा शहर याचा अर्थ 'एकमेकां साह्य करू, अवघे धरू सुपंथ' म्हणणाऱ्या माणसांचा मेळावाच नाही. आता

शहर म्हणजे 'जीवो जीवस्य जीवनम्' हा जंगलचा कायदा पाळणारा, द्रव्योपासकांचा कोटींच्या संख्येने एकत्र आलेला नुसता जमाव! कागदावर आखून उभारलेल्या असल्या शहरांना कथा कुठून लाभणार?

हल्ली आपल्याही देशात अशा वसाहती उभ्या राहताहेत. तिथे सगळी घरे सारखीच असतात. छापाची घरे आणि छापाची माणसे! घरांना नंबर असतात, तसे फक्त माणसांना नसतात, एवढेच. सान्फ्रान्सिस्कोत आता छापाच्या गगनभेदी इमारती उभ्या झाल्या, तरी अजूनही हे शहर असंख्य जुन्या कहाण्या सांगत उभे आहे. त्यात दंतकथाही असतील. दंतकथांनाही एक निराळी गंमत असते. हेट स्ट्रीट नावाच्या गल्लीतल्या 'शूट्स्' नामक उपाहारगृहात चार्ली चॅप्लिन आपल्या तरुणपणी दर रविवारी आपले खेळ फुकट दाखवीत असे, हे ऐकल्यावर मला त्या गल्लीविषयी एकदम आपुलकी वाटायला लागली. कोल्हापुरातल्या मंगळवार पेठेतल्या एका बोळाविषयी मला अशीच जवळीक वाटते. तिथे अल्लादियाखांसाहेब राहत होते.

असल्या शहरांना विशिष्ट आठवणींचा दिवसही असतो. पुण्याला जशी पानशेतच्या पुराची बारा जुलैची किंवा मुंबईला चौदा एप्रिलच्या गोदीतल्या प्रचंड स्फोटाची आठवण आहे, तशी सोळा एप्रिलची सान्फ्रान्सिस्कोला आठवण आहे. १९०६ साली त्या दिवशी ह्या शहरात प्रचंड भूकंप झाला होता. अनेकांनी त्या रात्रीच्या रोमहर्षक आठवणी लिहून ठेवल्या आहेत. जॉन बॅरिमूर हा प्रसिद्ध नट त्या रात्री सान्फ्रान्सिस्कोत होता. जॉन, एथेल, लायनेल ही बॅरिमूर भावंडे. अभिनयाची असामान्य देणगी त्यांना लाभलेली. जॉनने त्या भूकंपाच्या अनुभवाचे तिखटमीठ लावून वर्णन करणारी तार आपल्या बहिणीला पाठवली. आपण बिछान्यातून बाहेर कसे फेकले गेलो, भांबावून शहरभर कसे धावत सुटलो, मग एका दुष्ट सोजिराने आपल्या हातात फावडे देऊन आपल्याला ढिगारे उपसायच्या कामाला कसे जुंपले, वगैरे वगैरे. एथेलने त्याची तार काकांना वाचून दाखवली आणि ती म्हणाली, " हा जॉन लिहितो, हे खरं असेल?"

" शब्द-न्-शब्द खरा असेल. " म्हातारबुवा म्हणाले, " ह्या जॉन्याला बिछान्यातून उठवायला साक्षात् देवालाच धक्का द्यावा लागला असेल! आणि अंगमेहनत करायला अमेरिकन लष्कराचीच मदत घ्यावी लागली असेल! "

असल्या कितीतरी मजेमजेदार कहाण्या. ह्या भूकंपाचा लोकांनी एवढा धसका घेतला होता की, लिलियन् नॉर्डिका नावाची एक ढब्बी नटी स्टेजवरच्या सेटिंगमधल्या जिन्यावरून पाय निसटून धाडकन् गड-गडल्याने सेट हलल्यावर ' भूकंप–भूकंप ' असे ओरडत प्रेक्षक बाहेर आले म्हणतात! १९०६ सालच्या त्या भूकंपात एकूण दोन लाख लोक बेघर झाले होते. त्यांच्या पुनर्वसनाची जबाबदारी जनरल ग्रीली नावाच्या अधिकाऱ्याकडे होती. त्याने आपल्या रोजनिशीत नोंद केली आहे : " दोन लाख लोकांच्या आयुष्याचा सत्यानाश झाला होता. पण मला एकाही बाईच्या डोळ्यांत अश्रू दिसले नाहीत, की एका पुरुषाला मी ' सर्वस्व गेले हो आमचे ' म्हणून कुरकुरताना पाहिले नाही! "

असल्या कथा त्या शहरवासियांना एक प्रकारचा अभिमान देतात. आपुलकी उत्पन्न करतात. शेवटी सगळी माणसे पोटाची तुंबडी भरायलाच शहरात येतात, हे खरे. पण ती भरताना असले सुंदर अभिमान आणि आपुलकी उत्पन्न झाली नाही, तर ते शहर नुसते द्रव्यलोभी उपऱ्यांचे होते. मुंबईची मलबार हिल नाही का अशीच डोळ्यांदेखत सिमेंट काँक्रीटचे जंगल होऊन गेली? शिकागो, डिट्रॉइट, न्यूयॉर्क यांची अशीच भयानक वाढ झाली आणि समृद्धीच्या खोट्या कल्पनांचे शाप त्यांना भोगायला लागले. सान्फ्रान्सिस्कोलाही त्याच वाटेने जावे लागणार. आजच्या जगात हा रस्ता अटळ दिसतो. लिफ्टमधून कोंबून जाणारी माणसे जशी एकमेकांना खेटून उभी असूनही एकमेकांच्या नजरेलासुद्धा नजर न देता आपला मजला आला, की बाहेर पडतात, कुठल्यातरी मजल्यावरून आत शिरतात, वर जातात, खाली येतात; तशीच ही माणसे ह्या विराट नगरात राहतील.

सुदैवाने सान्फ्रान्सिस्को आज तरी आपले ते देखणे, सौम्य आणि

प्रेमळ जुनेपण टिकवण्याच्या धडपडीत आहे. ते टिकवण्यात चिन्यांचा आणि इटालियनांचा वाटा फार मोठा आहे. हे लोक वर्षानुवर्षे अमेरिकेत राहताहेत. चौथ्यापाचव्या पिढ्या असतील. पण इंग्रजीइतकीच आपली भाषा आणि रीतिरिवाज टिकवून राहतात. त्यांची पोरे इंग्रजीइतकीच आपली मातृभाषा सफाईने बोलतात. मग इंग्लंड-अमेरिकेत राहणाऱ्या आमच्या लोकांनाच मुलांशी मराठी वगैरे बोलायला इतकी लाज का वाटते? मी हा प्रश्न अनेक मराठी कुटुंबांतून विचारला. मला कुठेही समाधानकारक उत्तर मिळाले नाही. "अरूऽऽण! आय् टेल यू हं ऽऽ, डोंट् डू धिस हां ऽऽ!"-छाप इंग्रजी बोलणाऱ्या आया मला सांगत होत्या की, 'दोन भाषांचं मुलांना टेन्शन् होतं!' मग हे टेन्शन् इटालियन किंवा चिनी मुलांना कसे होत नाही? तीही पोरे अस्सल अमेरिकन शाळेत जातात. तिथे अमेरिकनच बोलतात. त्यांचे आईबाप त्यांना मुद्दाम आपापली भाषा बोलायलाच नव्हे, तर लिहावाचायलाही शिकवतात. आपल्या देशाविषयीच्या न्यूनगंडात भारतीयांचा प्रथम क्रमांक लावायला हवा. ही इंग्रजीची साथ मला मुंबईतल्या नवश्रीमंत मराठी कुटुंबांतदेखील आढळते. त्या अर्भकांना आपण देशातल्या सांस्कृतिक प्रवाहातून किती दूर फेकतो आहो याची या आईबापांना अजिबात कल्पना नाही. पुन्हा आमच्या लोकांची संपूर्ण अमेरिकन होण्याची ताकद नाही. पोरगी बारा वर्षांची होऊन डेटिंगच्या गोष्टी करायला लागली की छातीत धडकी! अमेरिकन आया आपली पोरगी संततिप्रतिबंधक गोळ्यांचा खुराक नियमित खाते असे बेधडकपणे सांगते. इथे मात्र मुलीला ज्ञातीचे, शाखेचे आणि गोत्राचे स्थळ मिळायला हवे हा विचार सुटायला तयार नाही! सान्फ्रान्सिस्कोत आपले चिनीपण टिकवूनच नव्हे, तर चिनीपण हे त्या शहराचे वैशिष्ट्य करून राहिलेल्या चिन्यांचे अशा वेळी मला फार कौतुक वाटते. त्यांच्या घरावर चिनी छाप आहे, आपले सण ते लोक दणक्यात साजरे करतात. लांब काड्यांनीच जेवतात. वास्तविक त्यांच्यातल्या अनेकांनी तिथे गोऱ्यांच्या घरी रामागड्यांसारखी खूप काबाडकष्टाची कामे करून संसार उभे केले

आहेत. पण त्यांच्यात कुठे आपण चिनी असल्याचा न्यूनगंड नाही. आता तर अमेरिकेने त्यांच्या मूळ देशाचे सामर्थ्य मान्य केल्यापासून ते ताणातच आहेत. जी गोष्ट चिन्यांची, तीच इटालियनांची.

राजाभाऊंनी एकदा आम्हांला 'घिराडेली' नावाच्या एका इटालियन दुकानात चॉकलेट आइस्क्रीम खाण्यासाठी नेले. सान्फ्रान्सिस्कोतल्याच एका डोंगर उतरणीवरच्या घरात हे हॉटेल आहे. 'घिराडेली' हे एका इटालियन केक-चॉकलेट-आइस्क्रीमवाल्याचे दुकान. हा घिराडेली चौक लंडनच्या पिकॅडेलीइतकाच जगप्रसिद्ध आहे. डोंगरांची कापे करीत-करीत इथल्या इमारती बांधलेल्या आहेत. ह्या घिराडेली चौकावर एक छोटेसे म्हणजे शंभरदीडशे माणसे बसतील एवढे सिनेमा-थिएटर आहे. समोरच्या अर्धचंद्राकार भिंतीवर 'सायक्लोरामा'सारखे रुपेरी पडदे आहेत. तिथे रोज एकच चित्रपट दाखवतात. वर्षानुवर्षे एकच चित्रपट. 'सान्फ्रान्सिस्कोनगरीची कहाणी' सांगणारा! शंभरदीडशे वर्षांचा सान्फ्रान्सिस्कोचा इतिहास एका तासात डोळ्यांपुढे उभा करतात. त्या चित्रपटातून सान्फ्रान्सिस्कोचे चरित्र कळते. आपल्या देशात कितीतरी परदेशी पाहुणे येतात. त्यांना हे असे शहराची ओळख करून देणारे चित्रपट तयार करायला हवेत. तो चित्रपट पाहून आम्ही 'घिराडेली'-कडचे आइस्क्रीम खायला त्या उपाहारगृहात गेलो.

'घिराडेली' हे नुसते आइस्क्रीमवाल्याचे दुकान नाही. आज जगभर जे चॉकलेट, चॉकलेट-आइस्क्रीम, चॉकलेट-केक वगैरे खाल्ले जाते, किंवा कोको प्याला जातो, त्याची ही अमेरिकेतली गंगोत्री आहे. 'काकाव्' नावाच्या बिया दळण्याची इथे एक पुरातन चक्की आहे. तीतून चॉकलेट किंवा चॉकलेट-आइस्क्रीमपर्यंत नाना प्रकारचे पदार्थ तयार कसे होतात, ते इथे पाहायला मिळते. ह्या काकावच्या बिया प्रथम कोलंबसानेच स्पेनला नेल्या. जवळजवळ एक शतकभर युरोपातल्या इतर देशांपासून चॉकलेट बनवण्याची क्रिया स्पॅनिश लोकांनी लपवून ठेवली होती. पुढे इटालियन लोक चॉकलेट बनवण्यात तरबेज झाले. डॉमिंगो घिराडेली नावाचा एक इटालियन तरुण सव्वाशे वर्षांपूर्वी गोल्डन गेटच्या

प्रवेशद्वारातून सान्फ्रान्सिस्कोत आला. सान्फ्रान्सिस्कोत जिथून जहाजे शिरतात, त्याला ' गोल्डन गेट ' — सुवर्णद्वार — म्हणतात. त्या सुवर्ण-द्वारावरच तो महाप्रचंड पण अतिशय सुंदर असा गोल्डन गेट ब्रिज आहे. जगातल्या आश्चर्यात जमा करावा, असा हा पूल. डॉमिंगो घिराडेल्ली हा वाणसौदा करणारा इटालियन तरुण. इटालीतून सान्फ्रान्सिस्कोपर्यंत नशीब काढायला आला.

तो काळ सोन्याच्या खाणींच्या शोधाचा. युरोपकडून लोकांच्या झुंडीच्या-झुंडी ह्या कोलंबसाने शोधलेल्या नव्या जगाच्या दिशेला सोन्याच्या शोधात येऊन थडकत होत्या. घिराडेल्लीने त्यांच्या पोटांची भूक भागविणाऱ्या पदार्थांची विक्री करणारे आपले पाल ठोकले. त्या लोकांपैकी कितीजणांना सोने सापडले, तेच जाणोत ! पण घिराडेल्लीला मात्र एक निराळीच सोन्याची खाण सापडली. त्याला ग्वाटेमालाच्या डोंगरात चॉकलेटच्या बियांची झाडे मिळाली. १८८०-च्या सुमाराला डोमेनिको डि डोमेनिको नावाचा दुसरा एक इटालियन तरुण त्या सुवर्णद्वारातून शिरला. हा उत्तम प्रकारच्या पास्टा — म्हणजे शेवयांचे इटालियन प्रकार — बनवणारा होता. त्याने घिराडेल्लीच्या बाजूलाच इटालियन स्पागेट्टी, व्हर्मिसेली, मॅकरोनी वगैरे खाद्यांचे दुकान उभे केले. त्या दोघा पठ्ठ्यांनी इटालियन पाककौशल्याने नव्या जगातल्या रहिवाशांच्या पोटात शिरून पैसे कमवायला सुरुवात केली.

आज ' घिराडेली ' आणि ' गोल्डन ग्रेन कंपनी ' ह्या दोन्ही व्यापारी मंडळ्यांनी आपल्या कारकीर्दीची शंभर-सव्वाशे वर्षे ओलांडली आहेत. ' घिराडेली 'च्या त्या प्रचंड दुकानाचा थाट मात्र जुन्या पिठाच्या चक्क्यांसारखाच आहे. ती यंत्रे तिथे गडगडत असतात. आपल्या कडक रेवडीवाल्याच्या कढईत जसा पाक ढवळला जातो, तसा चॉकलेटचा पाक यंत्रांनी महाप्रचंड कढयांतून ढवळला जात असतो. एका बाजूला चॉकलेटची ' लिक्युअर ' तयार होत असते. पाश्चात्त्य देशांत भरपूर भोजनानंतर ही मद्याची आपोष्णी घेतात ! हॉटेलात सगळीकडे चॉकलेटचा दरवळ. मला वाटते, रोज शेकडो पिंपे भरून चॉकलेट आइस्क्रीम तयार

होत असते, आणि तितकीच ती 'चॉकलेट लिक्युअर'. आता ह्या दोन्ही कंपन्यांची मिळून एक कंपनी झाली आहे. साऱ्या जगाची बाजारपेठ त्यांनी जिंकली आहे. पण अजूनही त्या तांबड्या विटांच्या जुन्या इमारती तशाच आहेत. त्यांत शिरणारा माणूस चटकन् शंभर वर्षे मागे जातो. इथले चॉकलेट आइस्क्रीम तर अप्रतिम असतेच; पण वातावरणाची मजा अधिक गोडवा आणि गारवा आणते. 'घिराडेली'चे आइस्क्रीम खाणे हा सान्फ्रान्सिस्कोत येणाऱ्या प्रवाश्यांचा एक प्रकारचा सांस्कृतिक विधी झाला आहे. एखाद्या शहराची अशी खाद्याचीही खासियत असावी लागते.

शहरातली असली हॉटेले नुसतीच भूक भागवीत नसतात. मनेही फुलवितात. इथे दोस्तांचे अड्डे जमून हास्याची कारंजी उडवीत असतात. त्याने शहरी जीवनातल्या ताणांवर उतारा देणारी विनोदबुद्धी टिकते. मुंबईतल्या सध्याच्या भयानक चेंगराचेंगरीत माणसे इतकी जिकिरीला आलेली असतात की, त्यांना मोकळेपणाने हसतादेखील येत नाही. हॉटेलमध्ये तर आपल्या खुर्चीच्या मागे 'केव्हा एकदा हा इसम खाणे संपवून उठतो,' याची वाट पाहत वैतागलेली माणसांची रांग उभी असते. जेवत बसलेले असताना 'आटपा' असा मूक आक्रोश मागे चालू असताना जेवण गाडीत टाकलेल्या पेट्रोलसारखे होते. सान्फ्रान्सिस्कोतल्या हॉटेलात गप्पागोष्टी करीत बसलेले अड्डे पाहून मला जुन्या इराणी हॉटेलमधल्या आमच्या कॉलेजच्या दिवसांतल्या अड्ड्यांची आठवण झाली. ती खरी विश्रांतिगृहे! आरामात एक 'पावणा चहा' आणि खारी बिस्किटे मागवून तासन्-तास गप्पा मारीत बसलो, म्हणून गल्ल्यावरच्या इराण्याच्या कपाळाला आठी पडत नसे. इथल्या अड्ड्यावरच्या लोकांनी सान्फ्रान्सिस्कोच्या भूकंपावरसुद्धा मजेदार गाणी रचली होती! त्या भूकंपाच्या धक्क्यातून होटेलिंग नावाच्या माणसाचे व्हिस्कीचे गुदाम सहीसलामत सुटल्याचे कळल्यावर एका मयखान्यातल्या शायराने लगेच शेर फर्मावला होता —

आमच्या अनेक पापांसाठी
भूकंपाचा देऊन धक्का
देवाला जर घडवायची
होती आम्हा पक्की अद्दल —
तर मग सगळी चर्चे पाडून
व्हिस्कीवाल्या होटेलिंगचे
टिकवून कसे ठेवले मुद्दल ?

त्यानंतर साठ वर्षांनी सान्फ्रान्सिस्को शहराला प्रचंड आग लागली. लंडनच्या आगीसारखी हीदेखील इतिहासप्रसिद्ध आग! त्या आगीत इतर नुकसान तर झालेच; पण कोट्यवधी डॉलर्सच्या किमतीचे व्हिस्कीचे साठे जळून गेले. त्या वेळी दुसऱ्या एका कवीने त्या शेराचा जवाब लिहिला —

म्हणत असतात कोणी कोणी
' कहाँ रहा अल्ला अभी ? '
तर मग मला एकच सांगा —
जाळून टाकली व्हिस्की कोणी ?
अन् चर्चेस कशी ताठ उभी ?

चार माणसांना एकत्र जमायला, खायला-प्यायला, मोकळेपणाने बसायला, आधुनिक शहरात जागाच नसतात. तशा सरकारात रजिस्टर झालेल्या सांस्कृतिक संस्थांना आणि साहित्यसभांना तोटा नाही. पण जिथे कोणी अध्यक्ष नाही, प्रमुख वक्ता नाही, आणि हास्यविनोदा-पलीकडे ज्या ठिकाणी इतर कसलीही अपेक्षा नाही, असल्या मोकळ्या मैफलीच नाहीशा होताहेत. जरा कुठे चार समानशील ग्रंथप्रेमी मित्र एकत्र आले, त्यांचा झकास अड्डा तयार झाला, की त्यांतल्याच कुणाला-तरी त्या अड्ड्याची ' साहित्यसंस्था ' करायची अवदसा आठवते. कुणीही पेटी-तबला घ्यावा आणि गाणेबजावणे करावे, असल्या गायनाच्या शौकिनांना लगेच ' संगीतकलाकेंद्र ' काढायची बेसूर कल्पना सुचते. मग गप्पा जातात, गाणे जाते, आणि उरतात फक्त कार्यकारी मंडळाच्या भांडखोर निवडणुका ! सान्फ्रान्सिस्कोतच नव्हे, तर युरोपातल्या किती-

तरी शहरांत मला छोट्यामोठ्या हॉटेलांतून, मद्यालयांतून गप्पागोष्टींत रमलेल्या लोकांचे अड्डे दिसले, की हेवा वाटायचा. अशा गोष्टींना सवड लागते, हे खरे. आपल्या देशातल्या मुंबई-कलकत्त्यांसारख्या मोठ्या शहरांत जाऊ तिथे इतकी प्रचंड गर्दी असते की, त्यातून वाट काढीत जाण्यातच निम्मे आयुष्य संपते. असल्या शहरांत माणूस हसणे गमावून बसतो. कारण त्याला हसायलादेखील जागा नसते आणि सवड नसते. 'घिराडेली 'सारखी आइस्क्रीमवाल्यांची दुकाने, हॉटेल्स, सलून्स, मद्यालये यांत बसलेल्या अड्ड्यांतूनच अनेक कथांचा आणि दंतकथांचा जन्म होत असतो.

हर्ब केन नावाचा सान्फ्रान्सिस्कोतला एक विनोदी लेखक आहे. ह्या शहरावर त्याचे अतोनात प्रेम. इथली गल्लीकुची त्याला पाठ आहे. त्याने आपल्या पुस्तकात सान्फ्रान्सिस्कोच्या आणि सान्फ्रान्सिस्को-वाल्यांच्या अनेक कथा लिहिल्या आहेत. असल्या अड्ड्यांत काही नुसते कॉलेजातले तरुणतरुणीच असतात, असे नाही. साहित्याच्या किंवा कलेच्या क्षेत्रात मोठमोठी नावे मिळवलेल्या लोकांचीदेखील छोटीछोटी आवडती हॉटेल्स असतात. तिथल्या वेट्रेसिसना आपले रोजचे गिऱ्हाईक यापलीकडे त्यांची माहितीही नसते. आर्थर फीड्लर हा एक 'पॉप्' संगीतातला फार नामवंत माणूस! एके दिवशी हॉटेलमधल्या फडका मारणाऱ्या पोरीला म्हणाला, "उद्या रात्री थिएटरात गाणं ऐकायला यायचंय काय? हा बघ तुझ्यासाठी फुकट पास आणलाय्!" पोरगी म्हणाली, "का? उद्या हापिसला सुट्टी काय तुमच्या?" आर्थर फीड्लरने निर्देशित केलेला गाण्याचा कार्यक्रम ऐकायला हजारो माणसांच्या उड्या असतात. इथे स्वतः आर्थर फीड्लरच तिला फुकट पास देत होता. आणि तिला वाटत होते, सुट्टीच्या दिवशी गाण्याबिण्याला नेऊन रात्र मजेत घालवणारा हा कुणी हापिसवाला बाप्या आपल्याला खूष करून राहिलाय! सुप्रसिद्धांना कधीकधी आपण तितकेसे सुप्रसिद्ध नाही, हे दाखवून असला धक्का लायनीत आणतो.

शहरे किंवा गाव माणसांसाठी खास काही करीत असतात, असे

नाही. पण कर्तबगार माणसांमुळे गावाला नाव मिळते आणि गावकऱ्यांना अभिमान मिळतो. रत्नागिरीत टिळक जन्माला आले, हा एक योगायोग! वास्तविक टिळकांनी 'कसंही करा आणि आपल्याला रत्नागिरीत जन्माला घाला,' असा ब्रह्मदेवापाशी हट्ट धरल्याचा कुठे पुरावा नाही. पण रत्नागिरीकरांनाच काय, इतरांनादेखील टिळक जन्माला आलेले गाव म्हणून त्या रत्नागिरीविषयी उगीचच आदर वाटत असतो. माणसाचे सगळेच विचार तर्कात बसत नाहीत, हेच शेवटी खरे! आता विल्यम सारोयान हा लेखक तरुणपणी सान्फ्रान्सिस्कोत उमेदवारीचा काळ कंठीत होता, हे ऐकून मला ते शहर माझ्या आणखी जवळ आल्यासारखे वाटायचे कारण नव्हते. सारोयानची पुस्तके मी आवडीने वाचली आहेत, यापलीकडे त्याची – आमची जानपहेचान नाही. इथल्या कार्ल स्ट्रीट नावाच्या बोळात तरुणपणी हा कथाकार रहायचा, हे ऐकून त्या रस्त्याकडे पाहण्याचा माझा दृष्टिकोण बदलला. तरुण सारोयानला दुपार कशी टळेल, याची तेव्हा भ्रान्त होती. तो लिही-लिही लिहायचा. संपादकांकडून कथा 'साभार परत'ची चिठी लावून परतायच्या. हा पठ्ठ्या त्या 'साभार परत'च्या संपादकाकडे 'साभार परत — परत-भेटीसाठी' अशी चिठी जोडून पुन्हा आपली कथा पाठवायचा. त्या कार्ल स्ट्रीटमध्येच त्याच्या जगप्रसिद्ध 'ॲरम'चा जन्म झाला असणार. भुकेने व्याकूळ होणारा सारोयान तिथल्याच कारंजावरचे पाणी पिऊन दिवस काढीत असे. आता त्या कारंज्यालादेखील एक अभिमान वाटायला लावणारी कहाणी चिकटली. वाटेल तसली मोलमजुरी करून सारोयानला तारुण्याची पहिली वर्षे काढावी लागली. द्राक्षाच्या मळ्यात द्राक्षांचे घड तोडण्याचे कामही त्याने केले. दिवसभर मळ्यात राबून उरल्या वेळात त्याचे लेखन चालायचे. एके दिवशी नेमकी गोळी लागली. सारोयान प्रसिद्धीच्या झगमगाटात आला. हां हां म्हणता लक्षाधीश झाला. 'द टाइम ऑफ युवर लाइफ' या नाटकाला 'पुलिट्झर प्राइझ' मिळाले. अमेरिकेतल्या मोठमोठ्या शहरांत यश मिळवून कंपनी आपला हातखंडा खेळ घेऊन सान्फ्रान्सिस्कोला आली. पहिल्या रात्री प्रेक्षक आपुलकीच्या अभिमानाने

नाटक संपल्यावर ओरडले : "ऑथर – ऑथर! लेखक – लेखकाला रंगमंचावर आणा!" सारोयान कुठे दिसेना. तेवढ्यात एक नट म्हणाला, "अरेच्चा! कुठं गेला हा? आत्ता तर होता! द्राक्षाच्या मळ्यातल्या मजुरीला असल्या मध्यरात्री तर नक्की गेला नसेल!"

सान्फ्रान्सिस्कोकरांच्या हा विनोद चटकन् लक्षात आला. सारोयान आता द्राक्षे तोडणारा मजूर राहिला नव्हता. थिएटरातल्याच मद्यालयात आपल्या गावकरी दोस्तांना आता तो अंगुरांची किमती शराब पिलवीत होता! छोट्याछोट्या नर्मविनोदी कथा लिहिणाऱ्या ह्या आपल्या गावच्या लेखकाच्या अनेक आठवणी सान्फ्रान्सिस्कोचे रहिवासी अभिमानाने सांगतात. पंचावन्न वर्षांच्या सारोयानची मुलाखत घेताना एकाने त्याला प्रश्न विचारला, "आपल्या दीर्घायुष्याचं रहस्य काय?".

"अजून मेलो नाही हे!" — हा खास सारोयान टच्!

एखाद्या गावाच्या पाण्यातही हा हजरजबाबीपणाचा गुण असावा. नाही तरी कोकणी शहाळ्याच्या पाण्यात तो इरसाल तिरकेपणा आहेच की! आणि मुळामुठेत....जाऊ द्या! उगीच 'म. सा. प.'त निषेधाची सभा भरवायचा चान्स देण्यात अर्थ नाही. सान्फ्रान्सिस्कोतही तसे काहीतरी असावे. एब्रू रूफ नावाच्या लांड्यालबाड्या करून भरमसाट पैसे गाठीला लावलेल्या इथल्या एका वकिलाला शेवटी तुरुंगाच्या कोठडीची हवा खावी लागली. एरवी भपकेबाज पोषाखात मिरवणाऱ्या एब्रूसाहेबाला कैद्याचा तो पट्टयापट्टयांचा सदरा-पायजमा चढवावा लागल्यावर एका वार्ताहराने विचारले, "काय वकीलसाहेब! त्या पोषाखातून ह्या चट्टेरी-पट्टेरी पोषाखात आल्यावर कसं वाटतं?"

वकीलसाहेबांचा सुंभ जळला, तरी पीळ जळला नव्हता. ते चटकन् म्हणाले, "झेब्रा हा काही कमी देखणा प्राणी नाही!"

अशा अनेक गमती ऐकवीत, आपले निसर्गवैभव आणि आधुनिक जीवनात होणारे नवे आघात दाखवीत सान्फ्रान्सिस्को मला भेटत होते. ह्या शहरात सारेच काही सुख आहे, असे नाही. पोलिसांच्या गाड्या भिरभिरत असतात. तेव्हा गुन्हेगारी, दंगेधोपेही आहेत. इथल्या उप-

सागरातल्या एका खडकाच्या बेटावर तो अल्काट्राझचा एके काळचा कुप्रसिद्ध तुरुंगही आहे. आता तो तुरुंग म्हणून वापरला जात नाही. एके काळी हे सान्फ्रान्सिस्कोच्या रहिवाश्यांना डोळ्यांसमोर दिसणारे अंदमान होते. त्या बेटाला नुसतेच ' रॉक् ' म्हणजे ' खडक ' म्हणतात. आधुनिक जगातल्या साऱ्या आधिव्याधी इथेही आल्या आहेत. पण निसर्गाने दिलेला तो विशाल उपसागर, ते शहरात आणि शहराच्या आसपास असणारे विस्तीर्ण जलाशय, ती माणसाला सतत जवानीत ठेवणारी हवा, ते सुंदर आणि सुरक्षित बंदर, संथ पाण्यात वाहल्या वाऱ्यांच्या साहाय्याने संचार करणाऱ्या त्या असंख्य पांढऱ्याशुभ्र शीड-होड्या .... हे वैभव नष्ट करायचे म्हटले तरी करणे सोपे नाही.

आणि या साऱ्या वैभवावर कळस चढल्यासारखा तो गोल्डन गेटचा प्रचंड पूल. तसाच तो भव्य कलाप्रासाद ! तिथला तो रोदँचा ' थिंकर ' हा जगप्रसिद्ध पुतळा आणि उदंड चित्रवैभव आणि शिल्पवैभव. नजर फेकावी तिथून दिसणारे हे नैसर्गिक आणि मनुष्यनिर्मित सौंदर्य. जीवनात ज्या ज्या प्रकारच्या म्हणून कलांची आणि क्रीडांची आराधना करायची असेल, त्यांच्या कितीतरी सोयी ! विस्तीर्ण क्रीडांगणे. पोहण्यासाठी स्वच्छ आणि आकर्षक तलाव. त्यांतून कुणाला पोहण्यात अधिक साहस हवे असेल, तर प्रदीर्घ समुद्रकिनारा. तिथे लाटांशी झुंज घेत मनसोक्त पोहावे आणि वाळूत अंग वाळवीत पडावे. सगळीकडे बारमहा कसे हिरवेगार. डोंगरमाथ्यावरून ती वनस्पतींची हिरवी आणि पाण्याची निळी शोभा पाहत ध्यान लावून तासन्‌तास बसावे. वार्धक्याने गतस्मृतींत रमावे, आणि तारुण्याने भविष्यातली स्वप्ने पाहावीत. ह्या शहराचे नुसते बाह्य वर्णन करायचे म्हटले, तरी शब्दांचे थिटेपण जाणवते.

असल्या ह्या शहराला दोन जगप्रसिद्ध विद्यापीठांनी आणखीनच श्रीमंत केले आहे.—बर्कले आणि स्टॅनफर्ड. बर्कलेच्या कॅलिफोर्निया विद्यापीठाला ही माझी दुसऱ्यांदा भेट. दहा वर्षांपूर्वी गेलो होतो, त्या वेळचा एक अनुभव माझ्या स्मरणात राहिला आहे. इथल्या वृत्तपत्र-विद्या-विभागातली लायब्ररी पाहत होतो. जगातल्या असंख्य भाषांतली जुनीजुनी वर्तमानपत्रे इथल्या

संग्रहात आहेत. ग्रंथपालिकाबाईंना मी विचारले, " जुने ' केसरी'चे अंक आहेत का ? " बाईंनी लगेच कॅटलॉग काढला आणि ती म्हणाली, " आहेत. तुम्हाला पाह्यचा आहे का एखादा जुना अंक ? "

अनेक वर्षांपूर्वी ' केसरी ' फक्त मंगळवारी आणि शुक्रवारी निघायचा. माझा जन्म शनिवारचा. मी माझ्या जन्मदिनाच्या आदल्या दिवशीचा ' केसरी'चा अंक पाहायला मागितला. १९१९ सालातला. अपेक्षा अशी की, बाई म्हणणार, "संध्याकाळपर्यंत काढून ठेवते. " दोनतीन मिनिटांनी बाई आल्या आणि म्हणाल्या, " तुम्हांला हव्या असलेल्या अंकाची मायक्रोफिल्म लावून ठेवली आहे. "

मी थंड ! खुद्द बळवंतरावांना गायकवाडवाड्यात एक आठवड्या-पूर्वीचादेखील ' केसरी'चा अंक इतक्या झटक्यात मिळाला नसता. आणि इथे चाळीस-बेचाळीस वर्षांपूर्वीचादेखील ' केसरी ' दोन मिनिटांत हजर ! अखंड ' केसरी ' मायक्रोफिल्मच्या करंगळीएवढ्या नळीवर गुंडाळलेला होता. प्रोजेक्टरवर चढवलेली ती नळी मी वाचू लागलो. " मोठ्यानं वाचाल का ? " ग्रंथपालिका म्हणाली.

मग त्या बर्कले विद्यापीठातल्या ग्रंथालयात मी तो लोकमान्य किंवा खाडिलकर किंवा केळकर यांच्यापैकी कोणीतरी इतक्या वर्षांपूर्वी लिहिलेला मराठी अग्रलेख दणदणीत आवाजात वाचायला सुरुवात केली.

या खेपेला माझ्याबरोबर पुण्यातले श्री. मकानी नावाचे तरुण प्राध्यापक होते. इथे ते गणिताच्या उच्च शिक्षणासाठी आहेत. अतिशय नम्र आणि सौजन्यशील अशा ह्या तरुणाने मला ' बर्कले ' दाखवण्याची जबाबदारी घेतली.

हे विद्यापीठ म्हणजे डोंगरांच्या उतरणींवर वसलेले एक रम्य उप-नगरच आहे. यंदा ह्या विद्यापीठाची शंभर वर्षे पुरी झाली. १८७३ साली १६७ विद्यार्थी आणि अवघ्या २२ विद्यार्थिनी होत्या. आता जवळ-जवळ अठ्ठावीस हजार विद्यार्थी ह्या कॅम्पसवर राहतात. अडीच हजार कायमचे प्राध्यापक आणि साडेसातशे व्हिजिटिंग प्रोफेसर्स ! ज्ञान-विज्ञानाच्या शेकडो शाखा आहेत. खुद्द अमेरिकेतल्या मोठ्या शहरांनी

हेवा करावा, असे थिएटर आहे. ग्रंथालयात पस्तीस लाख ग्रंथ आहेत. आणि एवढा हा जगड्व्याळ पसारा असूनही इथले वातावरण मात्र विलक्षण अकृत्रिम आहे. शेकडो मंडळे आहेत. अगदी ब्रिज आणि बुद्धिबळे खेळणाऱ्यांच्या मंडळांपासून विज्ञानातल्या परमगहन विषयात रंगलेल्या गुरुशिष्यांचा अड्डा जमविणाऱ्या मंडळापर्यंत नाना तऱ्हा!

हिप्पीच्या चळवळीची सान्फ्रान्सिस्को ही गंगोत्री. त्यामुळे गळ्यात माळा घालून फकिरी वेषात दाढीमिशयांची आणि केसांची जंगले वाढवून हिंडणाऱ्या तरुणांपासून फुटबॉलच्या आणि बेसबॉलच्या मैदानावर भीम-पराक्रम करणाऱ्या तरुणांपर्यंत तारुण्याची सगळी मस्ती इथे दिसते. आम्ही विद्यापीठाच्या आवारात शिरलो, तेव्हा 'हरे रामा हरे कृष्णा'-वाल्यांनी चौकातच भजन मांडले होते. नीग्रो विद्यार्थ्यांची सभा चाललेली होती. आणि निक्सनविरोधी प्रचाराची धामधूम उडाली होती. स्वागत-कक्षात माझे जरा अधिकच आपुलकीने स्वागत झाल्यामुळे मी थोडासा गडबडलो. त्या स्वागतसुंदरीला मी नाटककार, साहित्यिक, नट इ. इ. असल्याचा रिपोर्ट राजाभाऊंनी, मकानींनी आणि पानट नावाच्या दुसऱ्या एका मराठी विद्यार्थ्याने आधीच दिला असावा. तिने माझा मुक्काम किती दिवस आहे, अशी आस्थेने चौकशी करून माझ्या हातात त्या आठवड्यात होणाऱ्या विद्यापीठातल्या कार्यक्रमांची पत्रिका दिली.

कार्यक्रमांची यादी वाचून माझे डोके गरगरायला लागले. त्या आठवड्यात उत्तमोत्तम असे चोवीस चित्रपटच दाखवण्यात येणार होते. काही नवे, काही खूप जुने. १९१७ सालचा सेसिल बी. दमिल्चा मेरी पिक्फोर्डला घेऊन काढलेला 'लिटल् अमेरिका' हा सिनेमा होता. जॉन बॅरिमूरने काम केलेला १९२७चा 'टेम्पेस्ट' होता. १९३४ सालचा लॉरेन्स ऑलिव्हिएचा 'हेन्री द फिफ्थ' होता. पोला नेग्री ह्या नटीचा 'फर्बिडन् पॅरेडाइज' हा एके काळी अतिशय गाजलेला चित्रपट होता. आणि कालपरवाचे चित्रपटहि होते. वर्षभर असे हे जुने-नवे सिनेमे चालू असतात. संगीताचे आणि नृत्याचे कार्यक्रम होते. नाटक होते. त्यांखेरीज खगोलशास्त्र, केमिकल एंजिनिअरिंग, गणितशास्त्र, स्थापत्य, भूगर्भशास्त्र,

वनस्पतिशास्त्र — असल्या विषयांवर एका आठवड्यात जवळजवळ चाळीस व्याख्याने होती. दुपारी कॉन्सर्ट हॉलमध्ये हायडन्, शोपँ, डेब्यूसी यांच्यासारख्या लोकोत्तर संगीतकारांच्या कृतींचे वृंदवादन, कधी व्हायोलिनवादन, कधी पियानोवादन हे कार्यक्रम. रात्री पुन्हा उच्च संगीताच्या मैफिली. त्याबरोबर पॉप् संगीताचाही भरपूर दंगा. त्या आठ-वड्यात अर्जेंटिना, ग्वायना, हंगेरी, जपान, कोरिया, मलेशिया अशा निरनिराळ्या देशांतले विद्वान व्याख्यानांसाठी यायचे होते, ते निराळेच. आणि इतक्याने झाले नाही, म्हणून दुर्मिळ वनस्पतींपासून ते ऑरी मानिस्च्या दुर्मिळ शिल्पाकृतींपर्यंत निरनिराळ्या वस्तूंची प्रदर्शनेही होती. त्यांत जपानी वालुकाचित्रांचेही प्रदर्शन होते.

इथले विद्यार्थी स्वत:ची दैनिके काढतात. साप्ताहिके आणि मासिके चालवितात. त्यांत अभ्यासपूर्ण लेखांपासून ते संतप्त लेखणीतून उतरलेल्या अर्वाच्य लिखाणापर्यंत सारे काही असते. इथल्या विद्यार्थ्यांनी काढलेल्या ' पेलिकन् ' नावाच्या मासिकात मी एक मजेदार अनावृत पत्र वाचले होते. सध्या जगभर शांतीसाठी सतत भ्रमंती करणाऱ्या डॉ. हेन्री किसिंजर ह्या निक्सनच्या फिरत्या राजदूताला उद्देशून ते पत्र लिहिलेले होते. लिहिणाऱ्याने आपली सही ' रेव्हरंड कॅल्वर्ट फिट्झिराल्ड ' अशी केली होती. स्वत:कडे मद्यपान आणि स्वैराचार यांविरुद्ध असलेल्या प्रचारकाची भूमिका घेतलेल्या त्या पाद्रीबाबाने लिहिले होते.—

' प्रिय डॉ. किसिंजर,

मितपान, शुद्ध जीवन इत्यादींचा एक प्रचारक म्हणून आपण माझे नाव ऐकलेच असेल. गेली पंधरा वर्षे मी सगळीकडे मद्यपानाविरुद्ध आणि विषयोपभोगाविरुद्ध प्रचार करतो आहे. ह्या कार्यात क्लाइड लिंड्स्ट्रॉम हा माझा सहकारी होता. हा पट्टीचा व्हिस्की पिणारा आणि वेश्यागमनी. त्याखेरीज रम, ब्रँडी, जिन् , गांजा वगैरेंचाही त्याला पौक होता. माझ्या व्याख्यानांच्या वेळी क्लाईड स्टेजवर आपल्या जड डोळ्यांनी प्रेक्षकांना न्याहळीत बसायचा. प्रेक्षकांतल्या एखाद्या स्त्रीचा झगा इंचभर जरी इकडेतिकडे हलला, तरी त्याच्या तोंडाला जरासे पाणी

सुटल्यासारखे व्हायचे. मग मी लोकांना सांगत असे, ' लोक हो, पाहा ! मद्यपान, विषयवासना आणि सतत धावपळ यांमुळे माणसाची काय गत होते, त्याचं हे मूर्तिमंत उदाहरण पाहा ! ' क्लाइडची ती केविलवाणी अवस्था, ते दारूमुळे तांबारलेले डोळे, त्याचे ते प्रेक्षकांतल्या विशिष्ट वर्गाकडे पाहून चाललेले जिभल्या चाटणे पाहून पब्लिकचे डोळे भरून येत.

परवाच्या उन्हाळ्यात क्लाइड वारला. आपणा उभयतांना ओळखणाऱ्या एका मित्राने मला आपले नाव सुचविले आहे. आपण माझ्या हिवाळी दौऱ्यात क्लाइडची जागा घेऊ शकाल का ?

विनीत

पूज्य कॅल्वर्ट फिट्झिराल्ड.

' बर्कले 'मधे डेमॉक्रॅटिक पक्षाचा जोर असल्यामुळे रिपब्लिकन्स, निक्सन आणि मंडळी, पेंटॅगॉन् वगैरेंबद्दल विद्यार्थ्यांनी झोड उठविली होती. ' व्हाइट हाउस ' आणि तिथले दादालोक यांची सतत फिरकी घेण्याचा कार्यक्रम इथे चालू असतो. कॅलिफोर्नियाचा रोनाल्ड रीगन हा गव्हर्नर रिपब्लिकन् पक्षाचा होता. विद्यार्थ्यांचा त्याच्यावर भयंकर राग ! ह्या माणसाने विद्यापीठांना मिळणारी सरकारी मदत खूपच कमी केली होती. त्याच्याविषयीची एक अशीच तिखट विनोदी कथा होती. एक प्लॅस्टिक सर्जन आपल्या कौशल्याची बढाई मारीत असतो. "अहो, उगीच प्लॅस्टिक सर्जरी करून कुणाच्या नाकाचा आकार ठीक केला, कुणाचा चेहेरा सुंदर केला, ह्या गोष्टी मला सांगू नका ! असली शस्त्रक्रिया म्हणजे माझ्या हातचा मळ आहे. पण तुम्हांला हे कदाचित ठाऊक नसेल, एकदा लॉस् अँजेलिसला एका खेचराच्या गाडीची आणि ट्रकची टक्कर झाली. ट्रक जळून खाक ! फक्त ड्रायव्हरचे थोडेसे कुरळे केस सापडले. आणि त्या दोन खेचरांची ढुंगणं ! तेवढ्या भांडवलावर प्लॅस्टिक सर्जरी करून मी अक्खा माणूस पुन्हा तयार केला ! "

" म्हणजे जिवंत माणूस ? " दुसरा विचारतो.

" जिवंत ? आज तो कोण आहे माहीत आहे ? "

" कोण ? "

" कॅलिफोर्नियाचा गव्हर्नर ! — रोनाल्ड रीगन ! "

वरपांगी वाह्यात वाटणाऱ्या ह्या बंडखोर विद्यार्थ्यांच्या लेखनात खूप शहाणपणही आढळते. ह्या मासिकात एक व्यंगचित्र आहे. त्यात एक-जण चर्चमधल्या क्रॉसपुढे गुडघे टेकून देवाला सांगतो आहे की, ' हे प्रभो, मला पापवासनेपासून दूर ठेव. हे प्रभो, ज्या जगात साऱ्या देशातली मुले सुखशांतिसमाधानात वाढतील, जीवनाला काही अर्थ राहील, एकल-कोंडेपणा आणि आत्मघात यांपासून सारे दूर राहतील, असे वातावरण निर्माण कर .... ' अशी प्रार्थना करणाऱ्या माणसाची दोन-तीन चित्रे आहेत. चौथ्या चित्रात धडामकन् बॉम्ब कोसळल्याचा आवाज आणि धूर दाखवला आहे. आणि प्रभूची आकाशवाणी होत आहे : ' हे सगळं तू स्वतःच कर की भडव्या ! '

कॅम्पसवर निघणाऱ्या असल्या छोट्यामोठ्या पत्रिकांतून तिथल्या विद्यार्थिजगाशी खूप ओळख होते.

बर्कले विद्यापीठात प्राध्यापकांचे भोजनालय ही एक खूप जुनी लाकडी इमारत आहे. भोवताली गर्द राई आहे. आणि तीत ही आधुनिक सीमेंट काँक्रीटचा स्पर्श न झालेली इमारत आहे. शे-सवाशे माणसांच्या भोजनाची सोय होईल, असे जरा लांबरुंद असे लाकडी कुटीर म्हणता येईल, अशी ही पुरातन वास्तू. इथे फक्त अध्यापक आणि त्यांचे पाहुणे यांनाच प्रवेश असतो. ढिल्याढाल्या सुटातले प्राध्यापक चटकन् ओळखता येतात. ज्याने-त्याने हातात ट्रे घेऊन लांबलचक टेबलावर, ताटदानामागे मांडलेले पदार्थ आपल्याला हवे तसे निवडून घ्यावे, आणि टेबलाशी येऊन भोजन सुरू करावे. मग तो नुकताच लागलेला लेक्चरर असो, की ' नोबेल प्राइझ ' विजेता प्राध्यापक असो ! बर्कले विद्यापीठात दहा-बारा ' नोबेल प्राइझ 'विजेते प्राध्यापक आहेत. आणि स्टॅनफर्डला आणखी पाचसहा. म्हणजे सान्फ्रान्सिस्कोच्या परिसरात सुमारे सोळासतरा ' नोबेल प्राइझ-विजेते ' राहतात.

ह्या विद्यापीठात मला भारताविषयी आतोनात प्रेम असलेले आणखी

एक गृहस्थ भेटले. त्यांचे नाव रेव्हरंड मॉरिस् फॉर्बस्. मॉरिसबरोबर लंच झाल्यावर त्यांनी आम्हांला त्या विद्यापीठाच्या आवारातून हिंडवायला सुरुवात केली. सत्तरीच्या घरातला हा म्हातारा टुणटुण चालत होता. सुंदर ऊन पडले होते. हिरवळीवर तरुणतरुणींच्या मस्त आडवे पडून गप्पा चालल्या होत्या. मी दहा वर्षांपूर्वी आलो होतो, त्या वेळच्या ह्या अमेरिकन तरुणांच्या पोषाखात आणि आताच्यात कितीतरी फरक पडला आहे. कमरेखाली साध्या जीन्स् आणि वर कुडत्यापासून कोपरीपर्यंत नाना प्रकार! कुणी सूटवाला दिसला, तर तो प्राध्यापक आहे, असे समजावे. पुरुषांचे केस खांद्यापर्यंत लांब. भरपूर दाढ्यामिश्या. भलेमोठे चष्मे! मुलीही टापटीप पोषाख आणि व्यवस्थित केशरचना केलेल्या नव्हत्या, असे नाही. पण बहुतेकींनी केसांना वाऱ्यावरच सोडलेले! ही वरून अतिशय बेफिकीर आणि मोकाट वाटणारी मुलेमुली एखाद्या विषयाच्या अभ्यासाच्या मागे लागली, की मात्र कशी झपाटल्यासारखी वागतात. एवढ्या ह्या प्रचंड विश्वविद्यालयात कुठलाही वर्ग पंचवीस विद्यार्थ्यांपेक्षा मोठा नसतो. अभ्यासदेखील रगड करून घेतात. पण त्याचे दडपण वाटू न देता. तारुण्यसुलभ हुल्लडबाजी असते तितकीच जिद्दही असते. येल युनिव्हर्सिटीच्या नाट्यविभागात मी गेलो होतो. तिथल्या डायरेक्टरांना विचारले, "तुमच्या विद्यार्थ्यांचे कामाचे तास किती?"

"दहा तासांपेक्षा कधी कमी नाहीत." त्याने शांतपणाने सांगितले.

फिलॅडेल्फियाच्या विद्यापीठातही पंधरासोळा विद्यार्थि- विद्यार्थिनींच्या वर्गात मी भारतीय रंगभूमीवर व्याख्याने दिली होती. पहिल्या दिवशी वर्गात बसल्या-बसल्या सिगरेट ओढणारे, हॉट डॉग्ज खातखात व्याख्यान ऐकणारे विद्यार्थी पाहून मी दचकलोच. पण प्रश्नोत्तरे सुरू झाल्यानंतर त्या मुलामुलींचे पाणी किती खोल आहे, ते ध्यानात आले. ह्या असल्या उनाड वाटणाऱ्या कार्ट्यांनी भास-भवभूती वाचले असतील, अशी कल्पना नव्हती. बर्कलेमधल्या वाचनालयात आणि क्रीडांगणावर तितकीच गर्दी. मी ह्या विद्यार्थ्यांची अमेरिकन फुटबॉलची प्रॅक्टिस पाहून तर चाट झालो.

अमेरिकन फुटबॉल हा एक भलताच साहसी प्रकार आहे. क्रीडांगणावर त्यांचे क्रीडाशिक्षक त्यांना दणादण आदळायची 'प्रॅक्टिस' देत होते. इथले विद्यार्थी रेडियो स्टेशन चालवतात. इथे धार्मिक आणि निधर्मी -- दोन्ही विचारांच्या सभांना मुक्तद्वार आहे. राजकीय विचारप्रणालीतल्या सर्व मतभेदांना वाचा फोडायला पूर्ण परवानगी आहे. आईबापांच्या पैशावर शिकत राहणे हे इथल्या तरुणाला नामुष्कीचे वाटते. कित्येक तरुण पडेल ते काम करून पैसे जमवतात. कित्येक लवकर लग्न करतात. मग कधी बायको नोकरी करून, घर संभाळून नवऱ्याचे शिक्षण पुरे करते; तर कधी नवरा नोकरी करून बायकोच्या शिक्षणाला पैसे पुरवतो. जीवनातल्या असंख्य प्रश्नांना धैर्याने तोंड देण्याची, तारुण्य समृद्ध करून जगात पाठवण्याची ही युनिव्हर्सिटी जणू काय प्रतिज्ञा करून उभी राहिल्यासारखी वाटते.

प्रत्येक विद्यापीठाचे एक अभिमानाचे स्थळ असते. केंब्रिजला आपल्या हिरवळीचा अभिमान आहे. ऑक्सफर्डला जुने चर्च आणि तिथल्या जुन्या मठवासियांच्या प्राचीन भांड्याकुंड्यांतून भोजन करण्याची परंपरा यांचा अभिमान आहे. बर्कलेला आपल्या 'कॅम्पानाइल' ह्या टॉवरचा अभिमान आहे. 'जेन के. सेथर मेमोरियल टॉवर' असे त्याचे अधिकृत नाव. पण 'कॅम्पानाइल' हे रूढ नाव. तीनशेसात फूट उंचीचा हा टॉवर. मुंबई युनिव्हर्सिटीचा राजाबाई टॉवर आहे, तसा बर्कलेचा कॅम्पानाइल टॉवर. ह्या टॉवरवरचे ते प्रचंड घड्याळ बॅटरीवर चालते. चांगल्या वीस फूट उंचीच्या ह्या बॅटऱ्या आहेत! एक काटा आठ फुटांचा आणि दुसरा सहा फुटांचा. ह्या टॉवरवर कॅरिलॉन, म्हणजे घंटातरंग आहे. त्याला बारा सुरांच्या बारा घंटा ! मंद्र-धैवतापासून तारगंधारापर्यंतचे सूर असलेल्या. ह्या घंटा लंडनहून आणवल्या. ह्या एकूण घंटांचे वजन नऊ टन आहे म्हणतात. वर्ग चालू असताना दिवसातून तीनदा हा घंटातरंग वाजवतात, आणि परीक्षा सुरू होण्यापूर्वी वर्गातल्या शेवटल्या तासानंतर 'डॅनी डीव्हर'ची काहीशी करुण सुरावट याच्यावर वाजविली जाते आणि मग मात्र परीक्षा चालू असताना हे वादन थांबवितात. 'डॅनी डीव्हर'चे

सूर वाजले की शेवटल्या वर्षातल्या विद्यार्थि- विद्यार्थिनींची अंतःकरणे भरून येतात. विद्यापीठाचा निरोप घेऊन जीवनात शिरण्याची ही स्वरबद्ध सूचना.

ह्या टॉवरला उद्देशून इथल्या विद्यार्थि-विद्यार्थिनींनी कितीतरी कविता लिहिल्या आहेत. लेख लिहिले आहेत. कितीतरी प्रेमी युगुलांच्या ह्या टॉवरवर आणाशपथा झाल्या आहेत. गेली साठ वर्षे ह्या टॉवर बर्कलेची अनेक स्थित्यंतरे पाहत उभा आहे. 'दाऊ स्टॅण्डेस्ट सिरीन, अन्चेंजिंग ॲमिड चेंज्' असे त्याला उद्देशून एका कवीने म्हटले आहे. आम्ही लिफ्टमधून त्या टॉवरवर गेलो. मॉरिसबाबा भोवतालच्या त्या सुंदर परिसराची — निरनिराळ्या इमारतींची माहिती करून देत होते : "तो पाहा गोल्डन् गेट ब्रिज .... ते सोसालितो .... ते मॉर्मन लोकांचं मंदिर .... तो खास मुलींसाठी बांधलेला हर्स्ट जिम्नॅशियम .... तो सान्फ्रान्सिस्को ओकलँड ब्रिज .... ते इंटरनॅशनल हाउस .... "

हे सांगत असताना तो घंटातरंग चालू झाला. अंगावर रोमांच उभे राहिले. इतक्या विशाल दृश्याला तर असलेच संगीत हवे होते.

"आणखी काय पहायचंय, बोला !" मॉरिस म्हणाले.

"तुमच्या ह्या कॅम्पस्वर दहाबारा 'नोबेल प्राइझ'–विनर्स आहेत ना ?" माझी पत्नी म्हणाली.

"होय."

"मला त्यांच्यातला एखादा पाहायला मिळेल का ?" तिने विचारले.

"अवश्य !"

"पण ते लॅबोरेटरीत कामात असतील. उगीच कशाला त्यांना त्रास ?" मी मोडता घातला.

"पण मी नुसतं दुरून पाहीन."

भारतीय संस्कारात 'दर्शन' ह्या गोष्टीला किती विलक्षण महत्त्व आहे. वास्तविक तिथले बहुतेक 'नोबेल प्राइज' विजेते हे विज्ञानाचे महापंडित. माझ्या पत्नीचा प्रश्न 'स्थिरावला समाधीत स्थितप्रज्ञ कसा असे। कृष्णा, सांग कसा बोले कसा राहे फिरे कसा ?' — असा

अर्जुनाच्या प्रश्नासारखाच होता. खरे म्हणजे मला कृष्णाच्या पुढल्या उत्तरापेक्षा अर्जुनाचा तो प्रश्नच अतिशय हृद्य वाटतो. शेवटी मॉरिसबाबा माझ्या पत्नीला बरोबर घेऊन प्रयोगशाळेतल्या समाधीत स्थिरावलेल्या एका विज्ञानी महर्षींच्या दर्शनाला गेले. मी आणि मकानी तिथल्या हिरवळीवर गप्पा मारीत बसलो. अर्धा-पाऊण तास झाला, तरी दोघांचा पत्ता नाही. मला वाटले की, सुनीताबाई बहुधा 'कामाच्या वेळी भेटायला येणाऱ्या लोकांना तुमची बायको स्वतःविषयीचा गैरसमज होऊ न देता बाटेला कशी लावते?' याविषयीचा फॉर्म्युला विचारीत असाव्यात. इतक्यात आनंदाने फुलून मॉरिसबाबा आणि सुनीता आम्हांला येताना दिसली.

"दिसला नोबेल प्राइझ-विनर?" मी विचारले.

"एक नाही — दोन भेटले! एक प्रोफेसर टाउन, आणि दुसरे चेंबरलेन!"

प्रोफेसर चेंबरलेनना कुठल्या विज्ञान-विषयाचे 'नोबेल प्राइझ' होते, ते मी विसरलो. पण त्या युनिव्हर्सिटीत टाउन हे प्रोफेसर ऑफ फिजिक्स ॲट् लार्ज आहेत. 'प्रोफेसर ॲट् लार्ज' म्हणजे शिकवावेसे वाटले, तर शिकवावे. पण त्यांचे ते त्या कॅम्पसवरचे अस्तित्व महत्त्वाचे. 'गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यः संछिन्नसंशयः'चे मला स्मरण झाले. खरेच, महान् बुद्धिमंत-प्रज्ञावंतांच्या नुसत्या अस्तित्वालादेखील केवढे महत्त्व असते! पण हा एवढा महापंडित युनिव्हर्सिटीतल्या अगदी खालच्या वर्गाला आनंदाने शिकवीत असतो. परदेशातले हे नोबेल प्राइझ-विजेते शास्त्रीय विषयावरचे बालवाङ्मय लिहीत असतात. आमच्याकडे आम्ही लहान पोरांसाठी पुस्तके लिहिण्याला, मोठ्यांसाठी लिहिण्यापूर्वी घटवलेल्या पुस्त्या समजतो. प्रोफेसर टाउन यांचे 'लासर किरणांविषयी'चे संशोधन आहे. ह्या महापंडिताने माझ्या पत्नीला आपल्या संशोधनाची अर्धा तास खर्चून माहिती दिली. जाता-जाता तिने सहज विचारले, "ह्या प्रकाशाची रंगमंचावर योजना करता येईल का?" हा प्रश्न मी त्यांना विचारला, हे तिने मला सांगितल्यावर मी दचकलो. माझ्या आजीने एका पहिलवान-परिषदेच्या कार्यकर्त्याला माझ्या आजोबांकडून आपण लिहून घ्यायला

आला असताना ' पोटमाळ्यावरून कोळशाचं पोतं खाली उतरवता येईल का हो ? ' असा प्रश्न विचारला होता. पण आश्चर्याची गोष्ट अशी की, प्रोफेसर टाउनच्या एका तरुण सहकाऱ्याने तिचा हा प्रश्न ऐकून उडीच मारली आणि म्हणाला, " एका आठवड्यापूर्वी इथल्या थिएटरमध्ये एका नाटकात एक विशिष्ट प्रकाशाचा परिणाम हवा होता. त्या वेळी आम्ही गंमत म्हणून ह्या किरणाचा प्रयोग केला. " नाटकाशी आपलाही संबंध जुळवला, ह्या आनंदात ते दोघे, आणि आपला प्रश्न अगदीच येडबंबू-सारखा नव्हता ह्या आनंदात माझी पत्नी, असा त्यांचा निरोपाचा प्रवेश झाला. बर्कले विद्यापीठासारखाच हा वयाने वृद्ध पण मनाने अतिशय तरुण मॉरिस् फॉर्बस् मनाला चटका लावून गेला. विद्यापीठाच्या दाराशी ' कम् अगेन — कम् अगेन ' म्हणत उभी असलेली त्याची ती ठेंगणीशी मूर्ती आजही माझ्या डोळ्यांपुढे उभी आहे.

परदेशातली ही विद्यापीठे पाहताना मला खूप वाईट वाटत असते. त्या विद्यार्थ्यांच्या भाग्याचा मी जितका हेवा करतो, तितका मी कुणाचाही केला नसेल. सान्फ्रान्सिस्कोत बर्कलेप्रमाणेच स्टॅनफर्ड हे दुसरे विद्यापीठ. ह्या विद्यापीठाची रचना अधिक रेखीव आहे. मला वाटते, बर्कलेप्रमाणं हे वाढत-वाढत गेलेले विद्यापीठ नाही. उत्तम स्थापत्य-विशारदाकडून आधी आखणी करून इथल्या इमारतींची रचना केली आहे. इथल्या इमारती स्पॅनिश वास्तुशिल्पाचे सौंदर्य घेऊन उभ्या आहेत. या विद्यापीठात शिरताना एखाद्या विस्तीर्ण खिस्ती मठात शिरल्यासारखे वाटते. बर्कलेपेक्षा इथे शिक्षणाचा खर्चही अधिक आहे म्हणतात. पुण्यातल्या कॉलेजबाहेर असतात, तशा इथे शेकडो सायकली स्टँडवर उभ्या होत्या. हल्ली इथे पुन्हा एकदा सायकलींची फॅशन आली आहे. मोटारी भरमसाट वाढल्यामुळे पार्किंगचा प्रश्न येतो, आणि पार्किंगला जागा शोधता-शोधता तास चुकायचा. तेव्हा सायकल बरी. पण इथल्या सायकलींना कुलपाच्या साखळ्या नसून चांगले साखळदंड बांधलेले होते. सायकली पळवण्याचे बरेच प्रकार झाल्यामुळे ही खबरदारी घेतात. सायकल चालवताना तो साखळदंड बँडवाल्याच्या पट्ट्यासारखा गळ्यात

अडकावण्याचीही फॅशन आहे. ह्या देशात कशाची फॅशन होईल, हे ब्रह्म-देवालाही सांगणे अवघड आहे !

माझे तरुण मित्र आपटे आणि त्यांची पत्नी सुनंदा आम्हांला स्टॅनफर्ड दाखवायला घेऊन गेले होते. हे नवराबायको दोघेही एंजिनियर आहेत. सुनंदा ही पार्ल्याच्या माझ्या गोविंदा परांजपे ह्या बालमित्राची मुलगी. एरवी पाहिली, तर हुजुरपागेतला वर्ग आटोपून सदाशिव पेठेतल्या घराकडे निघाल्यासारखी वाटते. पण सान्फ्रान्सिस्कोतल्या एका पूल बांधणाऱ्या मोठ्या कंपनीत ती प्रमुख एंजिनियर होती. ती बांधकामशास्त्रातली तज्ज्ञ असल्यामुळे आम्ही स्टॅनफर्डचे वास्तुवैभवच पाहत हिंडत होतो. इथेही एक अतिशय देखणे नाट्यगृह आहे. रोमन चर्चची आठवण करून देणारे सुंदर चर्च आहे. त्या सगळ्या इमारती आणि तालवृक्ष यांची ही युनिव्हर्सिटी बांधणाऱ्याने विलक्षण संगती साधली आहे. तिथे आम्हांला एखाद्या स्पॅनिश शहरातून हिंडल्यासारखे वाटत होते. एखाद्या वळणावरून तट्टावर बसलेला डॉन् क्विक्झोट ( याला कुणी किशॉट् म्हणतात, कुणी किओटेही ! कुणी आणखी काही ) आणि त्याचा इमानी सेवक सांको पांझा भेटेल, असेही वाटत होते. पण त्या युनिव्हर्सिटीपेक्षा तिथे जाताना घडलेला एक प्रसंगच मनाला अधिक चिकटून राहिला.

अमेरिकेतल्या गावाबाहेरच्या रस्त्याचे एक वळण चुकले, की चांगला पाचपंचवीस मैलांचा हेलपाटा पडतो. बोलण्याच्या नादात आपट्यांनी डाव्याऐवजी उजवे वळण घेतले. जरा पुढे गेल्यावर वाट चुकल्याचे ध्यानात आले. रहदारीचे कायदे असे कडक की, ' घ्या गाडी मारून, ' हे प्रकरण इथे संभवतच नाही. ट्रॅफिक पोलिस तर सदैव कावळ्यासारखे टोच मारायला हजर ! तरीही आसपास कावळा नसावा अशा समजुतीने आपट्यांनी ' यू टर्न घेऊ नये, ' अशा पाटीखालून अस्सल भारतीय ढंगात वळण घेतलेच. भारतात ' इथे लघवी करणेची नाही, ' ह्या पाटी-खालीच बसण्याची हौस दांडगी ! आपट्यांनी फुल टर्न मारला आणि ते ' सुटलो, ' म्हणतात, इतक्यात पोलिसांची गाडी समोर उभी ! अशा वेळी आपली मोटार थांबवावी लागत नाही. हातपाय गार पडून मोटार आपोआपच

थांबते! " चला! पन्नास डॉलर्स गेले! " (आपल्या चलनाच्या हिशेबात चारएकशे रुपये!) आपटे म्हणाले. इतक्यात 'नमयतीव गतिर्धरित्रीम्' अशा चालीने एक सहा फूट उंचीचा, देखणा, सडपातळ असा नीग्रो पोलिस ऑफिसर आला. त्याने काही विचारण्यापूर्वीच आपटयांनी त्याच्या हातात लायसेन्स दिले. (आपल्याकडे इतर काही हातात देतात!) तो ऑफिसर शांतपणाने आपल्या मोटारीत गेला. तिथून त्याने फोनवरून हेड हापिसात बातचीत केली. आम्ही आमच्या गाडीतून हे सारे पाहत होतो. काही वेळाने तो परत आला. त्याने आपटयांचे लायसेन्स त्यांच्या हातात दिले, आणि भलत्याच सौम्यपणाने म्हणाला, " कॅलिफोर्नियात ट्रॅफिकचे नियम पाळण्यासाठी केलेले आहेत. गाडीत बायकामुलं आहेत. पाटया वाचून त्याप्रमाणे गाडी चालवा. "

शब्दांच्या मारावर भागले! आपटयांनी निमूटपणे गाडी चालवायला सुरुवात केली. मी 'पुंडलीक वरदा हारि विठ्ठल!' म्हणालो. आपटयांनी हळूच लायसेन्स उघडून पाहिले. त्याच्यावर गुन्ह्याचा छाप मारला नव्हता. " आता मात्र खरंच सुटलो! " आपटे म्हणाले, " कारण रहदारीचे कायदे मोडल्याचे तीन शिक्के बसले, की ड्रायव्हिंग लायसन्सच रद्द होतं. "

" बाप रे! अमेरिकेत मोटार चालवायचं लायसेन्स गेलं, की खेळ खलास! "

पोलिस ऑफिसरने हेड ऑफिसमध्ये फोन करून लायसेन्स नंबर सांगितला की लगेच कॉम्प्युटरवरून ड्रायव्हरची सगळी माहिती मिळते. लायसेन्स घेताना जो फॉर्म भरायचा असतो, त्यात फार तर कुंडलीतले शनि-मंगळ कुठे आहेत, एवढा तपशील वगळून बाकी सगळी माहिती भरावी लागते. आणि गुन्ह्याच्या किंवा अपघाताच्या जागेवर ड्रायव्हरचे सगळे पूर्वचरित्र पोलिसांना समजते.

" त्याला आपली एवढी का दया आली, समजत नाही, " आपटे म्हणत होते. ते समोरच्या बाजूला बसल्यामुळे त्या अमेरिकन फौजदार-साहेबांकडे मी घनश्यामाच्या तावडीत सापडलेल्या धुंडिराजासारखा

केलेला अभिनय आपट्यांनी पाहिला नव्हता. आजवर कुठल्याही मराठी नाटकाच्या समीक्षकांनी ' भूमिकेला इतका न्याय देणारा करुण अभिनय ' पाहिला नसेल ! त्यामुळे फौजदारसाहेब द्रवले. हे मी आपट्यांना सांगितले नाही. आपणच आपल्या अभिनयाची तारीफ काय करायची ! पण त्यानंतर मी सार्वजनिक स्वच्छतागृहाची इतक्या तातडीने का चौकशी करीत होतो हे त्यांना कळले नसावे, असे धरून चालतो.

तेव्हापासून मात्र मी मोटारीतून जाताना रस्त्यातल्या ट्रॅफिकच्या पाट्या जोरजोरात वाचू लागलो. राजाभाऊंनी आम्हांला एकदा एक ' सतरा मैलांचा फेरफटका ' नावाचे समुद्रतीरावरचे उपवन दाखवायला नेले होते. अमेरिकेत दोनअडीचशे मैलांचा प्रवास म्हणजे नाक्यावरच्या पानवाल्याच्या दुकानात गेल्यासारखे मानतात. एक तर मोटारींची इंजिने दणदणीत ! रस्ते असे गुळगुळीत की, पोटातले पाणीही हलत नाही. अमेरिकेत पोटात तसे साधे पाणी क्वचितच असते, हा भाग निराळा. भल्या पहाटे आम्ही निघालो. आजूबाजूला कॅलिफोर्नियातली ती फळा-फुलांनी बहरलेली मैलोन्-मैलांची शेती. पहिला मुक्काम रेडवुड फॉरेस्ट-मध्ये करायचा होता.

डोंगरकुशीतून वळणे घेत-घेत आमची – म्हणजे राजाभाऊंची – मोटार रेडवुडच्या दिशेला निघाली होती. सगळीच जंगले इतकी गर्द आणि झाडूनपुसून लक्ख ठेवलेली की, रेडवुड जंगलात आणखी काय निराळे असेल ते कळेना. डोंगरमाथ्यावरून खाली पाहिल्यावर पायथ्याची जंगले लाल-तांबूस-सोनेरी, फुलकारी केलेले हिरवेगार गालिचे अंथरल्यासारखी भासत होती. साऱ्या सृष्टीचाच अशा वेळी भरजरी दरबार होऊन जातो. अशा भारावलेल्या स्थितीतही माझे पाट्या वाचणे चालूच होते. तेवढ्यात एक पाटी आली : ' रेडवुड फॉरेस्ट — दहा मैल. ' अमेरिका अजूनही मैलांतून किलोमीटरांत गेलेली नाही.

गाडी रेडवुड फॉरेस्टमध्ये शिरली, हे सांगायला आता पाटीची गरज नव्हती. समोर शेकडो फूट उंचीचे सरळच्या-सरळ आकाशाच्या भेटीला धावणारे वृक्ष दिसू लागले होते. मी जर्मनीतले जगप्रसिद्ध ब्लॅक फॉरेस्ट

पाहिले आहे. तोही एक अजब प्रकार ! पण त्या जंगलात नाना प्रकारचे वृक्ष होते. इथे शंभरातली नव्वद झाडे रेडवुडची. अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर हा शेकडो मैलांचा रेडवुड वृक्षांचा पट्टाच्या-पट्टाच आहे. इमारतीला हे लाकूड उत्तम. सोन्याच्या भावात जात असावे. त्या लाकडाचे ते शेकडो फूट लांबीचे सरळच्या-सरळ ओंडके नेणाऱ्या ट्रक्स-देखील अफाट असतात. ह्या जंगलात वनविहाराची उत्तम सोय आहे. सुटीच्या दिवसात हजारो माणसे ह्या जंगलात येऊन राहतात. ठिक-ठिकाणी त्यांच्यासाठी छोट्याछोट्या लाकडी झोपड्या बांधलेल्या आहेत. तंबूंची सोय आहे. जंगल म्हटल्यावर झरे आले, पाण्याचे पाट आले, ' ट्रेकिंग ' करण्याच्या मैलोन्-मैलाच्या वाटा आल्या. पण ह्या सगळ्यात जर मला आवडले असेल, तर इथले सुंदर ओपन-एअर थिएटर ! केवळ पूर्वजन्मीच्या पापामुळे मला चिकटलेले एक मित्र म्हणतात, " कुठंही गेलास तरी कुत्र्याला दिव्याचा खांब दिसतो तसं तुला थिएटर दिसतं ! " आपले ते कुठलेसे सरकारी ऑफिस यापलीकडे जगात काहीही प्रेक्षणीय नाही, असे मानणाऱ्या ह्या माझ्या मित्राने माझ्या थिएटर शोधण्याच्या शौकाला ' सारमेय-दीपस्तंभ'न्याय लावण्याचे कारण नव्हते. ' न मागे तयाची रमा होय दासी ' ह्या न्यायाने रमा सोडून असंख्य सुंदर गोष्टी आपोआप येऊन माझ्या गळ्यात पडल्या आहेत, त्याला मी काय करू ? रेडवुड फॉरेस्टमधले ते ओपन-एअर थिएटर हा असाच नशिबाचा भाग ! प्रत्यक्ष स्टेज एखाद्या चिमुकल्या लाकडी धर्मशाळेसारखे होते. जुन्या देवळातल्या बहालांसारखीच पाऊसपाणी खाऊन काळपट पडलेली, पण टणक अशी बहाले. लाकडी स्टेज ! दोन्ही बाजूंना लाल विटांच्या आणि लाकडी फळ्यांच्या भिंती. फक्त चार कोळिष्टके चिकटविली असती, आणि शाळामास्तरांनी शिकविलेल्या अक्षरांचे आपण कसे चीज केले आहे हे दाखविणारी इरसाल वाक्ये चार कार्ट्यांनी त्या फळकुटावर कोळशाने लिहिली असती, की त्या रात्री तिथे मौजे गुढे-डुगवे किंवा कोकणातल्या असल्या कुठल्या तरी ग्रामस्थ मंडळीचे ' संगीत सती महानंदा — अर्थात शिवभक्तीचा विजय ' हे नाटक घालायला काही हरकत नव्हती.

जंगलातल्या एखाद्या वन्य जमातीने आपल्या नाचरंगासाठी उभा केल्यासारखा तो खुला रंगमंच ! चारही दिशांना, स्वर्गातल्या देवांनादेखील फुकटात घुसता येऊ नये, म्हणून उभे राहिलेले ते गगनचुंबी रेडवुड वृक्ष ! आणि बसायची बाके म्हणजे कोचासारख्या कोरलेल्या रेडवुडच्या तुळ्या ! तुळईचे एक काप काढून ती आडवी टाकली, की झकास कोच ! आसपास कुणी नाही, याची खात्री करून राजाभाऊ आणि मंडळींना त्या शिटात बसवून मी त्या रंगमंचावरून 'पयले नमऽन गनचेवाला हो पयले नमऽन गनचेवालाऽऽ' गाऊन घेतले. काय रंगतील तिथे कोकणातले दशावतार ! रेडवुडच्या माथ्यांवरच्या पानांना संकासुराच्या आरोळ्यांनी शिरशिरी येईल. कोकणात किंवा चांद्याविंद्याला अशी कितीतरी जंगले आहेत. पण तिथे अशी खुली नाट्यमंदिरे करायचे कुणाला सुचतच नाही.

त्या रेडवुड फॉरेस्टमधून पाय निघेना. तेवढ्यात थोडा पावसाचाही शिडकावा आला. जंगल सुस्नात झाले. आम्ही त्या 'सतरा मैलांच्या फेरफटक्या'च्या सायप्रसच्या बनाच्या दिशेला निघालो. 'हा हायवे, तो हायवे करीत भरवेगाने राजाभाऊंनी मोटार मॉंटेरे ह्या समुद्रकाठच्या शहराच्या दिशेने नेली. वाटेतल्या नगरांना आणि उपनगरांना डावीउजवी घालीत आम्ही त्या मॉंटेरे शहरात येऊन पोहोचलो. समुद्रतीरावरची तीदेखील एक स्वप्ननगरीच ! ह्या शहराजवळच हे सायप्रस वृक्षांचे उपवन आहे. त्या उपवनात शिरायला प्रवेशद्वारापाशी तिकीट काढावे लागते. अमेरिकन धनिकांच्या इथे वाड्या आणि बंगले आहेत. त्या उपवनातून ही सतरा मैलांची नागमोडी वाट जाते. प्रत्येक वळण काढले की दृश्य कसे एखाद्या जपानी लँडस्केपसारखे. भल्यामोठ्या हिरव्यागार छत्र्या धरल्यासारखे हे वेताच्या उंचीचे, पण असंख्य आधुनिक शिल्पकृती असल्यासारखे, नाना तऱ्हेच्या पवित्र्यांत उभे असलेले सायप्रस वृक्ष ! एका छोट्याशा टेकडीवरून वळणे घेत-घेत ही वाट समुद्रकिनाऱ्यावरून जाते. सायप्रस वृक्षांना मला वाटते दर्याची संगत मानवत असावी. ह्या समुद्रात आणखी एक गंमत आहे, ती सील माशांच्या खडकांची.

खडकावर हे शेकडो 'सागरकेसरी' गर्जना करीत होते. तीरावरून त्यांचे दर्शन घेणाऱ्या प्रवाशांची त्यांना सवयही झाली असावी. इथे कोणी दिसले, की तिथे प्रचंड कलकलाट व्हायचा.

हळूहळू किनाऱ्यावर संध्याछाया पसरायला लागल्या. सायप्रस वृक्षांच्या आकृती आता हळूहळू छायाकृतीसारख्या झाल्या. कातरवेळेला असे काही खूप सुंदर पाहिले की एकाएकी मनाला उदासी का वाटते, कळत नाही. पाहता पाहता सारे अंधारात बुडून जात असल्याची अनुभूती माणसाच्या जीवनाच्या अखेरच्या त्या अटळ अंधाराचे नकळत स्मरण करून देते की काय कळत नाही. कालिदासाचा 'पर्युत्सुक' शब्द ही भावावस्था दाखवतो. पण अबोधपूर्व न्यूनाच्या स्मरणापेक्षा अंतिम निरोपाच्या क्षणाच्या स्मरणाची ती उदासी असावी! कोण जाणे!

सान्फ्रान्सिस्कोमधल्या मुक्कामाचा शेवटला दिवस उजाडला. कॅलिफोर्निया ही साक्षात् द्राक्षभूमी! त्यामुळे सान्फ्रान्सिस्को सोडण्यापूर्वी त्या द्राक्षांतून वारुणीची सिद्धी कशी होते, ते पाहणे हा महत्त्वाचा भाग होता. पंचपंच उषःकाले आम्ही आणखी एका दीडदोनशे मैलांच्या फेरफटक्याला निघालो. फेरफटका कसला? ही एक 'तीर्थ'यात्राच होती. गाडीने हमरस्ता सोडला, आणि ती डोंगराडोंगरांतून निघाली. पाचपन्नास मैल गेले आणि आम्ही द्राक्षारण्यात शिरलो. पाहावे तिथे फक्त द्राक्षांची लागवड. तीनचार तासांनंतर एका 'वायनरी'च्या प्रवेशद्वारापाशी आलो. जिथे द्राक्षांपासून नाना प्रकारच्या वाइन्स तयार करतात, त्याला 'वायनरी' म्हणतात. आमच्यासारखे आणखीही लोक हे तीर्थस्थान पाहायला आले होते. नेहेमीच अशी माणसे येत असतात. त्यामुळे 'वायनरी'च्या चालकांनी पाहुण्यांना 'वायनरी' दाखवण्यासाठी मार्गदर्शक नेमले आहेत.

कॅलिफोर्नियात द्राक्षांची लागवड करून शराब करण्याचा उद्योग मुख्यतः इटालियन लोकांनी सुरू केला. ही 'वायनरी' अशीच एका स्विस-इटालियन मालकाची होती. आमचा मार्गदर्शक एक देखणा, थट्टेखोर, मध्यम वयाचा स्विस-इटालियन गृहस्थ होता.

" आऽ ! माय् हिंदू फ्रेंड्स् ! " म्हणत त्याने आमचे स्वागत केले. प्रवेशद्वारापाशी अभ्यागतांसाठी असणाऱ्या त्या टुमदार बंगलीवरून आतल्या कारखान्याची कल्पना येत नाही. त्या बंगलीलादेखील सहज दिलेली इटालियन स्थापत्याची डूब आहे. बाग तर थेट इटालीतून उचलून आणल्यासारखी. मधेच ते रोमन पद्धतीचे खांब. कुठेकुठे संगमरवरी आसने तयार केलेली. त्यांच्याभोवती लाकडी पट्ट्यांच्या जाळ्या. त्या जाळ्यांच्यावर नाना प्रकारच्या वेली चढविलेल्या. नुकताच पाऊसही पडून गेला होता. हवेत मस्त गारवा होता. त्या स्वागतकक्षातून आत जातो, तर एका वेळी चांगली शेदोनशे माणसे मजेत बसतील असा 'मयखाना'! आणि तिथे आपल्या सौंदर्याचा शराबीलाही कैफ चढविणाऱ्या अंगूरबाला. नजरसे नजर मिलाके पिलानेवाल्या! आमचा वाटाड्या तर स्विस्-इटालियन रक्ताचा! त्याच्या नसातून रक्ताऐवजी आरक्त वारुणीच पिढीजाद वाहत आलेली. वीसवीस–तीसतीस फूट उंचीच्या महाप्रचंड पिंपांतून वर्षानुवर्षांपूर्वी गाळलेले मद्य भरलेले. तरबेज मद्यमुनी नुसत्या पहिल्या चवीतून कुठल्या वर्षाच्या द्राक्षाच्या हंगामातले ते मद्य आहे, हे ओळखतात. मी आपला नेहेमीसारखा 'हे कसं काय बुवा ओळखता तुम्ही?' हा अडाणी सवाल केलाच!

" आहा ! " तो आन्तोनियो म्हणाला, " बाईची नक्की उमर ओळखणारे डोळे असतात, तशी मदिरेची उमर ओळखणारी जीभही असते, महाशय ! "

महाशयांनी आशय लक्षात आल्याचा चेहरा केला. हा आन्तोनियो क्षणाक्षणाला मदिरा आणि मदिराक्षींची चतुर सांगड घालीत होता. कुठली मदिरा कुठल्या आकाराच्या पात्रातून घ्यावी, याचेही रहस्य तो सांगत होता. इतकेच नव्हे तर प्रत्येक जातीच्या मदिरापानाची लय काय असावी हेही त्याने समजावून दिले. त्या नाना प्रकारांच्या मदिरांचे निरनिराळ्या ऋतूंशी काय नाते आहे, होष आणि बेहोषी यांची सीमारेषा कशी ओळखावी, याचेही भाष्य त्या शुक्राचार्यांकडून आम्ही ऐकत होतो. ब्रह्मसूत्रासारखे सोमसूत्रही असावे. हा त्या सूत्राचा कुशल भाष्यकार

होता. ' वायनरी'त पाहुण्यांना आकंठ मद्यपानाची विनामूल्य सोय असते. पण कुठेही कोणी झिंगून पडत नव्हते. एक तर द्राक्षाचे मद्य स्वभावतःच नाजूक असते. तो काही घोटासरशी आउट करणारा ' ठर्रा ' नव्हे. त्यातून काही मिनिटांपूर्वीच दारू ढोसणे आणि मदिरेबरोबर प्रणयाराधन करणे ह्यांतला फरक आन्तोनियोने चतुराईने समजावून दिला होता. ' द्राक्षाची मदिरा चुंबित चुंबित संपवावी ' हे त्याचे सूत्र होते. ' ज्याला चुंबन पिता येते, आणि पेयाचे दीर्घ चुंबन घेता येते त्यालाच आस्वादाचे रहस्य कळते. ' ह्या त्याच्या ' प्यासबोधा'तील समासावरचे निरूपणही कानात होते. त्यामुळे तिथल्या मुक्तपानातली सवलत सर्वांनी समंजसपणानच घेतली. त्या ' वायनरी'त तिथल्या विविध प्रकारच्या मद्यांची फुटकळ विक्रीही होते. आम्ही काही बाटल्या विकत घेतल्या. पण इतरांना सोडून आन्तोनियो आमच्याच जोडीजोडीने येत होता. कुठले मद्य कधी घ्यावे याचा सल्ला देत होता. आमची खरेदी संपल्यावर तो आम्हांला म्हणाला,—

" तुम्ही सान्फ्रान्सिस्कोलाच राहता ना ? "

" हो. " राजाभाऊ म्हणाले.

" मग माझं एक काम कराल ? "

" जरूर ! "

" ही बाटली माझ्या गुरूंना पोचवा. " असे म्हणून एक अतिशय महाग मद्याची बाटली सुंदर आवरणात घालून त्याने राजाभाऊंजवळ दिली.

" तुम्ही शर्माजींना ओळखता का ? "

" कुठले शर्माजी ? " राजाभाऊंनी विचारले.

" माझे आध्यात्मिक गुरू ! " आन्तोनियो म्हणाला. घटकेपूर्वी एक नंबरचा रंगेल वाटणारा आन्तोनियो आता निराळाच दिसत होता. " त्यांनी मला योगाभ्यास शिकवला. भारतीय तत्त्वज्ञानाची चटक लावली. त्यांना ह्या दारूची किंमत नाही, मला ठाऊक आहे. पण मी दुसरं काय देणार ? "

" तुम्ही योगाभ्यास करता ? "

" गेली पाच वर्षं. न चुकता. आसना – प्रानायामा ...."

" काय होतं त्यामुळं ? " मी विचारलं.

" –माझी परीक्षा घेताय् वाटतं ? " आन्तोनियो हसत म्हणाला, " मी ह्या गुरूचं पुस्तक वाचलं. त्यांना भेटलो. त्यांनी मला मार्ग दाखवला. "

" पण मग ह्या मद्यालयात एवढे रंगून कसे गेला आहात ? " मी प्रश्न केला.

" रागावू नका. पण तो माझ्या अभिनयकौशल्याचा भाग आहे. तुम्ही नाटकात काम करता असं ह्या तुमच्या फ्रेंडनी मला सांगितलं. खरा नट आपली नाटकातली भूमिका नाट्यगृहातच ठेवून येतो ना ? "

' वायनरी'त मदिरेची स्तोत्रे गाणारा, येणाऱ्या-जाणाऱ्या तरुण पोरींच्या गालावर खट्याळ थट्टेने लाजेची लाली फुलवणारा आन्तोनियो आणि घरी गेल्यावर योगाभ्यासासाठी ध्यानधारणा करीत बसणारा, योगशास्त्राच्या पुस्तकांचे अध्ययन करणारा आन्तोनियो, ह्यातला खरा कुठला ? लोकांना तासन् तास द्राक्षात गुंगवून स्वतः मात्र – मी मागे एकदा म्हटल्याप्रमाणे – रुद्राक्षात शिरणारा हा आन्तोनियो मला कोड्यात टाकून ' गुड बाय् – हॅव् अ नाइस टाइम ' म्हणून निघून गेला.

आम्ही सान्फ्रान्सिस्कोच्या दिशेला निघालो. वाटेत पाऊस झोडपत होता. दोनतीन तासांच्या प्रवासानंतर सान्फ्रान्सिस्कोचा झगमगाट दिसायला लागला. पाऊस उघडला होता. ती लक्षलक्ष दीपांची आरास दिसल्यावर राजाभाऊ म्हणाले, " आज आपल्याला रात्री दिवाळी साजरी करायला जायचं आहे. मुळ्यांच्या घरी सान्फ्रान्सिस्कोतली मराठी मंडळी जमणार आहेत. "

रेडवुड फॉरेस्ट, ते सायप्रस उद्यान, ती वायनरी, तो आंतोनियो अशी नाना प्रकारची चित्रे डोक्यात घुसळीत आम्ही मुळ्यांच्या घरी गेलो. मराठी गप्पांच्या ओघात सान्फ्रान्सिस्कोतल्या त्या सुंदर बंगल्याला पुण्यातल्या डेक्कन जिमखान्यावरच्या घराचे रूप आले. उद्योगधंद्यासाठी आपल्या घरापासून हजारो मैल दूर आलेली ही मराठी मंडळी. लाडू –

कडबोळी – चकल्या – करंज्यांच्या आणि मराठी भाषेच्या आधाराने भोवतालच्या सान्फ्रान्सिस्कोतून उठून भारतातल्या आपापल्या गावी दिवाळीला जमल्याचा आनंद भोगत होती. मला कुसुमाग्रजांच्या ओळी आठवल्या : 'नवलाख तळपती दीप विजेचे येथ। उतरली जणू तारकादळे नगरात.' अशा ह्या सान्फ्रान्सिस्कोत ह्या मराठी मंडळींची मात्र 'परि स्मरते आणिक करिते व्याकुळ केव्हा। त्या माजघरातिल मंद दिव्याची वात' अशी अवस्था होती.

दुसऱ्या दिवशी पहाटे आम्ही सान्फ्रान्सिस्कोच्या विमानतळावरून लॉस् अँजेलिसला जाणारे विमान पकडले. विमानाने आकाशात झेप घेतली. तो विस्तीर्ण गोल्डन् गेट ब्रिज् , ते डोंगर, तो प्रशान्त सागर – हां हां म्हणता ठिपक्यासारखे होत गेले. त्या दृश्याकडे शेवटले पाहून घेत होतो. परदेश-प्रवासात योगायोगाने भेटून स्नेह जमलेल्या हाडा-मामाच्या माणसांचा निरोप घेतानादेखील इतके मन भरून आले नसेल. त्या दूर दूर जाणाऱ्या सान्फ्रान्सिस्कोकडे पाहत म्हणालो,—

'गुड्बाय् मिस्टर सान्फ्रान्सिस्को!'

## हंगेरी — माझा नवा स्नेही

बूडापेष्टच्या विमानतळावर, हंगेरीय भाषेचा गंध नाही आणि इंग्रजी जाणणारा कुणी भेटत नाही अशा अवस्थेत महाराष्ट्रातले ख्यातनाम इत्यादी लेखक आणि त्यांच्या सौभाग्यवती 'क्वो व्हाडिस?' कुठे जाणार? हा सवाल घेऊन उभे होते.

आपण उतरलो ते बूडापेष्टच ना? असाही एक प्रश्न मनाला चाटून गेला. असले प्रश्न मांजरीच्या जिभेसारखे चाटत असतात. अशा लोंबलेल्या अवस्थेत काही काळ गेला. तेवढ्यात समोरून एक देखणा तरुण पुढे आला, आणि म्हणाला "मिस्तर देशपान्द?" मी होकार आणि सुटकेचा निश्वास यांच्या मिश्रणातून होणारा ध्वनी तोंडावाटे काढला. त्याने माझ्या पत्नीच्या हाती एक फुलांचा गुच्छ दिला. उशीरा विमानतळावर पोहोचल्याबद्दल दिलगिरी व्यक्त केली. मी 'चालायचंच त्यात काय –' अशा अर्थी बोलून दिलगिरी परत केली.

'माझं नाव ॲण्ड्रयू. तुमच्या हंगेरीतल्या मुक्कामातला मी तुमचा दुभाषी आणि वाटाड्या. तुमची कुठलीही अडचण मला निस्संकोच सांगा.

तुमचा इथला मुक्काम सुखाचा झाला पाहिजे." एवढे बोलून 'हमाल हमाल' वगैरे न करता त्याने आमची बॅग् उचलली. साहजिक दुसरी बॅग मला उचलणे आले. आम्ही टॅक्सीच्या दिशेला निघालो. मी त्याला पहिला सवाल टाकला — "हंगेरीय भाषेत थँक्यूला काय म्हणतात?" "क्योसोन्योम्!" तो म्हणाला. मी तो शब्द घोकू लागलो.

व्हिएन्नासारख्या एका रुबाबदार खानदानी शहरातून मी बूडापेष्टला आलो होतो. त्या शहरातून हिंडताना सेसिल् बी द मिलच्या सिनेमातल्या एखाद्या प्रचंड सेटिंगमधून हिंडल्यासारखे वाटे. साऱ्याच इमारती दगडी. राजप्रासादासारख्या. प्रत्येक इमारत शेदीडशे वर्षांचे चरित्र घेऊन उभी. दारात मोटारी आणि दुकानात आधुनिक वस्तू आहेत आणि स्त्रीपुरुषांचे कपडे ताज्या फ्याशनचे म्हणून. नाहीतर एखाद्या वाड्याच्या प्रवेश-द्वारातून घोड्यावर मांड ठोकलेला भालाईत बाहेर पडतो की काय असेच वाटायचे. परंपरा आणि नवता यांचा हे युरोपीय देश काय सुरेख सांधा जोडतात. व्हिएन्नात मी विराट ऑपेरा हाऊसही पाहिलं आणि एक अत्याधुनिक रंगमंदिर. बाहेरून मात्र रस्त्यातल्या इतर इमारतींशी सुसंवाद साधणारे वास्तुशिल्प होते. व्हिएन्नाच्या मुक्कामात, संगीत-नाट्य ह्या-सारख्या माझ्या अधिक जिव्हाळ्याच्या विषयांवर तिथल्या रसिक पंडितांशी सहासहा-सातसात तास झालेल्या चर्चांची धुंदी ओसरली नव्हती. बूडापेष्टमध्ये शिरताना व्हिएन्नात सुरू झालेल्या माझ्या यात्रेची रंगत अधिक वाढायला हवी अशी ओढ माझ्या मनाला होती. परदेशात हिंडताना दिवसातला प्रत्येक क्षण सत्कारणी लावायची मनाला फार ओढ असते. हाती असणाऱ्या मोजक्या परदेशी चलनाइतकेच तिथल्या मुक्कामाचे क्षणही आधीच मोजलेले असतात. अशा वेळी मन अधाशी होऊन जाते.

विमानतळाकडून शहराकडे येणारा रस्ता अमेरिकन रस्त्यांच्या तुलनेने रुंद नव्हता. मोटारींच्या रांगाही बेताच्याच. शनवारची सुटी होती. पाऊस नुकताच पडून गेला असावा. बऱ्यापैकी ऊन होते. साडे-तीन चारचा सुमार होता. हवा चांगलीच गार होती. आजूबाजूच्या

वृक्षांनी हेमंती पोशाख चढवलेला दिसत नव्हता. गाडीने चार-दोन वळणे काढली आणि डॅन्यूब नदीचे दर्शन झाले. पूर्व युरोपातल्या पाच-सहा देशांतून वाहणारी ही नदी. ह्या डॅन्यूबच्या ऐलतीरावर बूडा आणि पैलतीरावर पेष्ट. पेष्ट हा मूळचा गाव. बूडा ही एकेकाळच्या अमीर-उमरावांच्या प्रासादांनी नटलेली पण नंतर वसलेली नगरी. साऱ्या हंगेरीची लोकसंख्या एक कोटी, त्यातले वीस लाख म्हणजे एक पंचमांश लोक बूडापेष्टमधे राहतात. "तुम्ही थकला नसला तर किल्ल्यावरून बूडापेष्टचा देखावा पाहू या...." अॅण्ड्र्यू म्हणाला.

"अवश्य" मी होकार भरला आणि लगेच विचारले, "टॅक्सी थेटपर्यंत जाते ना?" कारण किल्ला म्हटला की माझ्या मनाचे बुरुज ढासळतात.

"हो हो" म्हणत अॅण्ड्र्यूने हंगेरीय भाषेत ड्रायव्हरला टॅक्सी किल्ल्याच्या बाजूने घ्यायला सांगितले. 'किल्ल्याकडे घ्या' एवढे म्हणायला हंगेरीय भाषेत सुमारे तीसचाळीस वाक्ये योजावी लागतात असे मला वाटले. पुढल्या मुक्कामात एकूण हंगेरियांची ही मॉग्यिऑर भाषा जरा ऐसपैसपणाने वावरणारी आहे असंच वाटत होतं. माणसं जिभेची सढळ.

ह्या डॅन्यूब नदीवर बूडा आणि पेष्टला जोडणारे सहासात प्रचंड पूल आहेत. ह्या पुलांच्या तुलनेनं आमचा लकडी तथा संभाजी पूल वगैरे ह्या काठावरून त्या काठावर टाकलेल्या शिड्या वाटाव्या. अर्थात डॅन्यूब आणि मुळा-मुठा यांची तुलना करणे देखील खऱ्या हत्तीची बुद्धिबळातल्या हत्तीशी तुलना करण्यासारखे आहे हा भाग निराळा. जशी नदी तसा पूल! बूडापेष्टमधल्या अशाच एका प्रचंड पुलावरून आमची टॅक्सी मलबार हिलसारख्या टेकडीतून वाट काढीत निघाली. एका भव्य चर्च-पुढे उभी राहिली. युरोपातले हे किल्ले म्हणजे आमच्या किल्ल्यांसारखे भग्नावशेष नव्हेत. आजही चांगले नांदते गाजते आहेत. गडावरच्या जुन्या गावाचा ठुमदारपणा टिकवून धरला आहे. नव्या इमारतीत आतून हव्या तेवढ्या आधुनिक सोयी कराव्यात, पण बाहेरची रचना जुन्या

नगरशिल्पाशी मिळतीजुळतीच हवी. जी काय अत्याधुनिक घरबांधणी करायची असेल त्यासाठी गावाबाहेर नव्या वसाहती योजलेल्या असतात. त्यामुळे युद्धात उद्ध्वस्त झालेले जुने वाडेहुडे, जुनी चित्रे-नकाशे वगैरे मिळवून ह्या युरोपीय देशात पुन्हा जसेच्या तसे उभे केले आहेत. आम्ही जुन्या वास्तू बिनदिक्कत जमीनदोस्त करून जागेचे प्लॉट पाडून विकतो. पुण्यातल्या चित्रशाळेचा वाडा पडलेला पाहिल्यावर मला खूप हळहळ वाटली होती. प्रचंड वृक्ष पाडणे हा तर सदोष मनुष्य-वधाइतका भयंकर गुन्हा मानायला हवा. शेवटी सारे काळाच्या उदरातच जाणार आहे वगैरे वेदान्त खोटा आहे. कुणाच्या तरी उदरात भरपूर द्रव्य जात असते. आणि वास्तुशिल्पाच्या इतिहासातली सुंदर पाने आम्ही फाडून टाकत असतो. काही हजार डॉलर्स मिळतात म्हटल्यावर आम्ही आमच्या देवळातल्या सुंदर शिल्पाकृतीसुद्धा विकल्या. परदेशात हिंडताना तिथल्या पदार्थसंग्रहालयात आमचे सुंदर नटराज, शिवपार्वती, लक्ष्मी-सरस्वती, भगवान श्रीविष्णू बाजारात विकल्या गेलेल्या गुलामांसारखे उभे आहेत असं मला वाटतं! एकेकाळी नवसाला पावणारी महिषासुर-मर्दिनी — जिला आरत्या, स्तोत्रे वगैरे ऐकायची हौस, ती मुकाट्याने 'ओह्, हौ हॉरिबल्!' असलं काहीतरी ऐकत काचेच्या पिंजऱ्यात उभी असते. आणि हंगेरीसारख्या चिमुकल्या देशातली माणसं उद्ध्वस्त इमारतींचे जुने घोटीव दगड पुन्हा गोळा करतात आणि त्यांना पुन्हा एकदा जुन्या वैभवाने मिरवायला लावतात. ह्या, महाराष्ट्रातल्या चार-पाच जिल्ह्यांएवढ्या देशाने खूप आघात सोसले आहेत. युरोपच्या हृदयस्थानी असलेला हा देश. केवळ संख्येने कमी आणि लांबीरुंदीत आखूड असल्यामुळे काही अपराध नसताना ह्या सुंदर देशाला आणि त्याहूनही सुंदर माणसांना मोठ्यांच्या भांडणात उगीचच बळी जावे लागले आहे. इतकी संकटे सोसूनही किंबहुना सोसल्यामुळेच असेल — ह्या लोकांनी आपली मॅग्यिऑर संस्कृती, आपले संगीत, नृत्य, कापडावरची फुलकारी, आपले कुंभारकाम, आपली रुचकर भोजनपद्धती — खूप आस्थेने जोपासली आहे.

सम्राटशाही, हिटलरची हुकूमशाही यासारख्या निरनिराळ्या राजवटींतून

हंगेरीने आता समाजवादी राज्यपद्धती स्वीकारली आहे. डॅन्यूबवरचा तो भव्य पूल ओलांडला. डोळ्यापुढे बूडाच्या डोंगरमाळेवरचे भव्य चर्च पाहून त्या इमारतीत आता कामगारांच्या एखाद्या सहकारी सोसायटीची शाखा उघडली असावी अशी मला शंका आली. आणखी चार चढ काढून आमची टॅक्सी त्या सुंदर आणि भव्य कॅथीड्रलपुढे आली. चौकात बऱ्याच मोटारी उभ्या होत्या. चर्चमध्ये स्त्री-पुरुषांची गर्दी शिरत होती. त्यात बरेचसे गणवेषधारी सैनिकही होते. पोशाखाच्या थाटावरून आणि एकूण वातावरणावरून ही केवळ रविवारच्या सायंप्रार्थनेची गर्दी वाटत नव्हती. तेवढ्यात प्रवेशद्वारापाशी आणखी एक मोटार येऊन उभी राहिली आणि त्यातून ख्रिस्ती वधूचा तो शुभ्र पेहराव केलेली नवरी मुलगी उतरली. बूडापेष्टमध्ये येऊन आम्हाला पुरता तास झाला नव्हता. आलो ते एकदम लग्नाच्या मांडवात. मग आम्हीही तो ख्रिस्ती लग्नविधी पाहायला कॅथीड्रलमधे शिरलो. समाजवादी हंगेरीतली लग्ने पाद्रीबाबाच्या आशीर्वादाने होत असतील अशी कल्पना नव्हती. वधूची मिरवणूक चर्चमधल्या क्रुसाच्या दिशेला निघाली. चिमुकल्या पऱ्यांसारख्या दिसणाऱ्या आणि सोनेरी केसांच्या लड्यांवर वेण्या माळलेल्या पाठराखणींनी वधूचा तो पांढऱ्याशुभ्र मयूरपुच्छासारखा दिसणारा झग्याचा घोळ चिमटीत धरला होता. मिरवणुकीच्या आघाडीवर चर्चच्या गायकवृंदातले ते चिमण्या देवदूतांसारखे दिसणारे बालकलावंत मोठ्या गंभीरपणाने हातात मेणबत्त्या घेऊन चालले होते. वधूच्या शेजारी तिच्या कोपरात कोपर घालून साठीच्या पलीकडला एक वृद्ध गृहस्थ एक एक पाऊल गंभीरपणाने टाकीत चालला होता. मी ॲण्ड्र्यूला हळूच विचारले, "तो कोण ?–"

"नवरा असावा" ॲण्ड्र्यू म्हणाला.

इतक्या सुंदर तरुणीने त्या म्हाताऱ्यात काय पाहिले असावे ते कळेना. पण चर्चमधल्या लग्नाविषयी चिरंजीव ॲण्ड्र्यूचे ज्ञान माझ्याहूनहि कमी होते. तरुणपिढीला चर्च-पाद्री-याबाबतीत आता सोयरसुतक उरलेले नाही. पण समाजवादी हंगेरीत आजही अनेक कुटुंबे आपले

धर्मपंथ आणि त्यातले रीतिरिवाज टिकवून आहेत. हे कुटुंब त्यातले असावे किंवा मुलीच्या सासूचाही माझ्या मुलाचे लग्न चांगलं देवा-ब्राह्मणांच्या – किंवा ह्या ठिकाणी देवापाद्र्याच्या साक्षीने, चर्चमधे चांगला जोरात आर्गन वाजवून व्हायला हवे – असा आग्रह असावा. आणि 'म्हणतीय् म्हातारी तर कशाला आड या' असा इतर कुटुंबियांनी पोक्त विचार केला असेल. वधूची मिरवणूक पाद्रीबाबापर्यंत पोहोचल्यावर तिला बरोबरीने चालवीत नेणारा तो म्हातारा बाजूला झाला. नवरदेव तिथे उभा होता. तो लष्करात शिलेदार असावा. तरणाबांड, देखणा. तरीच त्या लग्नाला मिल्ट्रीवाल्यांची गर्दी. आता तो मिल्ट्रीवाला होता की पोलिसातला हे मला कळलं नाही. 'गणवेष' ह्या बाबतीत माझे लक्ष एकूणच कमी. एकदा मुंबईच्या फुटपाथवरून चालताना समोरून येणारा गणवेषधारी माणूस लष्करातला कर्नलबिर्नल असेल म्हणून मी आदबीने बाजूला होऊन त्याला वाट दिली. आणि सहज मागे वळून पाहिले तर त्या कर्नलसाहेबाच्या पाठीला ब्यांडातला ताशा लटकवलेला होता!

तिथे पाद्रीबाबाचा वधूवरांना उद्देशून हंगेरीय भाषेतून उपदेश सुरू झाल्यावर मी जांभई आवरली पाद्रीबाबांचे चर्चमधले ते गंभीर उपदेश निद्रानाशाच्या रोगावर रामबाण उपाय आहेत. पण एकूण समाजवादी राजवटीने पाद्रीबाबांच्या धंद्यावर गदा आणली नाही. तरुण पिढीला मात्र शाळेत 'देवा तुझिया चरणी नमितो' वगैरे नसते. असो. तर माझी जांभई ॲण्ड्र्यूने नेमकी पाहिली आणि आपली आवरून म्हणाला — 'चला जाऊ या—'.

आम्ही बूट न वाजवता बाहेर पडलो. त्या चर्चभोवती असलेल्या एका पांढऱ्या शुभ्र संगमरवरासारख्या वाटणाऱ्या तटाच्या दिशेला निघालो. ही रेखीव तटबंदी युद्धात नष्ट झाली होती. ती आता जशीच्या तशी पुन्हा बांधून काढली आहे. त्या तटाची रुंदी एकावेळी चांगली पंधरा माणसांची आडवी रांग उभी राहू शकेल अशी रुंद होती. देशोदेशींच्या प्रवाशांचे थवे हिंडत होते. आम्ही तटावर गेलो. खाली पाहतो

तो क्षितिजाच्या ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत डॅन्यूब! पलीकडच्या तीरावर पेष्ट. काठावर एकाहून एक भव्य अशा आपापले वास्तुशिल्पवैभव दाखवीत उभ्या असलेल्या इमारती, ते आकाशाला भिडणारे चर्चेसचे कळस, डाव्या हाताला हंगेरीय पार्लमेंटची ती प्रचंड इमारत. डॅन्यूबचे विशाल पात्र. दोन्ही तीर जोडणारे ते पूल आणि नदीतून संथपणाने चाललेली नाना आकाराच्या जहाजांची ये जा! निर्मळ हवा होती. उन्हे उतरत होती. मनात म्हटले 'वा!—यात्रेची सुरुवातच काय सुरेल झाली.' ह्या तटबंदीला 'फिशरमन्स् बॅस्टियन' म्हणतात. कधी-काळी ह्याच डॅन्यूबमध्ये मच्छीमारी करणाऱ्या कोण्या कोळीदादानी ती बांधायला द्रव्य दिले असावे. एखाद्या गबर कोळ्याच्या स्वप्नात मेरीमाता आली असेल आणि, 'लेकरा, डोंगरावरच्या मथायच्या देवळाभोवती तटबंदी बांधलीस तर तुझ्या जाळ्यात मागशील ते गावेल....' वगैरे दृष्टान्तही दिला असेल, ....काही तरी कथा असणारच. जुन्या वास्तू टिकल्या तर जोडीला अशा ह्या कथाही टिकतात. पण असली काही कथा मला ऐकायला मिळाली नाही आणि ॲण्ड्र्यूलाही ठाऊक नव्हती. हळूहळू अंधार पडायला लागला. डॅन्यूबचे दोन्ही तीर लक्ष दिव्यांनी उजळून निघाले. पुलांवर दीपमाळा झगमगायला लागल्या. भव्य इमारती-वर आणि चर्चच्या शिखरांवर दिव्यांचे प्रकाशझोत पडले आणि पाहता पाहता त्या बूडापेष्टला एखाद्या ऐतिहासिक संगीत नाटकाच्या विराट रंगमंचाचे रूप आले. चतुराईने टाकलेल्या दिव्यांच्या झोतांनी ते जुने वास्तुवैभव उजळून काढले होते. डॅन्यूबच्या प्रवाहातून आता बोटी-वरच्या दिव्यांच्या लखलखत्या माळाच संथपणाने वाहिल्यासारख्या वाटत होत्या. डोंगरमाथ्यावरून ते दृश्य पाहता पाहता मी म्हणालो, अंक पहिला—प्रवेश पहिला. स्थळ बूडापेष्ट.... कलावंत नेहमीचे—यशस्वी की काय ते बूडापेष्टच्या विमानतळावरून हंगेरीचा—'क्योसोन्योम् हंगेरी—थँक्यू हंगेरी....' म्हणून निरोप घेताना ठरायचे होते.

त्या फिशरमन्स् बॅस्टियनकडून उतरता उतरता दुसऱ्या एका डोंगरमाथ्यावर अमेरिकन स्वतंत्रतेच्या पुतळ्यासारखा एक प्रचंड उभा

पुतळा प्रकाशाच्या झोतात न्हाऊन निघताना पाहिला. तो हंगेरीची नाझी भस्मासुराच्या तावडीतून रशियन् फौजांच्या मदतीने १९४७ साली सुटका झाल्यानंतर उभारण्यात आला आहे. एकेकाळी पुण्याची पर्वती जशी पुण्यातून कुठूनही दिसायची तसे हे डोंगरमाथ्यावरचे मुक्तिस्मारक बूडापेष्टमधून कुठूनही पाहिले असता दिसते. सिग्मंड स्त्रोब्ल नावाच्या शिल्पकाराची ही कलाकृती. सुमारे पंचाऐंशी फूट उंचीचा असा, मुक्ती ह्या कल्पनेचा हा पुतळा आहे. हात उंचावून एक स्त्री उभी आहे. उंचावलेल्या हातात तिने तालवृक्षाचे पान धरले आहे. मुक्तिस्मारकाचा तो भव्य पुतळा बूडापेष्टमध्ये अगदी एखाद्या तासाच्या मुक्कामाला आलेल्या माणसाच्या नजरेतून देखील सुटणार नाही! खंडाळ्याच्या घाटातल्या जुन्या रिव्हर्सिंग स्टेशनच्या टेकाडावर समोरच्या सह्याद्रीच्या शिखराकडे पाहणारा आणि खालच्या तळकोकणावर वरदहस्त ठेवलेला शिवाजी महाराजांचा पुतळा उभा करावा ही माझी ऐतिहासिक इच्छा हा पुतळा पाहताना पुन्हा एकदा उफाळून आली. शिवाजी महाराजांचा पुतळा उभा करायला मला विचाराल तर एवढी एकच जागा आहे. (पण मला कशाला विचाराल?)

टॅक्सी आता माथेरान – महाबळेश्वरसारख्या वाटणाऱ्या परिसरातून चालली होती. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनी डेरेदार वृक्ष. झाडीतून डोकावणारे बंगले. रस्त्यात माणसे मात्र अजिबात नव्हती. एकतर मला वाटते ह्या थंड प्रदेशांत मनुष्यप्राण्याची निपजच कमी. शिवाय महायुद्धात पिढीच्या पिढी कापली गेलेली. समाजही शंभर टक्के सुशिक्षित. त्यामुळे किती मुले परवडतील याचा हिशेब करून प्रपंच आटोपशीर केलेला. शिवाय तसल्या थंडीत आणि पावसात कडमडायला बाहेर तरी कोण पडणार? पण ऊन पडलेले असले की रस्ते चांगलेच गजबजतात.

टॅक्सी एका तीनमजली आधुनिक बांधणीच्या इमारतीपुढे येऊन थांबली. टॅक्सीवाल्याला ॲण्ड्र्यूने 'हाच तो पत्ता' हा मतलब पन्नास साठ वाक्यांची उधळपट्टी करून सांगितला. 'घर नंबर दोन. रॉद्ना उत्सा' असा पत्ता होता. हंगेरीय भाषेत रस्त्याला 'उत्सा' म्हणतात.

आणि कुत्र्याला ' कुत्सा ', थँक्यूला ' क्योसोन्योम् ' ! माझे ह्या मॉज्यिऑर भाषेचे ज्ञान रस्ता, कुत्रा आणि आभार ह्या तीन शब्दांपुढे गेले नाही. ही युरोपातल्या इतर कुठल्याही भाषेशी सुतराम् संबंध नसलेली भाषा आहे. लिपी रोमन खरी पण त्या मुळाक्षरांचे इंग्रजीतले उच्चार आणि ह्या मॉज्यिऑर भाषेतले उच्चार यांचे नाते नाही. त्यामुळे पुढल्या मुक्कामात 'ॲण्ड्र्यूमुखे बोलावे' हे धोरण ठेवावे लागणार हे मी ओळखले !

आमच्या ह्या हंगामी घरमालकाचे नाव गाल असे होते. ( उच्चारात गालातला गा जरासा ओढावा. ) तळमजल्यावर बिऱ्हाडकरूंच्या नावाच्या व्हिजिटिंग कार्डाएवढ्या छोट्या पाट्या होत्या. मी त्यात एखादे भारतीय आडनाव दिसते की काय ते पाहायला लागलो. पण सगळे फ्लॅटस् गाल कुटुंबातल्याच मंडळीचे होते. आमच्यासाठी राखून ठेवलेला फ्लॅट पहिल्याच मजल्यावर आहे हे ऐकून मी सुटकेचा निश्वास टाकला. कारण बॅगा स्वतः उचलून वर न्यायच्या होत्या. स्वावलंबन हा गुण मला विशिष्ट मर्यादेपर्यंतच ( म्हणजे कुठपर्यंत ठाऊक नाही ) आवडतो. ॲण्ड्र्यूने फ्लॅट् उघडला. कोरा करकरीत. महिन्यापूर्वीच वास्तुशांत झाली असावी. आतल्या बाजूला एका खोलीकडून दुसऱ्या खोलीकडे जाणारे पॅसेजेस् एका वेळी एकच गाल जाऊ शकेल एवढेच होते. आणि स्वैपाकाच्या खोलीत गालाला गाल न लागता उभे राहणे अशक्य. थंडी चांगलीच पडली होती. दिवाणखान्यातच एक दिवाणवजा खाट टाकली होती. तिथे हवा गरम करणारी गॅसची शेगडी होती. ती सुरू कशी करायची हे आमचे तर जाऊ द्या पण खुद्द बालके ॲण्ड्र्यू यासही ठाऊक नव्हते. मग घरमालकाची शोधाशोध. शेवटी गालीणबाई सापडल्या. मग त्यांचे आणि ॲण्ड्र्यूबाबाचे त्या हंगेरीय भाषेत पाच मिनिटे संभाषण. त्याचा तर्जुमा, ' तो ग्यास हीटर कसा सुरू करावा हे त्यांनाही ठाऊक नाही. ' एवढ्या एका इंग्रजी वाक्यात झाला. मग काही काळ त्या अनेक गालांपैकी कुठला गाल पुढे येऊन आमचे थंडीपासून निवारण करू शकेल बरे ? — ह्या चिंतेत.

दुसऱ्या दिवशी रविवार होता. 'उद्या आपल्याला बालाटोन तलावाची सहल करायला जायचे आहे, सकाळी आठला तयार राहा' असे सांगून ॲण्ड्र्यू अंतर्धान पावला. आम्हीही 'आता करावे कसे?' अशा चेहऱ्यांनी त्या फ्लॅटमधल्या सोयी — खरं म्हणजे गैरसोयी पाहू लागलो. तपासणी-नंतर गरम पाण्याचे नळ कमालीच्या थंड स्वभावाचे आहेत असे आढळून आले. संडासाची साखळी ओढल्यावर सुरू होणारा पाण्याचा धबधबा आपण होऊन थांबायला तयार नव्हता. हा असाच वाहात राहिला तर उद्या बालाटोन तलावात पाण्याचा टिपूस उरणार नाही अशी मला धास्ती वाटायला लागली. मग उगीचच 'थांब की लेका' म्हणून मी पुन्हा साखळी ओढली तेव्हा थांबला. भारत–हंगेरी खुल्या सांस्कृतिक करारासारखा हल्ली भारतीय प्लंबरांनाही त्या देशी पाठवण्याचा गुप्त करार झाला असावा. काही वेळाने दारावरची बेल वाजली. आणि मालकीणबाई आपल्या सूनबाईला घेऊन आल्या. हा तिचा फ्लॅट. पण चिरंजीव गाल बूडापेष्टपासून पाचपन्नास मैलांवर असलेल्या एका गावात वकिली करीत होता. (समाजवादी देशात वकिलीही करता येते हे एक नवे ज्ञान!) दर शनिवारी रविवारी हे तरुण जोडपे बूडापेष्टला येत असते. सूनबाईला इंग्रजी बोलता येत होते — तिला इंग्रजीतून आमच्याशी बोलताना पाहून सासूबाईंना कमालीचे कौतुक वाटत होते. घरमालकीण-बाई त्या नावाला, पदाला, दर्जाला कालिमा फासणाऱ्या होत्या. इतके अगत्य, काय हवे नको ते विचारण्याची इच्छा ही त्या स्थानाला शोभत नाही! भाडेकरूंशी असेच वागत गेली तर गाल कुटुंबाचे हाल 'कुत्रा' देखील खाणार नाही असे मी तिला सांगणार होतो. तेवढ्यात तिचा तो वकील मुलगा आला. त्याला हंगेरीयखेरीज फक्त जर्मन भाषा येत होती — तो एकदम जर्मन बोलायचा. म्हणजे गालबाईंचे हंगेरीय, सूनबाईचे हंगेरीय उच्चारातले इंग्लिश, तिच्या नवऱ्याचे जर्मन — माझे तर्खडकरी इंग्लिश आणि माझ्या पत्नीचे रत्नागिरीच्या पटवर्धन हायस्कुलातले इंग्रजी ह्या भाषिक गोंधळातून आम्हाला कळल्या त्या गोष्टी एवढ्याच की — सकाळचा चहा नास्ता वगैरे आम्ही स्वतःच

करून घ्यायचा. ही पहिली अट ऐकताच माझ्या सहधर्मचारिणीचा चेहरा साफ पडला. तिची सुखाची एकमेव कल्पना आहे ती म्हणजे सकाळी उठल्यावर कोणीतरी आपल्याला चहाचा एक कप आयता तयार करून देत आहे ही! पण पुण्याहून बूडापेष्टपर्यंत कुंडलीतले हे एवढेसे सुखदेखील लाभू न देणारे ग्रह आमच्या आधी तिथे येऊन पोहोचलेले असतात हे त्या दिवशी कळले. दुसरा तपशील कळला तो असा की, रस्ता ओलांडला की फूडस्टोअर्स आहे. ते शनिवारी रात्री नऊपर्यंत उघडे असते. काय दूधबीध आणायचे असेल तर आताच आणून ठेवा. गाल-काकूचे हंगेरीय भाषण चालू असताना आम्ही चेहऱ्यावर स्मितहास्य, असहाय्यता, सज्जनपणा आणि थोडासा संताप असल्या भावांचे मिश्रण थापून उभे होतो. गोड बोलून सगळ्या गैरसोयी किती सुरेखपणाने सांगता येतात याचा तो एक आदर्श वस्तुपाठ होता. त्यातून त्या चोवीस-पंचविशीतल्या सूनबाईंचे ते अप्रतिम लावण्य. उद्या समजा साक्षात् उर्वशीने केसांना गोड हेलकावे देत, 'उद्या सकाळी उठून स्वत: चहा करून घ्यायचा हं गडे' वगैरे सांगितलं तर आपण 'च्यायला ही म्हणजे आपदाच आहे....' असं थोडंच म्हणणार? आपण त्या हेलकाव्यानंच खलास! तर एकूण त्या सगळ्या विविध भाषिक परि-संवादातून तो गॅसचा हीटर कसा पेटवायचा ते विचारायचं राहूनच गेलं! गालीण काकू आणि रतिमदनासारखं दिसणारं ते जोडपं निघून गेलं आणि आम्ही रसद आणायला निघालो.

थंडीचा कडाकाही चांगलाच होता. प्रदेश अनोळखी. भाषा इल्ला. त्यामुळे ते फूडस्टोअर्स शोधून काढणे हे कोलंबसाने अमेरिका खंड शोधण्याइतके कठीण नसले तरी सोपे नव्हते. हंगेरीय सरकारने आमच्या हाती भोजनखर्चासाठी म्हणून 'फोरिंट्स' दिले होते. आता एका फोरिंटात काय काय बसते ते दुकानात गेल्यावरच कळले असते. ॲण्ड्र्यूने हे पैसे तुम्हाला जेवणखाणाला भरपूर होतील असा दिलासा दिला होता. टॅक्सीबिक्सीच्या खर्चाची काळजी करू नका हेही सांगितलं होत. शेवटी आम्हाला ते फूडस्टोअर्स सापडले. दूध, लोणी, पाव, हॅम्,

सॉसजेस्, वाइन्स्, जॅम्, लोणची.... भरपूर फूड् होते. प्रत्येक पाकिटावर, डब्यावर, बाटलीवर, स्वच्छ अक्षरात किंमती छापल्या होत्या. मुख्य म्हणजे दुकानातल्या विक्रेत्या पोरी तत्परतेने मदत करीत होत्या. समाजवादी हंगेरीत चांगले सकस भोजन स्वस्त दरात मिळण्याची सोय झाली आहे हे लगेच ध्यानात आले. सत्याचा विजय होतो की काय मला ठाऊक नाही, पण प्रजेला अन्न भरपूर मिळाले नाही तर कशाचाच विजय होत नाही !

फूडस्टोअर्सकडून परतताना आम्हाला एक रेस्टॉरंट दिसले. दुसऱ्या दिवशीची न्याहरी घरी आणून टाकली. आणि मोर्चा पुन्हा एकदा त्या दिशेला वळवला. छोटेसेच रेस्टॉरंट होते. एकेकाळी कुणाची तरी टुमदार बंगली असावी. एक बऱ्यापैकी लांबरुंद दिवाणखाना. मध्यम आकाराच्या खोल्या. समोर आंगण. अशा थाटाची खंडाळ्या-लोणावळ्याला एकेकाळी कृष्णकुंज किंवा मझेबान व्हिला या नावाच्या बंगल्या असायच्या तसलीच हीही बंगली होती. आम्ही आत शिरलो. सारा कारभार स्त्रीवर्गाच्या हाती देऊन बाप्यामाणसांनी हंगेरीय कलाकुसर केलेला तो खास पोषाख चढवून बँड वाजवायचे काम हाती घेतले होते. त्यातले दोघेतिघे फिडलवर जिप्सी धुना वाजवीत टेबलाटेबलाशी हिंडत होते. कोपऱ्यात एक लहानसे सहासात इंच उंचीचे स्टेज. त्याच्यावर एकजण पियानोच्या पट्टयांवर सूड काढीत होता. त्याच्यामागे, फिडल कुटुंबातला आडदांड महापुरुष असल्यासारखा दिसणारा 'डबल बेस्' धरून हाटेलवाल्या कुटुंबातला तितकाच आडदांड माणूस त्या महावाद्याच्या तारा उपटीत ठेका देत होता. संगीत हा माझ्या जिव्हाळ्याचा विषय. पण भोजन हाही तितकाच जिव्हाळ्याचा विषय ! पण त्या दोघांचे एकत्र नांदणे मला नामंजूर आहे. भोजनाला गप्पांची साथ हवी ! मी जर हॉटेल काढले असते तर त्याचे नाव 'जिव्हाळा' असेच ठेवले असते. इथे खाणे आणि बोलणे ह्यासाठी जिव्हाच महत्त्वाची. आता गाण्यात खाण्याला आणि मधेमधे बोलण्याला अजिबात जागा नाही ! इकडे एखादा गवई भुईला नाक लावून तीन तीन आवर्तनाची तान काढीत असताना आपण

जोरदार भुरका मारावा हे माझ्या मनाला पटत नाही! साहेबाच्या संस्कृतीत एरवी थेटरात उत्तमातल्या उत्तम जागेला दाद न देता शोक-सभेचा ठराव ऐकल्यासारखा बसणारा साहेब तेच गाणे हॉटेलात वाजायला लागले की खुशाल स्टेकवर तुटून पडलेला दिसतो! मोकाट सुटलेले ते फिडलवाले पाहिल्यावर आमच्या जेवणाचे वांगे होणार हे मी ओळखले. घटकाभर आम्ही त्या दारातच लोंबकळत उभे होतो. जवळ जवळ सगळी टेबले भरली होती. तेवढ्यात हंगेरीय थाटाचा काळा झगा, फुग्याफुग्याचा शुभ्र ब्लाउज, त्याच्यावर रंगीबेरंगी फुलकारी केलेले काळे जाकिट चढवलेली आणि आपल्या सोनेरी केसांच्या चांगल्या रुंद वेण्यांचे चक्कर घातलेली परिवेशिका आली आणि हंगेरीय भाषेत असे इकडून या म्हणायला जे काही म्हणत असतील ते म्हणत तिने आम्हाला पलीकडल्या खोलीतल्या एका रिकाम्या टेबलापाशी नेले.

आम्ही पदार्थांच्या यादीवरून नजर फिरवली! परदेशात ही नजर मी मुख्यत: किमतीच्या आकड्यांवरून फिरवीत असतो. पूर्वी एकदा मी इटालीत जॉर्जियन् गुलाश खाल्ले होते. हंगेरीय गुलाशसुपाचीही तारीफ ऐकून होतो. हंगेरीय भाषेत त्याला गुय्याश म्हणतात. मत्स्याहारी कोकणी लोकांच्या स्वैपाकात गोळ्याची आमटी नावाचा एक शाकाहारी प्रकार असतो. हे सूप तसलेच होते. फक्त मटणाच्या गोळ्या. बेसन लाडवापेक्षा जरा लहान! एकदम पाव्हण्यांची संख्या वाढल्यावर चतुर गृहिणी हां हां म्हणता कढत पाणी ओतून पाव्हण्यांची कढी पातळ करते तसलाच हा गुय्याश सूपचा प्रकार निघाला. हंगेरीय लोक पश्चिमी युरोपीयांच्या मानाने जरा अधिक झणझणित खाणारे म्हणून प्रसिद्ध. हंगेरीय फुग्या मिरच्याही सुप्रसिद्ध आहेत. रंगावरून प्रकार तिखट असावा असे वाटले. पण त्या तिखटपणाची आपल्या *तिखटपणाच्या दर्जाशी तुलना केली तर कोल्हापूरच्या वोलाईच्या* मटणाचा रस्सा हाणणाऱ्याला एखाद्या मोरूकाका जोगळेकराच्या लॉजिंग बोर्डिंगातले साधे वरण 'जरा जपून खा बरं का – तिखट असते' असे म्हणण्यासारखे होते. पण गुय्याश सूप होते मात्र चवदार! जोडीला

श्वेत वारुणी. मी हळूच इकडे तिकडे पाहून मामा काण्यांच्या हाटेलातल्या कांदा-बटाटा पातळ भाजीत (आहाहाहा!) पाव बुडवावा तसा त्या सुपात पाव बुडवून भारत–हंगेरीत अधिक जिव्हाळ्याचे संबंध जोडले. मला पाव ही गोष्ट कशाततरी बुडवल्याशिवाय खाताच येत नाही. आणि समोर असा रस्सा दिसत असताना उगीच त्याला लोण्याने मऊ करायचा ताप कोणी सांगितलाय! एकतर मला सुरीने पावाच्या स्लाइसवर लोणी गिलावा केल्यासारखे पसरता येत नाही. आमच्या पावावर नेहमी लोण्याच्या गठळ्या चिकटतात. त्यापेक्षा समोरच्या चहाच्या कपात पाव बुडवणे बरे! मला फ्रेंच लोक आवडतात ते चहा-कॉफीत पाव बुडवून खातात म्हणून! मी सुपात पाव बुडविण्यात आणि माझी पत्नी त्या सॅलडमधली काकडी व्हिनीगरमधे किती महिने मुरवली असेल बरे, ह्या विचारात दंग असताना फिडलवाल्यांचा हल्ला आमच्या दिशेला आला. आणि त्यांनी आमच्या भोजनातली लय बिघडवली. (होय! भोजनालाही भजनासारखी लय असते. वरणावर तूप यायला अर्धे मिनिट अधिक उशीर झाला की पहिल्या जय जय रामकृष्ण हारीचा ताल चुकल्यासारखा सगळ्या जेवणाचा ताल चुकतो!)

फिडलवाला तसा कसबी होता. पण वाद्य वाजवणे ही एक कानात तेल ओतल्यासारखी कानात सूर ओतायची कला आहे अशी हंगेरीतल्या हाटेलगंधर्वांची समजूत असावी. विशेषतः हाटेलात येणाऱ्या स्त्रिया बहिऱ्या असतात असे त्यांच्या उस्तादांनी त्यांना सांगितले असावे. त्याने त्या फिडलची एक बाजू स्वतःच्या हनुवटीखाली गच्च दाबून धरली आणि दुसऱ्या बाजूचे टोक चक्क माझ्या पत्नीच्या कानाच्या पाळीला लावले! मग मात्र त्या खाणावळीतून कधी एकदा बाहेर पडतो असे आम्हाला झाले. उद्या जर एखादा सनईवाला एखाद्या श्रीजगदंबा मटण प्लेट हाऊसमध्ये आपले कान फुंकायला लागला तर बोकडाची हड्डी चोखण्याऐवजी त्या पिपाणीवाल्याची हड्डी नरम करावी असे वाटल्याशिवाय कसे राहील? फिडलवाल्याचे वाजवणे तसे वाईट नव्हते. प्रेमगीत असावे. कारण वाजवताना त्याचे डोळे अखेरची घटका मोजणाऱ्या

माणसाच्या डोळ्यासारखे होत. पण ती भावना कानांत कशाला घुसवायला हवी? खरे म्हणजे ती खाणावळही जरा अशीतशीच होती. अशा वेळी हा हळुवा परतवण्याचा एकच उपाय म्हणजे वाजवणाऱ्याला बक्षिसी देऊन वाटेला लावणे. पण समाजवादी हंगेरीत मी असली टिप-बिप् द्यायला गेलो आणि माझ्या भांडवलशाहीवृत्तीचे प्रदर्शन घडले तर काय घ्या? म्हणून खिशात गेलेल्या हाताने फक्त हातरुमाल बाहेर काढून त्या तसल्या थंडीत कपाळावर आलेला घाम पुसला.

रात्रीचे साडेआठ वाजून गेले होते. तेवढ्यात पुन्हा पाऊस पडून गेला होता. रस्ता निर्जन होता. आम्ही रस्त्याच्या खाणाखुणा आठवीत आठवीत आमच्या रॉदना उत्सावर येऊन पोहोचलो आणि त्या अनोळखी देशात पुढल्या तीन-चार आठवड्यांत सारे काही यथासांग होवो म्हणजे झाले म्हणत त्या थंडगार फ्लॅटमधल्या जवळ जवळ बर्फाच्या लादी-सारख्या झालेल्या बिछान्यावर आडवे झालो!

हंगेरीला येण्यापूर्वी मी नकाशा नीट पाहून घेतला होता. त्यात हा भला मोठा बालाटोन जलाशय ठळकपणाने नजरेत भरला होता. 'बूडा-पेष्टच्या नैर्ऋत्येस नव्वद मैलांच्या अंतरावर सुमारे पावणेचारशे चौरस मैलांचे *बालाटोन नावाचे सरोवर आहे–*' हे प्रत्येक *हंगेरीय बालकाला* घोकावे लागत असणारच. प्रत्येक देशाची अशी ही अभिमानाची स्थानं असतात. देशाला कां? साध्या गावालासुद्धा. एवढ्याशा भिलवडीलासुद्धा कृष्णाबाईवरच्या आपल्या घाटाचा कोण अभिमान आहे! बालाटोन हे हंगेरीयांच्या अभिमानाचे स्थान! जलाशय ही गोष्टच मुळात सुंदर! उंच डोंगर आपल्याला आपल्या खुजेपणाचे स्मरण करून देतात. जलाशय स्नेहशील असतात. त्यांच्या अंगावर खेळावे. (जमलं तर!) तीर्थाला जाण्याची ओढ काही हिंदूंनाच नाही. साऱ्या जगाला आहे. युरोपने हे सारे जलाशय यक्षगंधर्वांच्या जलक्रीडेची स्थानं केली आहेत. आपण स्वर्गातल्या जागा राखल्या जाव्या म्हणून चार बुचकळ्या मारतो. बालाटोन सरोवराच्या ओढीने तर साऱ्या युरोप अमेरिकेतून प्रवाशांचे जथेच्या जथे येतात. ठरल्याप्रमाणे सकाळी आठाला ॲण्ड्रयू दारात

हजर. मोटारीत आणखी तीन भारतीय मंडळी होती. शांता नावाची एक केरळीय प्राध्यापिका. ओरिसातले एक तरुण प्राध्यापक मिश्राजी. आणि सीतारामन् म्हणून त्रिवेंद्रमचे एक प्राध्यापक. मंडळी आमच्याचसारखी, गप्पागोष्टीवाली निघाली. तिघेही विज्ञानाचे अध्यापक होते, पण गाणे, वाजवणे, साहित्य, संगीत ह्याच्याशी संबंध बिघडवलेले नव्हते. सीतारामन् तर कर्नाटकी संगीतातला चांगला जाणकार होता.

जवळ जवळ शंभर मैलांची ती वाट हां हां म्हणता संपली. आणि आमची मोटार एका टुमदार गावात शिरली. गलिवर्स ट्रॅव्हल्समधल्या लिलिपुटवाल्यांच्या बंगल्यासारख्या छोट्या छोट्या बंगल्या होत्या. बालाटोन सरोवराच्या परिसरात 'असावे घरकुल अपुले छान' हे एक हंगेरीय माणसाचे स्वप्न असते. अशी काही स्वप्नं आकारली होती. काही आकारत होती. ट्रॅफिक लाइटपाशी गाडी थांबली. जवळच चिमुकल्या घराचे बांधकाम चाललं होतं. एक गृहस्थ, गृहिणी, त्यांची दोन शाळकरी मुले मिळून स्वतःची बंगली स्वतः उभी करीत होती. मालक एका फळकुटावर उभा राहून विटेवर वीट चढवीत होता. मालकीणबाई हातात नकाशा घेऊन त्यांना काहीतरी ऐकवीत होत्या. त्यांच्या एकूण आविर्भावावरून, 'ऐकलं का – अहो ती वीट दिवाणखान्याची नाही काही – सैपाकघराची आहे' यासारखे गृहिणीसुलभ बौद्धिक घेतले जात असावे असा आपला माझा तर्क! 'सुटीच्या दिवशी पुष्कळ लोक स्वतः येऊन आपली घरं बांधतात....' ॲण्ड्रयूने मी त्या दिशेने पाहाण्यात रंगलेला आहे हे पाहून सांगितले. माझ्या डोक्यात यजमानाचा दिवसभर ते बांधकाम आणि कुटुंबाच्या अव्याहत सूचना ह्यामुळे हैराण झाल्यानंतर – 'झक् मारली नि ह्या बालाटोनच्या बंगल्याचं काढलं! आता पुढल्या रविवारी तुम्हीच या आणि काय विटा रचायच्या त्या रचा!' – हा संवाद रचून तयार झाला होता.

उंच वृक्षांनी सावली धरलेल्या रस्त्यातून आम्ही बालाटोन तलावापाशी आलो. ॲण्ड्रयू म्हणाला, 'प्रथम आपण इथे जवळच एक तिहॉनी म्हणून गाव आहे तिथले चर्च पाहू.' का कोण जाणे त्या तिहॉनीच्या चिमुकल्या

गल्लयांतून जाताना अंधेरीजवळच्या वेसाव्याची आठवण आली. वेसाव्याचं वरसोवा होण्यापूर्वी ते एक मासे धरणाऱ्या कोळ्यांचं गाव होतं ! होड्यांतून त्या काळी मासे येत — स्मगलिंग-पूजा सुरू झाली नव्हती ! हे तिहॉनी गाव त्या मैलोन् मैल पसरलेल्या बालाटोन तलावात पाचर मारल्यासारखे घुसले होते. तलाव कसला ? उपसागरच तो ! आणि खेड्याच्या उशाशीच डोंगरमाळ असल्यामुळे त्या तिहॉनीला कोकणी खेड्याचे रुपडे लाभले होते. डोंगरमाथ्यावर ते अकराव्या शतकातले बेनेडिक्टाइन् पंथाचे चिमुकले चर्च आणि जोगी लोकांचा मठ आहे. चर्चभोवती तटबंदी आहे. एके काळी तुर्कांच्या स्वाऱ्या व्हायच्या. नाना राजवंशीयांची युद्धे व्हायची. त्यांना तोंड देतदेत एखाद्या महापुरात वाचलेल्या लव्हाळ्यासारखे ते चर्च नम्रपणाने उभे होते. खिस्तपुराण ऐकायला फार तर चाळीस-पन्नास माणसं बसतील एवढेच आहे, पण डोंगरात असल्यामुळे एखाद्या नाटकाच्या चतुर नेपथ्यकाराने निरनिराळ्या उंचसखल पातळ्यांचा चतुर उपयोग करून घ्यावा तशी ह्या चर्चची उभारणी आहे. डोंगरमाथ्यावरून एका बाजूने त्या विशाल जलाशयाचे दर्शन, तर दुसऱ्या बाजूने सपाट भूमीवरची हिरवीगार शेते ! सध्या हे चिमुकले चर्च एक सुंदर प्राचीन वास्तू म्हणूनच कसोशीने सांभाळले आहे. जुन्या मठात आता एक बालाटोन तलावावर शतकानुशतके सफरी करणाऱ्या जहाजांच्या नमुन्यांचे प्रदर्शन मांडले आहे. शीड होड्यापासून वाफेवर चालणाऱ्या जहाजांपर्यंत तऱ्हेतऱ्हेची जहाजे. जुन्या कप्तानांचे पोषाख. त्याबरोबर कळसूत्री बाहुल्यांचेही प्रदर्शन आहे. लॅटिन भाषेतल्या जुन्या पोथ्यांचा संग्रह आहे. एकेकाळी रोमन साम्राज्य इथपर्यंत पसरले होते, त्याचे अवशेष आहेत. इतकेच नव्हे तर तत्कालीन शिल्पकलेपासून ते अत्याधुनिक शिल्पकलेचे टप्पे जाताजाता दाखवणारे नमुनेही आहेत !

हे सारे पाही पाहीपर्यंत अकरा वाजत आले. आणि आम्ही बालाटोन सरोवराच्या काठाशी आलो. प्रवासी-हंगाम संपल्यामुळे वातावरण जत्रा ओसरल्यानंतरच्या आठवड्यात असते तसे होते. अॅण्ड्र्यू म्हणत होता,

'पंधरा दिवसांपूर्वी आला असतात तर इथून चालणे अवघड झाले असते. हजारो हजारो स्त्री-पुरुष ह्या तलावात पोहायला पडलेले असतात. जहाजांच्या शर्यती चालतात. ह्या वाळूच्या किनाऱ्यावर सूर्यस्नाने चालतात!' आम्ही हा सारा नयनोत्सव संपल्यावर आलो होतो.

त्या बालाटोनच्या परिसरात आल्यापासून प्राध्यापिका सौ. शांतम्मांचे 'इथे कुठे तरी टागोरांचा पुतळा आहे' हे पालुपद चालू होते. अँण्ड्रयू यापूर्वी बालाटोनच्या तलावात अनेकदा डुंबून आला होता, पण त्याला तो पुतळा नक्की कुठे आहे ठाऊक नव्हते! आम्ही एका उपवनात पाय मोकळे करायला निघालो. आणि गर्द पानांची छत्री धरलेल्या एका सडसडीत वृक्षाखाली मला रवीन्द्रनाथांचा तो अर्धपुतळा दिसला. दिल्लीच्या रवीन्द्रभवनाच्या प्रवेश कक्षात असलेला पुतळा ह्याच पुतळ्याची प्रतिकृती आहे. बालाटोन सरोवराकाठी आमच्या राष्ट्रकवीचा पुतळा आहे ही गोष्ट अभिमानास्पदच. पण पंख वर करून कावळ्याने चोच खुपसून बसावे, असल्या पोझमधला हा पुतळा अत्र्यांच्या शब्दात सांगायचे झाले तर महाभिकार आहे. हा 'एक्सप्रेशनिस्ट बस्ट' आहे म्हणतात. असो बिचारा.

एकोणीसशे वीस साली रवीन्द्रनाथ बालाटोन तलावाजवळच एक गरम पाण्याचा झरा आहे तिथे औषधोपचारासाठी आले होते. एकोणीसशे सव्वीस साली पुन्हा आले आणि आठ नोव्हेंबर एकोणीसशे सव्वीस ह्या दिवशी आपली प्रकृती सुधारल्याच्या कृतज्ञतेपोटी, त्यांनी तिथे लिंडन वृक्षाचे रोप लावले. त्या पुतळ्यापाशी एका दगडावर टागोरांची एक कविता इंग्रजी आणि हंगेरियन भाषेत कोरली आहे. त्या वृक्षारोपणाच्या वेळी टागोरांनी त्या वृक्षालाच उद्देशून म्हटले आहे —

मी नसेन तेव्हा ह्या पृथ्वीवर —
पण माझ्या तरुवरा—
तुझी नित्यनूतन वसंतपालवी—
कुजबुजू दे इथे पोहोचणाऱ्या
वाटसरूच्या कानी

की जगताना हा कवी प्रेमच करीत जगला !

आठ नोव्हेंबर एकोणीसशे सत्तावीस हा माझा सातवा वाढदिवस. गुरुदेवांनी हंगेरीत बालाटोनच्या काठी असे वृक्षारोपण करून साजरा केला असेल अशी मला कल्पना नव्हती. भारतात मात्र माझा तो वाढदिवस मुन्सिपाल्टीच्या प्राथमिक शाळेतल्या दामले मास्तर नामक शिशुपाला-कडून एखाद्या चुकलेल्या गणिताबद्दल चिंच नामक वृक्षाच्या फोकापासून केलेली छडी खाण्यात गेला असणार !

ते सरोवर सुंदर होते. वनेउपवने छान होती. पण ढगाळ हवेमुळे '*आहे मनोहर परी गमते उदास*' अशा वातावरणात जीव रमेना. म्हणून मग भोजनाचा विषय काढला. सगळ्यांना तेच म्हणायचे होते. पण अरसिकतेच्या आळाला मंडळी भीत होती.

बूडापेष्टहून येताना अँण्ड्र्यूने वाटेत गवती छपरांची एकदोन घरे दाखविली होती. त्यांना 'च्यार्दा' म्हणतात. च्यार्दा ही खास हंगेरीय खाणावळ. पण खाणावळ म्हटल्यावर जो एक सनातन कळकटपणा आपल्या मनश्चक्षूंपुढे उभा राहतो तो प्रकार इथे नाही हे आम्हाला तिथल्या एका च्यार्दाश्रमात शिरल्याक्षणी ध्यानात आले. भिंतीवर हंगेरीय कोष्टीदादांनी आणि कोष्टीवैन्यांनी केलेल्या कलाकुसरीचे पट होते. आपल्याकडे ही सजावट कोल्हिटकांनी होते. युरोपातल्या प्रत्येक देशात वाटेच्या वाटसरांसाठी टॅव्हर्न्स्, इन्स वगैरे खाणावळी आहेत. त्यांचे जुने रूप टिकवून ठेवतात. वाजंत्रीमंडळी जुन्या लोकगीतांच्या सुरावटी वाजवीत असतात. जुन्याच सुरयांतून जुने मद्य येते. मग भोजनभाऊ आणि भगिनींनाही कंठ फुटतो. इथे मात्र गाणे खाण्यात मिळून जाते. सगळ्यांना ही गाणी येत असतात. आम्ही एक भले लांबोडके टेबल पाहून बाकडी धरली. इथे औपचारिकतेला जागा नाही. स्त्रीपुरुष त्या बँडच्या साथीत शेजाऱ्याच्या कोपरात कोपर घालून गात असतात. आपल्या पंक्तीत स्त्रीपुरुष एकत्र जेवायला बसत नाहीत. समोर बायकांची पंगत असलीच तर त्या बायका मेंढ्या चरल्यासारख्या खालच्या मानेने जेवणार ! फारतर एखादा पंगतगंधर्व '*सदा सर्वदा योग तुझा*

घडावा—' यासारखा विसंवादी श्लोक म्हणणार. ऐकणारे हात कोरडा होत चालला म्हणून वैतागलेले. समोरच्या जिलबीकडे पाहात जयजय रघुवीर समर्थांची घोषणा देण्याची वाट पाहात बसलेले! ह्या च्यार्दातले गुष्याशसूप मात्र लाजवाब होते. वाढपिणी तर करवल्यांसारख्या मिरवीत होत्या. असले भोजन गायनाच्या मैफिलीसारखे स्मरणात राहते. शेवटी— 'सर्वांना उत्तम भूक लागो आणि ती भूक भागवणारे असले भोजन जगातल्या सर्वांना लाभो' हे पसायदान मागून आम्ही तिथून निघालो.

आता परतीची वाट. एका उंच टेकाडावरून वळताना त्या बालाटोन सरोवराचे शेवटचे दर्शन घ्यावे म्हणून पाहिले. त्या विशाल सरोवरात एकच छोटीशी शीड होडी चालली होती. तसल्या ढगाळ हवेला संस्कृतात दुर्दिन म्हणतात; असल्या दुर्दिनी आपली होडी घेऊन चाललेल्या त्या षौकीन नावाड्याचे मला कौतुक वाटले. विपन्नावस्थेत पडलेल्या एकेकाळच्या धनिकाचा सच्चा स्नेही त्याला शेवटपर्यंत चिकटून राहावा तसा तो अज्ञात नावाडी वसंतग्रीष्मातली सारी श्रीमंती ओसरलेल्या बालाटोन तलावाशी त्याच्या ह्या असल्या उपेक्षेच्या काळातही दोस्ती टिकवून होता!

टागोरांची एक कविता आहे. 'आज शरतेर आलोय एई जे चेये देखि – मोने हॉय् ए जॅनो आमार प्रथम देखा –' 'आज शारदीय प्रकाशात जे मी निरखून पाहतोय ते पाहाताना मनाला वाटतं जणू हे सारं माझं पहिलंच पाहणं –' परदेशात हिंडताना हे पहिल्या पाहण्याचं माझं औत्सुक्य कधीही ओसरत नाही. रस्त्याकाठची झाडे मी आमच्या देशात कधी थांबून पाहात नाही. तिथे मात्र फूटपाथावर पडलेलं पान देखील मी निरखून पाहिलं आहे. दोन दिवसांच्या पावसाच्या भुरभुरीनंतर ऊन पडले होते. हंगेरीय सरकारच्या सांस्कृतिक विभागातली कुमारी व्हेरा गाटे म्हणाली होती – "मिस्टर देशपांडे, आता चांगले पाचसहा महिने सूर्यदर्शन नाही....." मी म्हणालो होतो – 'बाई शुभ बोल!' कोणे एके काळी पार्ल्याच्या टिळक मंदिरात ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं करीत घातलेल्या नमस्काराचं स्मरण ठेवून माझ्यासाठी सूर्यनारायणाने रजा कॅन्सल करून

पुन्हा कामावर यायचं ठरवलेलं पाहून मी उभ्याउभ्या त्याला नमस्कार घातला. इथे आल्यापासून सकाळी दूध आणण्याची कामगिरी मी हौसेने अंगावर घेतली होती. आमच्या घरासमोरच्या एका बंगल्याच्या गॅरेजवजा जागेत एक, पाव लोणी दूध चीज अशा वस्तू विकायचे दुकान होते. दुकानदारीणबाई चांगल्या सत्तरीच्या घरातल्या. पण फावल्या वेळात दुकानातले बरेचसे लोणी चीज वगैरे स्वतःच खात असाव्यात. हंगेरीत अशी छोटी छोटी खाजगी दुकाने आहेत. हंगेरीय सरकारला लोकांच्या सोयी पाहायची सवय दिसते. चिमुकल्या इंग्लिश हंगेरियन् शब्दकोशातून मिल्क म्हणजे तेय्, ब्रेड म्हणजे केन्येर, चीज म्हणजे शायूट – हे सारे रोमन अक्षरात लिहून घ्यायचे. हंगेरीय भाषेत रोमन मुळाक्षरांचे उच्चार इंग्रजीसारखे होत नाहीत. जे चा उच्चार य होतो. मी पहिल्या दिवशी 'टी ई जे' ही अक्षरे वाचून तेज मागितले. दुधाला हंगेरीय भाषेत साक्षात् तेज म्हणतात हे ऐकून आपल्या गोब्राह्मणांना केव्हढा अभिमान वाटेल वगैरे कल्पनाही मनात येऊन गेल्या. पण माझे ते 'तेज' फिके पडले. दुकानात दुधाच्या बाटल्याही दिसेनात. दुकानात आलेल्या इतर बायाही ह्या परदेशी पाव्हण्याला काय बरं हवं असेल ह्या चिंतेत. मी दूध नाही तर चहा नाही म्हणून हैराण! पूर्वानुभवामुळे चित्र काढून गाय दाखवण्याचा विचार सोडून दिला होता. मग मी चिठी दाखवली! दुकानात 'तेय्' अशी चारपाच स्त्री स्वरातली गर्जना झाली आणि समोरच्याच हाऱ्यातून एका हंगेरीय माऊलीने दुधाने भरलेला कागदी पुडा माझ्या हाती दिला. मग त्या सगळ्या बाया 'परक्या देशात येताना त्या त्या देशाची भाषा शिकून यावं दादा—आता साध्या दुदाला काय म्हणतात त्ये उमगना तुमास्नी.... ह्या बुडापेष्टात कसं व्हायचं दादा तुमचं—' अशा अर्थाचे काही तरी बोलल्या! साध्या दुधाला काय म्हणतात ते ठाऊक नसणाऱ्या बाबाला आपली इतकी हंगेरीय भाषेतली चिंतादर्शक वाक्ये कशी कळणार हा विचार त्यांच्यापैकी एकीलाही सुचत नव्हता. अशा वेळी मी उत्तरादाखल चक्क मराठीत बोलतो. मी पॅरिसच्या हॉटेलात एका वेट्रेसला 'शांताबाई' अशी हाक मारून

टेबलाशी आणलं आहे. आवाज करून लक्ष वेधण्याशी कारण! मी तर आमच्या त्या दूध-पाव-लोणी आणि मंडळीतल्या काकूशी सकाळी दुकानात शिरलो की 'कसं काय काकू? रामराम – झोपबीप ठीक झाली?' असं विचारीत असे. म्हातारी लय् मायेची होती. शेवटल्या दिवशी माझ्या पत्नीने तिला एक छोटीशी कीचेन् भेट म्हणून दिली तशी म्हातारी म्हणाली मला साडी नेसव. (अर्थात् अभिनय करून) आता ती आडदांड हंगेरीय भीमामावशी पाचवारीत कशी बसणार? पण आमच्या बायकोने धरून साडी नेऊन तिला एकदा गुंडाळली. माझे रामराम झाले की काकू आपले हंगेरीय टयांगटुंग करायची – की मी न्याहरीच्या वस्तूंचा कागद सरकावला पुढे!

तसा मी प्रभातफेरीवाला नव्हे. पण माथेरान–महाबळेश्वरासारख्या त्या परिसरात हिंडायला मला आवडायचे. फक्त सूर्यनारायण ड्यूटीवर असायचे त्या दिवशी. अशीच एकदा उतरण काढून खाली आलो. तिथं व्यायामशाळेची एक सुरेख इमारत होती. इमारतीच्या दारातच दोन्ही बाजूला बांधेसूद शरीराच्या तरुणतरुणींचे दोन संपूर्ण नागवे पुतळे होते. ग्रीकबीक पद्धतीतले नव्हे. अगदी वास्तव शैलीतले! पायऱ्या चढून तरुणतरुणींचे घोळके व्यायामशाळेत जात होते. ते पुतळे पाहून कोणीच तिथे थबकत नव्हते. माझ्या मनात सहज विचार आला की आत जावे. तिथले कोणी महाबळ गुरुजी असतील त्यांना विचारावे की, 'का हो? हे असले अश्लील पुतळे तुम्ही ह्या तालीमखान्याच्या दारात जेव्हा प्रथम उभे केलेत त्या वेळी निषेधाच्या सभेत बोलायला येतो – फक्त येण्याजाण्याचा खर्च आणि शाकाहारी भोजन द्यावे – अशा आशयाची अभिव्यक्ती करणारी एखादी तार तुम्हाला पुण्याहून आली होती का हो? –' तरुण मुले आणि मुली यांची एकत्र व्यायामशाळा? 'ब्रह्मचर्य हेच जीवन आणि वीर्यनाश हाच मृत्यू' ह्या महान् ग्रंथाचे हंगेरीय भाषेत भाषांतर झाले नसावे. बनियन् आणि चिमूटभर चड्डी घालून त्या बाहेरच्या पुतळ्यांशी शरीरसौष्ठवात स्पर्धा करणारे युवक आणि युवती! पलीकडल्या टेनिसकोर्टावर शाळकरी वयाच्या पोरींना

टेनिसचे धडे चालले होते. सूर्यप्रकाशात त्या हिरण्यकेशींचा तो खेळ बाहुल्यांच्या नाचासारखा वाटत होता. त्या व्यायामशाळेपाशी, बाल्य, कौमार्य आणि तारुण्य कसे कारंजासारखे थुयथुयत होते. आमच्या घराकडे जाताना त्या व्यायामशाळेवरूनच जावे लागे. सदैव ती व्यायामशाळा गजबजलेली असायची. तरुणतरुणी एकतर मैदानात नाही तर पोहण्याच्या तलावात! ॲण्ड्रू सांगत होता की बुडापेष्ठमध्ये असल्या डझनावारी व्यायामशाळा आणि पोहोण्याचे तलाव आहेत. मला कुणाच्याही वैयक्तिक श्रीमंतीचा कधीही हेवा वाटला नाही. पण असल्या सार्वजनिक श्रीमंतीचा मात्र वाटतो. इथे आपल्या दैन्याची दया येते. आमची पोरे सायकलवाल्यांच्या आणि मोटारवाल्यांच्या शिव्या खात गल्ली-बोळात दगडांच्या विकेट्स् आणि फळकुटांच्या ब्याटी घेऊन कापडी चेंडूचा क्रिकेट खेळतात. रहदारी मंदावल्यावर त्यांना रात्री दहानंतर आळ्यापाळ्या आणि खोखोला रस्ते मोकळे मिळतात! मुंबईत तर क्रीडांगणाशिवायच व्यायामाचा तास असतो. कसली नतद्रष्ट माणसं आम्ही! आमच्या देशातली लाखो पोरे बाल्य भोगत नाहीत – निरोगी तारुण्य नाही – भोगतात फक्त वार्धक्य!

आणि इथे वार्धक्यदेखील मजेत स्वीकारणारा एक म्हातारा मला भेटला! आमच्या घराजवळून डोंगरमाथ्याच्या दिशेला ट्राम जायची. ट्रामच्या रुळांच्या दोन्ही बाजूला फुलांचे ताटवे. ताटव्यांचा पट्टा झाला की वृक्षांची रांग! त्या ताटव्यात गुलाब देखील होते. मी तिथून जाताना सहज गुलाबाचा वास घेतला. मंद वास होता. मला वाकून वास घेताना पाहून समोरच्या बाकड्यावर बसलेला म्हातारा आपल्या पांढऱ्याधोप मिशीतल्या मिशीत हसला. मग त्याने हंगेरीय भाषेत मला काहीतरी विचारले. माझी गोंधळलेली मुद्रा पाहून मला त्याची भाषा येत नाही हे त्याने ओळखले. मी म्हटले – "इंग्लिश ?"

'लितूल' तो म्हणाला. मनात म्हटलं चला, लितूल तर लितूल. मग एकेका इंग्रजी शब्दांची लंगडी घालीत आमचे संभाषण सुरू झाले.

"इंदिया ?"

"यस्— व्यूटिफुल रोझेस–" ताटव्याकडे बोट दाखवून मी म्हणालो.

"इंदिया रोझेस नो ?"

"इंदिया रोझेस् यस् !" माझ्या इंग्रजीच्या स्वर्गस्थ गुरुजींचा आत्मा तडफडायला लागला असावा.

म्हातारबुवांना माझ्याशी खूप काहीतरी बोलायची इच्छा असावी. पण आठ-दहा इंग्रजी शब्दांपलीकडे त्यांची धाव जात नव्हती. मग हताश होऊन त्यांनी हवेत हात उडवले. आणि माझा हात हातात धरून म्हणाले, 'कोम्' – त्याना मला काहीतरी दाखवायचं होतं. मी त्यांच्या बरोबर निघालो. फर्लांगाचे अंतर चालून गेलो. तिथे मात्र रंगीत पट्टे ओढल्यासारखे ताटवे होते. नाना रंग ! मला हंगेरीय येत नाही हे विसरून म्हातारो त्या फुलांबद्दल आणि कोण जाणे कशा कशाबद्दल हंगेरीय भाषेतून बोलत होता. आपल्याच नादात एखाद्याने गात सुटावे तसे तो बोलत सुटला होता. मी देखील त्याची ओळन् ओळ मला कळल्याचे दाखवीत होतो. एखादा ताटवा भरघोस दिसला की माझा हात घट्ट हातात धरून काय काय सांगायचा ! मुलांत मूल होणारी मोठी माणसं मी पाहिली आहेत – पण फुलांत फूल झालेला हा माझ्या पाहण्यातला पहिला माणूस ! इकडे ये इकडे ये करीत मला पुढे पुढे घेऊन जाई. रोज सकाळी तिथे आल्यावर तो प्रत्येक ताटव्याची चौकशी करीत असला पाहिजे. काही ताटवे कोमेजले होते. मग त्याच्याही चेहऱ्यावर – 'विचारी ! काल कशी हसत होती हो' असा भाव दाटायचा ! मला त्याला सारखं सांगावसं वाटत होतं की आजोबा, आमच्याही देशात तुमच्याचसारखा एक फूलवेडा होता. त्याने एका कवितेत लिहिलंय् की 'उद्या मला फार पहाटे बागेत जायचं आहे– उद्या माझ्या त्या रोपाला पहिलं फूल फुटणार आहे !' नातवाच्या जन्माच्या वेळचं त्यांहा पहिल्यांदा आपल्या कानी पडावं म्हणून बाळंतिणीच्या खोलीच्या दारात येरझारा घालणाऱ्या आजोबासारखा तो फुलांचा आजोबा होता ! तुम्ही दुसरे ! तुम्हीही कविता लिहिता का हो ? – पण

कुठलं काय नि कुठलं काय ? साऱ्या जगाची भाषा एक होईल तर काय मजा येईल – पण नको. हे म्हणजे सारी फुलं एका रंगाची आणि एका वासाची होण्यासारखं आहे. त्या फुलांना तरी भाषा कुठे होती ? पण ती काय कमी बोलत होती ? म्हातारा त्या तंद्रीतच माझ्याकडे वळला आणि म्हणाला, "गुड ?"

मी म्हणालो, "गुड !"

कसल्याशा आनंदाने भरल्यासारखा, माझा टोपी उंचावून आणि हंगेरीय भाषेत निरोप घेऊन ते वृद्ध पण टवटवीत फूल झाडांच्या पट्ट्या-मागे दृष्टिआड झाले. मला त्याला 'थँक्यू – थँक्यू व्हेरी मच' म्हणायचं होतं पण हंगेरीय भाषेत थँक्यूला 'क्योसोन्योम्' म्हणतात, हे मी त्या वेळी नेमके विसरलो होतो !

व्हिएन्नाच्या सेमिनारमध्ये डॉक्टर इव्हान् विटयानी नावाच्या बुडा-पेष्टमधल्या इन्स्टिट्यूट ऑफ कल्चरमधल्या डायरेक्टरचे नाव पुन्हा पुन्हा आणि अतिशय कौतुकाने उच्चारले जात होते. मी त्या विट्यानींना भेटायचं ठरवलं. भेटीची वेळ ठरली. एके दिवशी दुपारी एक वाजता एका प्रासादतुल्य इमारतीपुढे आमची टॅक्सी थांबली. एकेकाळी हा कुठल्यातरी बड्या उमरावाचा वाडा असावा. दारातून हत्ती जाईल असे प्रवेशद्वार ! ते संगमरवरी जिने, भिंतीवर सुंदर चित्रं. कोपऱ्याकोपऱ्यात *शिल्पाकृती. एका लांबलचक व्हरांड्यातून वाट काढता काढता* विटयानींच्या कार्यालयापुढे आलो. ॲण्ड्रूने दारावर टकटक केली. एका मध्यम वयाच्या स्त्रीने दार उघडले. आमचे स्वागत केले. आणि विटयानींच्या खोलीत नेले. काही माणसांच्या चेहऱ्यावरच हुषारी आणि सौजन्य स्वच्छ लिहिलेले असते. विटयानींच्या पहिल्या भेटीतच ह्या माणसाला भेटायचा योग यायलाच हवा होता असे वाटले. सडपातळ बांधा, विलक्षण तरतरीत डोळे, हंगेरीय पीचसारखाच तांबूस आणि पिवळ्या रंगाच्या छटा असलेला वर्ण – असल्या वर्णाला कुठल्याही रंगाचा पोषाख साजूनच दिसतो. गळ्यापर्यंत येणारा निळ्या काळ्या रंगाचा पातळसा स्वेटर आणि तसल्याच रंगाची विजार. त्या पूर्ण

बाह्यांच्या स्वेटरमधून त्यांचा कोवळ्या केळफुलासारखा निमुळता हात काय सुरेख दिसत होता. वयाचा अंदाज करणं अशक्य होतं! विटयानींना इंग्रजी बोलता येत होते. माझा जीव भांड्यात पडला. दुभाष्याकरवी बोलताना जीव मेटाकुटीला येतो.

कलेच्या क्षेत्रातल्या कुणाही माणसाला हेवा वाटावा अशा संस्थेचे इव्हान विटयानी हे डायरेक्टर होते. त्या एका इमारतीत चित्र, शिल्प, संगीत, नाट्य, कळसूत्री बाहुल्यांचे खेळ, ह्या साऱ्या कलांची हौशी तरुण-तरुणींना साधना करायची सोय होती.

"तारुण्याची वयोमर्यादा काय ठेवली आहे तुम्ही?"

"आमच्या संस्थेत सोळा वर्षांपासून साठ वर्षांपर्यंतचे तरुण आणि तरुणी आहेत!" अवघ्या एक कोटी लोकसंख्येच्या हंगेरीत एक लक्ष विद्यार्थी पद्धतशीर रीतीने संगीत शिकतात हे ऐकून मी आडवा झालो! आणि पुढले तर मी ऐकूच शकलो नाही. त्यांच्या शिक्षणाचा खर्च हंगेरीय सरकार करते! शिवाय चित्रकला, शिल्पकला, नाट्यकला, असंख्य हस्तव्यवसाय.... म्हणजे मला वाटते हंगेरीतली निम्मी लोकसंख्या कुठल्या ना कुठल्या तरी कलेच्या आराधनेत दंग आहे. ह्या एवढ्याशा देशात हल्लीच्या तरुणांना प्रिय असणाऱ्या 'पॉप्' संगीताचे दोन हजार हौशी ताफे आहेत! मला प्रश्न पडला की त्या नव्या पॉप् किंवा बीट्ल्सच्या धांगडधिंगा संगीताचे अभिजात संगीताच्या अभिमान्यांनी कसे काय स्वागत केले?

"सुरुवातीला नाके मुरडली! पण लगेच त्यांच्यातल्या तज्ज्ञांनी त्या संगीतात तरुणांना इतका रस कां वाटतो ह्याचा अभ्यास सुरू केला. समाजशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ मदतीला घेतले. एकोणीसशे पासष्ट सालच्या सुमाराला आमच्याकडे ही लाट आली. सुरुवातीला अमेरिकन किंवा इंग्लिश गाण्यांचा प्रभाव होता. हळूहळू आमच्या तरुणांनी हंगेरियन लोकसंगीतातून गीते निवडली. आता त्यांनी स्वतःच्या संगीत रचना करायला सुरुवात केली आहे!"

हंगेरी हा कम्युनिस्ट देश असल्यामुळे मला वाटत होतं की ह्या

तरुणांची गाणी ' शेतकऱ्यांनो-कामकऱ्यांनो – उठा उठा – चलाचला ' छाप असणार. ह्या गीतांचे विषय काय ? हा प्रश्न विचारावा की विचारू नये ते ठरत नव्हते. पण विटचानींचे देखणेपण अंतर्बाह्य होते त्यामुळे संकोचाचे कारण नव्हते. मी विचारले, " हे तरुण कसली गीते लिहितात ? "

" कसली म्हणजे ? "

" म्हणजे विषय काय ? "

" तरुणतरुणींच्या गाण्याचा विषय काय असणार ? प्रेम ! "

" काही सामाजिक जाणिवा ? "

" मिस्तर देशपांडे, आमच्या संशोधनात आम्हाला आढळून आलेय की तारुण्यात ' प्रेम ' ह्या विषयाखेरीज गाण्यात दुसऱ्या विषयाला जागा नाही ! त्यांच्या त्या आनंदाच्या, उत्साहाच्या जगात सामाजिक–राजकीय प्रश्न, श्रम, उत्पादन, प्रेमाखेरीज माणसामाणसातले इतर अनुबंध, इतकेच काय पण माणूस आणि निसर्ग ह्यांच्यातलं काही सखोल नातं – ह्या कशालाही वाव नाही. "

" म्हणजे बाहेरच्या वास्तवाशी संबंध नाही ! "

" त्यांच्या बीट संगीताच्या मैफिलीत नाही ! "

" पण मग ज्यावेळी एखादी प्रचंड राजकीय उलथापालथ होत असते — किंवा तुमच्या देशात झाली अशा वेळी — "

" अशा वेळी ही बीट ढंगाच्या गाण्याची साथ थोडा वेळ ओसरते ! "

संगीतप्रिय तरुणांना सामाजिक जाणीव नाही असे नाही. पण त्यांच्या बीट संगीताच्या दुनियेत ते नाही त्या भानगडी आणीत नाहीत. अशी निरोगी मुक्तता असते म्हणूनच बीट संगीताच्या अड्ड्यांना गांजेकसांच्या आणि अफीमचींच्या अड्ड्यांचे ओंगळ स्वरूप येत नाही. एकाच प्रयोजनात आणि आविष्कारात कलेला कोंबण्याचा अट्टाहास इथे दिसत नाही. एका सांस्कृतिक आविष्कारामागोमाग तरुण पिढी नव्या उप-संस्कृतीला जन्म देतच असते. त्या उपसंस्कृतीला परंपरेच्या अभिमाना-खाली दडपण्याऐवजी चांगल्या रीतीने प्रवाहित करण्याकडे हंगेरीय

सांस्कृतिक नेत्यांची प्रवृत्ती मला दिसत होती. विटयानींच्या संस्थेत कारखान्यातल्या तरुण मजुरांपासून शिक्षणक्षेत्रातल्या निवृत्त प्राध्यापका-पर्यंत जीवनातले नाना संस्कार घेऊन जगलेले आणि जगत असलेले विद्यार्थी होते, आणि विद्यार्थिनी होत्या. फुलांच्या दुनियेत जसे एक क्रॉस् पोलिनेशन् किंवा संकर असतो, तसा हा सांस्कृतिक संकर कलेच्या आविष्कारातही फार महत्त्वाचा असतो. शिवाय ही संस्था जरी हौशी विद्यार्थ्यांची असली तरी शिक्षणक्रम मात्र चांगला कडक आहे.

विटयानींचा निरोप घेताना ह्या संस्थेत निदान महिनाभर तरी राहून त्यातल्या त्या जीवनाच्या निरनिराळ्या स्तरांतून आलेल्या विद्यार्थि-विद्यार्थिनींचा अधिक जवळून परिचय व्हायला हवा होता असे मला वाटत होते. विटयानींशी बोलताना हंगेरीतले एक थोर संगीतकार झोल्तान कोदाय यांचा सतत उल्लेख येत होता. संगीताच्या शिक्षणात कोदाय यांनी फार मोठे परिवर्तन घडवून आणले आहे. किंबहुना शांतिनिकेतनात जसे पदोपदी गुरुदेवांचे नाव घेतले जाते तितक्याच आदराने कोदायचे नाव हंगेरीत घेतले जाते.

एवढ्याशा देशात एक लक्ष विद्यार्थी जिथे संगीताची उपासना करतात तिथे ' संगीत ' ही जीवनातली केवढी मोठी प्रेरक शक्ती मानली जाते याचा अनुभव मला केवळ संगीताचे शिक्षण देणाऱ्या संस्थांतच येत नव्हता. मी बूडापेष्टमधल्या नॅशनल लायब्ररीतले संस्कृत भाषा पंडित प्रोफेसर योशेफ वेकेर्डी यांना भेटलो होतो. त्यांनी देखील मला भेट म्हणून जे पुस्तक दिले ते झोल्तान कोदाय यांच्या संगीतविषयक लेखसंग्रहाचे. त्या पुस्तकावर ' प्रियजनाय पु० ल० देशपाण्डेय ' असे देवनागरीत लिहून त्यांनी ते पुस्तक मला दिले. देशपांडेतल्या पाण्डेचा पाण्डेय केलेला पाहून मला गंमत वाटली. प्रोफेसर योशेफ वेकेर्डी त्या लक्षावधी पुस्तके असलेल्या ग्रंथसंग्रहालयातला प्राच्यविद्याविभाग सांभाळतात. त्यांनी कालिदासाच्या काव्यातल्या काही श्लोकांचा आणि शाकुंतलाचा हंगेरीय भाषेत अनुवाद केला आहे. रघुवंशातल्या श्लोकांचा हंगेरीय अनुवाद तर चक्क समश्लोकी आहे. वेकेर्डींना रघु

मुखोद्‌गत होता. मी उगीचच दाब टाकायला ' क्व सूर्यप्रभवो वंशः क्व चाल्पविषया मतिः ' — म्हणायला लागल्याबरोबर त्यांनी हंगेरीय अनुवाद म्हणायला सुरुवात केली. कालिदासात काय रमलेले आहेत प्रोफेसर बेकेर्डी ! मी त्यांना विचारलं की कालिदासाबद्दल ही एवढी ओढ तुम्हाला कशी निर्माण झाली ? बेकेर्डी म्हणाले, ' जननान्तरसौहृद ' असलं पाहिजे. विटचानीसारखे बेकेर्डी देखणे नाहीत. पण ह्या दोन्ही माणसांतली बोलण्यातली नम्रता, संस्कृत सुभाषिताचा आश्रय घेऊन सांगायचे तर, फळभाराने वाकलेल्या आम्रवृक्षांसारखीच होती. संगीत – नाट्य – साहित्य ह्या कलांतल्या अभिजाताची आणि आधुनिकाची जोपासना करणाऱ्या ह्या संस्था. शिक्षण देण्याच्या कामात रमलेले प्राध्यापक आणि घेण्यात रमलेली तरुणपिढी. आम्ही नाना तऱ्हेचे प्रश्न विचारीत होतो. एकानेही कुणी उडवाउडवीचे उत्तर दिले नाही. प्राध्यापकांना पगार काय मिळतो ? त्या पगारात भागते का ? असलेही प्रश्न. त्यावर आम्हाला ' छे हो – माझी पत्नी कारखान्यात काम करते ती माझ्यापेक्षा अधिक पैसे घरात आणते ' असे मिष्किल उत्तरही मिळायचे. तुमच्यापैकी कोणी हाशीश एल्.एस्.डी वगैरे घेतो की नाही ? ह्या माझ्या प्रश्नाला एका तरुणाने हंगेरीय तरुण ह्या व्यसनापासून संपूर्णपणे अलिप्त आहे असे अभिमानाने सांगितले. मी त्यानंतर हा प्रश्न एका डॉक्टरना विचारला. भारतातल्या माझ्या एका स्नेह्याने त्यांना मी येत असल्याचे कळवले होते. त्यांचा पत्ता मला दिला होता. डॉक्टर बेंके योशेफ हे प्रसिद्ध डॉक्टर. मानसिक रोगांचे तज्ज्ञ. ते म्हणाले, आमच्या पाहण्यात सुदैवाने असली केस नाही. त्यांची बायको खट्याळ-पणाने म्हणाली,

" अहो आमचे हे हंगेरीय पुरुष वाइन्सच इतक्या पितात की त्यांना दुसऱ्या कसल्याही अमली पदार्थात मजा वाटत नाही ! "

" पण मिस्टर देशपांडे, ह्या हंगेरीय वाइन्स इथल्या माणसांना उन्मत्त करीत नाहीत. सुरेख नाचायला आणि गायला लावतात. "

" तुमच्याकडचा त्याहूनही एक सुंदर अमली पदार्थदेखील माणसांच्या

कंठातून गाणं फुलवतो आणि पायांना ठेका धरायला लावतो. "

" कुठला ? " डॉक्टरीणबाईंनी विचारले.

" तुमच्या देशातल्या तुमच्यासारख्या प्रसन्नवदना स्त्रिया ! " मी सांगितले. कम्युनिस्ट देशात स्त्रिया लाजूनही लाल होतात हे जाता जाता सांगायला हरकत नाही.

हा शेतकरी – धनगरांचा देश. त्यात जिप्सी लोकांनी आपला रंग मिसळला. हंगेरीय शेतकऱ्यांच्या गाण्यात ह्या अनिकेतांची गीते मिसळली. हजारो लोकगीते. राष्ट्रीय ग्रंथसंग्रहालयासारखे एक लोकगीते आणि लोकनृत्यांच्या ध्वनिमुद्रिका, ध्वनिपट्टिका आणि अनुबोधपटांचे संग्रहालय आहे. झोल्तान कोदाय स्वतः अभिजात संगीतातले फार बडे उस्ताद. पण त्यांनी त्या वरच्या स्तरातल्या मंडळींचे लक्ष ह्या लोक-संगीताकडे खेचले. त्या गीतात कोंदलेला संगीताचा गंध, त्यातली स्वररचना ह्याच्याकडे जाणकारीने पाहायला शिकवले. त्या लोक-संस्कृतीच्या संग्रहालयात जवळ जवळ दीडदोन लाख गीते ध्वनिमुद्रित केली आहेत. त्यांचे नोटेशन करून साऱ्या युरोपीय संगीतज्ञांसाठी एकामागून एक खंड प्रसिद्ध होताहेत. त्यासाठी महिना पगारावर तज्ज्ञ बसवले आहेत. केवढा प्रचंड उद्योग चालला आहे. बलाढ्य राष्ट्रांच्या आसुरी महत्त्वाकांक्षेत निष्कारण पोळून निघणारा हा देश. गेल्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर झोल्तान कोदाय म्हणाले होते, ' इथे खूप फुले उगवतात – कृपा करून ती तुडवू नका. फुलू द्या त्यांना आणि मग बघा चमत्कार. आम्हाला फक्त शंभर वर्षं शांतपणाने जगू द्या आणि मग बघा हा चिमुकला देश म्हणजे पृथ्वीवरचं नंदनवन होईल. '

खरोखरीच नंदनवन होईल असाच हा देश आहे. माणसंही तशीच. इतके दिवस आम्ही हंगेरीत होतो, मला कुठे असभ्यता आढळली नाही. वागण्यातली कुरूपता नाही. कुठे कोणी अभागी जीव भीक मागताना आढळत नाही. रस्त्याच्या कोपऱ्यावर उनाड पोरांची टोळकी बीभत्सपणा करीत उभी नाहीत. आम्हाला भाषा कळत नसे, पण रात्री अपरात्री आम्ही खुशाल हिंडू-फिरू शकत होतो. टॅक्सीवाल्यांनी कधी टंगवलं नाही.

अमेरिकेत टॅक्सी ड्रायव्हरच्या शेजारी बसता येत नाही. बसलेले गिऱ्हाईक केव्हा पिस्तूल काढील याची शाश्वती नाही. मागल्या बाजूला बसायचे. पुढल्या आणि मागल्या सीटच्यामध्ये पिस्तुलाची गोळी भेदू शकणार नाही असले अभ्रकाचे पार्टिशन. त्यातल्या बारीक फटींतून भाडे द्यायचे. आणि हंगेरीत पुरुष असो की स्त्री असो, जर पॅसेंजर एकटाच असला तर तो टॅक्सी ड्रायव्हरच्या शेजारी बसतो. तरुण स्त्रिया देखील आपल्या घरची गाडी असावी आणि घरातलाच बाप-भाऊ चालवत असावा अशा विश्वासाने आणि सभ्यतेने टॅक्सी ड्रायव्हरच्या शेजारी बसतात! मला एवढे एक दृश्य हंगेरीतल्या सभ्यतेचा पुरावा म्हणून पुष्कळ होते. बसमध्ये कंडक्टर नाही. सिगरेट तंबाकूवाल्यांच्या छोट्या दुकानात बसची तिकिटे मिळतात. दीड फोरिंट म्हणजे सुमारे आठ आण्याच्या तिकिटात कुठूनही कुठेही जावे. आपले तिकिट आपणच तिथे असलेल्या यंत्रात घालून पंच करायचे. उतरल्यावर खांबाला लावलेल्या कचऱ्याच्या डब्यात फेकून द्यायचे!

रस्त्यातून तरुणतरुणी मजेत जातात. एकमेकांना दृढ आलिंगने देतात. त्यात चोरटेपणा नाही. म्हणून असभ्यता नाही. ॲण्ड्र्यूबरोबर हिंडताना त्याला एखादी त्याच्या ओळखीची पोरगी भेटायची. मग त्यांच्या थोडा वेळ गप्पागोष्टी व्हायच्या. बोलता बोलता ॲण्ड्र्यू तिच्या केसांच्या बटा नीट करायचा. तिची हनुवटी हातात धरून बोलायचा. 'अच्छा' करताना तिच्या गालाचे चुंबनही घ्यायचा. एकदा आम्ही बूडा-पेष्टच्या यूथ सेंटरमधे गेलो होतो. ठिकठिकाणी अशी तरुणांसाठी सांस्कृतिक केंद्रे आहेत. छोटीशी लायब्ररी, नाचगाण्यासाठी किंवा नव-नाट्याच्या प्रयोगासाठी एखादा हॉल, छोटेसे कँटिन् — तिथे सॅण्ड-विचेस् — हॉट् डॉग्ज मिळतात. कॉफी, कोकाकोला वगैरे पेये असतात दारू नाही. रोज संध्याकाळी तरुणतरुणींच्या नृत्यगायनाचे कार्यक्रम· खास कार्यक्रम असला तर रुपया दोन रुपये तिकीट. आम्ही गेलो त्या दिवशी हंगेरीतल्या लोकसंगीत गाणाऱ्या अतिशय लोकप्रिय तरुण कला-वंतांचा कार्यक्रम होता. आणि तरुण पिढीचे लाडके कवी शांदोर फ्रिज्येश

यांची मुलाखत होती. ते तरुण कलावंत शांदोर कवीच्या कविताही गात असतात. सुमारे अडीच–तीनशे खुर्च्या मावतील असा हॉल. एक छोटेसे स्टेज. चिक्कार गर्दी होती. आपल्या मित्रांच्या खांद्यावर विसावून काही पोरी बसल्या होत्या. एखादा तरुण लडिवाळपणाने आपल्या सहेलीचे चुंबन घेत होता. कुठल्याही युरोपीय देशात असतात तसेच केस लांब वाढवलेले तरुण, मुक्तकेशा तरुणी – युनिसेक्सच्या जमान्यातला पोशाख. पण कुठे काही असभ्यता नव्हती. फाजीलपणा नाही. दुरून कागदाचे बोळे फेकण्याचा शेंबूटवाळूपणा नाही. अभद्र आवाज नाहीत. त्या तरुणांतला एकही कोणी झिंगलेला नव्हता की हिप्पी ढंगाची कोणी ओंगळ अवदसा नव्हती. आणि ह्या पोरांचे लाडके कवी शांदोर फ्रिज्येश हे सत्तरीच्या घरातले होते. ढिलाढाला सूट – बुटकीशी मूर्ती – प्राध्यापक चितळे किंवा दामले म्हणून इथे सहज खपले असते. पण आमच्या विद्यापीठातून त्यांना काढून टाकले असते. कारण तरुण पिढी त्यांच्यावर खूष होती, म्हणजे डालमें कुछ काला असणार! त्यांना प्रश्न विचारणारा तरुण एखाद्या खट्याळ नातवाने आजोबांच्या मिश्या ओढाव्या त्या ढंगात त्यांना नाना प्रकारचे प्रश्न विचारत होता. फ्रिज्येश शांदोरही मजेदार उत्तरे देत असावेत, कारण वारंवार हशाची लाट उसळत होती. ॲण्ड्र्यूची भाषांतर करताना त्रेधा होत होती. वृद्ध शांदोरांनी एका प्रश्नाला दिलेले उत्तर मला फार आवडले. त्यांना विचारले, "तुम्ही स्वतःला तरुण समजता की वृद्ध?"

शांदोर शांतपणाने म्हणाले, "मी स्वतःला वृद्धच समजतो. वार्धक्यात उगीचच तारुण्याचा आव आणण्यासारखी आत्मप्रतारणा नाही दुसरी!"

"तर मग तुमच्या हल्लीच्या कवितासुद्धा तरुणांना इतक्या कशा आवडतात?"

"ह्या प्रश्नाचं उत्तर देण्यासाठी नव्हे, ऐकण्यासाठी मी आज इथे आलो आहे!" शांदोर म्हणाले.

माझ्या मुक्कामात मी हंगेरीय कवींच्या इंग्रजीतून भाषांतर केलेल्या कविता वाचल्या. त्यात मला आशय आणि अभिव्यक्ती ह्या दोन्ही

बाबतींतला ताजेपणा विलक्षण वाटला. सगळीकडे कशी एक चांगला, अधिक सुसंस्कृत माणूस करायची ओढ आहे. हंगेरीय पुस्तकांच्या किंमती तर कमालीच्या स्वस्त. बुकडेपोत ग्राहकांची सतत गर्दी. प्रत्येक सांस्कृतिक संस्था कशी तरुणतरुणींच्या गर्दीने भरलेली.

बूडापेष्टमधली लिस्ट फेरेन्त्स ॲकेडमी ऑफ् म्यूझिक ही संस्था पाहायला गेलो होतो. कसला भव्य प्रासाद ! त्यातच एक मोठे आणि एक छोटे अशी दोन ऑपेरा नाट्यगृहे ! लिस्ट फेरेन्त्स हे हंगेरीतलेच नव्हे तर युरोपातले एक श्रेष्ठ संगीतकार. ह्या विद्यालयाचे पहिले प्राचार्य. शंभर वर्षांपूर्वी त्यांनी हे विद्यालय स्थापन केले. त्यांचा इथे एक सुंदर पुतळा आहे. जवळच बेला बार्टोक ह्या पश्चिमी संगीतात जागतिक कीर्ती मिळवलेल्या विसाव्या शतकातल्या हंगेरीय संगीतकाराचा पुतळा आहे. हातात निरनिराळ्या वाद्यांच्या पेट्या घेतलेल्या विद्यार्थिविद्यार्थिनींची वर्दळ चालली होती. फक्त पावणेचारशे विद्यार्थी आहेत. हजारोंनी अर्ज येतात. पण प्रवेशपरीक्षा अतिशय कडक. यंदा पाश्चात्य संगीतात सर्वांत महत्त्वाचे स्थान असणाऱ्या कंडक्टरच्या अभ्यासासाठी फक्त तीन नवीन विद्यार्थी घेतले गेले असे व्यवस्थापिकाबाई सांगत होत्या. संगीतातल्या प्रमाणपत्रांची खैरात करणारी ही शाळा नव्हे ! पाच वर्षांचा कोर्स आहे. त्याआधी शाळेत अकरा वर्षे संगीताचे विशेष शिक्षण घेतलेले असले पाहिजे ! इथे भावी आयुष्यात फक्त संगीताला वाहून घेण्याची ताकद असणाऱ्यांनाच प्रवेश मिळतो ! हौस म्हणून शिकणाऱ्यांसाठी डॉ. त्रिव्यानींची संस्था आहे. तिथेही अर्थात् शिक्षण निष्ठेनेच घ्यावे लागते. पण इथे सकाळी आठ ते पुढे किती वेळ रियाझ करावा लागेल याची खात्री नाही. ह्या संगीत विद्यालयाला सरकारचे वार्षिक अनुदान दोन कोटी रुपयांचे आहे हे ऐकल्यावर मला घेरी येईल की काय असे वाटले ! संगीताच्या क्षेत्रात ज्यांनी फार मोठी कीर्ती मिळवली आहे अशा लोकांना इथे शिक्षक म्हणून दिवसाचे चारचार पाचपाच तास देण्यात अभिमान वाटतो ! दोन कोटी रुपयांचे अनुदान आमच्या खंडप्राय देशातल्या वट्ट संगीतशाळांना मिळूनही नसेल. पण

त्या अनुदानापेक्षाही आपल्याकडल्या रविशंकर, भीमसेन जोशी ह्यांच्यासारख्या त्यांच्या देशातल्या गायकवादकांनी तिथे विद्यादानासाठी येण्यात भूषण मानावे याचे मोल मला लक्ष कोटींचे वाटले.

आमच्या देशात गुणी मुलांना गायनासारख्या विद्या देताना खुद्द उस्तादांनीच किती बेजबाबदारपणा दाखवला ह्याच्या कथा काही कमी नाहीत! शिस्तीच्या नावाखाली शिष्यातला आत्मविश्वास घालवणारे ते गुरू! त्यांच्या घरात बेवारशी कुत्र्यासारखे वागवले जाणारे शिष्य! मग सासूसुनेसारखी त्यांनीही ही छळाची परंपरा सांभाळायची. आणि इथे जर मुलात किंवा मुलीत असामान्य गुण असला तर संस्थेत प्रवेश देताना वयाची अटदेखील झुगारली जाते. हंगेरीत प्राथमिक शाळेपासून अतिशय पद्धतशीर असे संगीताचे शिक्षण सुरू होते. कलाशिक्षण देणाऱ्या शिक्षकांना इथे फार मोठा मान आहे. आमच्या शाळेत गायनमास्तर आणि ड्राइंगमास्तर हे शिक्षकांच्या एकत्र जमायच्या खोलीतले सर्वांत अधिक उपेक्षित! मला वाटतं भारतीय शिक्षण खात्याच्या इतिहासात सहज कुतूहल म्हणूनही एखाद्या भूगोलाच्या किंवा अगदी भाषाविषयाच्या शिक्षकांनीही ' काय हो मटंगेगुरुजी, ही तुमची बागेश्री — भीमपलास ही काय भानगड आहे आम्हाला समजावून सांगाल का ?' हा प्रश्न विचारल्याची नोंद नसेल आणि त्या गायनमास्तरांनीही रोजचे वर्तमानपत्र वाचलेले नसेल!. आणि हंगेरीतल्या प्राथमिक शाळेतले गायनमास्तर जर एखादा संगीतात अलौकिक बुद्धिमत्ता दाखवणारा मुलगा किंवा मुलगी वर्गात आढळली तर बूडापेष्टच्या ॲकेडेमीत त्यांची नावे कळवतात! तिथे अठरा वर्षा आधी प्रवेश नाही. पण असे नाव आल्यावर त्या मुलाच्या संगीतातल्या गतीची उत्तम चाचणी होते आणि असेल तिथून बूडापेष्टला आणून त्याची राहण्याजेवणापासून सगळी व्यवस्था करून ही ॲकेडेमी त्याचे किंवा तिचे संगीत शिक्षण सुरू करते! वयाच्या सातव्या वर्षी सुद्धा प्रवेश मिळवलेली मुले इथे आहेत. तीन किंवा चारच असे विद्यार्थी मिळतात. अष्टवर्षात् चतुर्वेदी होणारे शंकराचार्य किंवा नवव्या वर्षी तासतास ख्याल गाणारे कुमारगंधर्व काय

उझनानी पैदा होत नाहीत. पण थोडेफार असतात. उपेक्षा-दारिद्र्य ह्यांच्या झळा लागून रानफुलांसारखे सुकून जातात! मी बाईंना म्हणालो, "सध्या असे कोणी बाल कलावंत तुमच्या त्या महाविद्यालयात आहेत का?"

"पाहायचा आहे का तुम्हाला?" बाई म्हणाल्या.

"तुमची हरकत नसली तर -" मी म्हणालो.

मग बाई आम्हाला एका वर्गात घेऊन गेल्या. तिथे एका आठ-नऊ वर्षांच्या मुलाला त्याचे गुरुजी व्हायलिनचे धडे देत होते. इथे गुरु-शिष्य परंपरेने तालीम चालते! चीजांची घाऊक विक्री नाही! तो टिल्ल्या कमालीच्या आत्मविश्वासाने वाजवीत होता. त्या चिमुकल्या बोटांत विलक्षण दमदारपणा होता. 'आला तेव्हा सहा वर्षांचा होता — आता जरा उंच झालाय् —' बाई कुजबुजल्या. त्या मुलाची आईच पियानोवर साथ करीत होती. पाहुणेमंडळी आल्यामुळे चिरंजीव जरा अधिक तरबेजपणा दाखवायला लागले, तेव्हा गुरुजींनी हसत हसत एक हलकीशी कानपिचकी दिली. मग एक गंभीर सुरावट वाजवायला सांगितले! डोळे मिटून ऐकणाराला ही बोटे नऊ वर्षांच्या वयाच्या मुलाची वाटली नसती. वाजवताना त्या चिमण्या चेहऱ्यावर भुवयांच्या-मध्ये हलकीशी आठी पडायची! ही आठी मी रविशंकराच्या भुवयांत पाहिली आहे — ती अर्धोन्मीलित दृष्टी कुमारगंधर्वांत मला बघायला मिळाली आहे. विलक्षण सुखाच्या वेदनेचं ते सूक्ष्म दर्शन त्या पोराच्या चेहऱ्यावर होतं. मी म्हटलं, केवढ्या थोर भाग्याचा धनी आहेस सोन्या तुझं तुलाच ठाऊक नाही! — तेवढ्यात एक बारा तेरा वर्षांची भलती गोड पोरगी आत आली. बाई म्हणाल्या, "ही इथे आली तेव्हा सहा-सात वर्षांची होती. नुकतीच शेवटच्या परीक्षेला बसली आहे."

"पण ह्यांच्या इतर शिक्षणाचं काय?" माझा कारकुनीरक्तदर्शक प्रश्न.

"ती जबाबदारीही आम्हीच घेतो. अनुभव असा आहे की ही मुलं शाळेच्या अभ्यासातही तितकीच हुषार असतात!"

ह्या अनुभवावरच तर झोल्तान कोदाय यांनी आपल्या संगीत शिक्षणाचा पाया घातला.

झोल्तान कोदायसारख्या संगीतकाराकडे केवळ एक संगीतातला श्रेष्ठ कलावंत म्हणून न पाहता राष्ट्रीय संस्कृतीची बांधणी करणारा थोर पुरुष म्हणूनच पाहिले जाते. गायन-वादन क्षेत्रातल्या कलावंतांची सारी जीवनदृष्टी सर्वांग सुंदर, सुसंस्कृत असावी ह्याच्याकडे कोदायचा कटाक्ष होता. क्षुद्र अहंकारातून मुक्त करण्यासाठी त्यांनी 'स्वतंत्र वादनकार' म्हणून कीर्ती मिळविलेल्या वादकांना अधूनमधून साथीला बसत जा अशी सूचना दिली आहे! 'तुमच्या वाद्यावर खूप प्रेम करा – पण प्रेम करण्यासारखं तेवढं एकच वाद्य आहे असे मात्र समजू नका. जे ते वाद्य आपापल्या जागी फार सुंदर असतं!' हा विचार त्यातले 'वाद्य' जर प्रतीकात्मक मानले तर साऱ्या जीवनाकडे पाहण्याची दृष्टी देणारा आहे! कोदायच्या ह्या संस्कृतिवृक्षाला धरलेली सुंदर फळे मला 'ग्यिओर' नावाच्या शहरात आम्ही गेलो त्यावेळी पाहायला मिळाली.

बूडापेष्टपासून नव्वद एक मैलाच्या अंतरावर ग्यिओर हे एक औद्योगिक कारखाने असलेलं शहर आहे. तिथले 'यूथ सेंटर' पाहायला आम्ही गेलो. ऐशी हजार वस्तीचं गाव. कारखाने, गिरण्यांचे गाव असूनही शेकडो वृक्ष बाळगून आहे. आम्ही गावात शिरतानाच एक भला मोठा स्टेडियम् दिसला. शेकडो सायकली त्या दिशेला चालल्या होत्या. गावात फुटबॉलचे सामने होते. सूर्यनारायणाची मर्जी फिरली होती. पावसाचा शिडकावा चालू होता. मला उगीचच फूट-बॉलवाल्यांची काळजी. पण ॲण्ड्र्यू म्हणाला, "पावसात तर अधिक मजा येते!" खरेखोटे कोणास ठाऊक! आयुष्यात मी फूटबॉलला सुद्धा लाथ मारलेली नाही! आम्ही क्रिकेटवाले!

तिनाच्या ठोक्याला आमची टॅक्सी त्या युवक केंद्राच्या इमारतीच्या दारात येऊन थांबली. स्वागतसमिती दारात हजर होती! ओळखपाळख झाली. त्या केंद्राचा दिग्दर्शक ठेंगणासा पण अतिशय तरतरीत होता. त्याचं नाव बेला शॉरेक्. दुसरा जराशा ढिल्याढाल्या शरीराचा लाओश

माते – बूडापेष्टच्या इन्स्टिट्यूट ऑफ पॉप्युलर कल्चरचा प्रतिनिधी. तिसरा उंच सडपातळ दाढीमिशी राखलेला होता. पण पहिल्या भेटीतच स्वारी मिष्किल असणार हे ओळखू येत होतं. हा सांस्कृतिक मंत्रणालयातला अधिकारी सिलार्द स्युयेदी ! तिघेही तरुण होते. लाओश मातेच चाळिशीतले असावे. हंगेरीत प्रथम आडनाव आणि नंतर पाळण्यातलं नाव सांगायची पद्धत आहे. आपल्याकडे कायकिणी गोपाळराव–हट्टंगडी मंगेशराव असतात तसे !

ती इमारत पाहूनच मी निम्मा गार झालो. अगदी आधुनिक स्थापत्य आहे. इमारत तीन मजली आहे हे आत शिरल्यावर कळलं. शिरल्याबरोबर दोन्ही बाजूला एकावेळी सहा पंक्ती बसतील असला प्रशस्त कॉरिडॉर. त्याच्या उजव्या हाताच्या भिंतीवर एक ॲब्स्ट्रॅक्ट म्यूरल ! समाजवादी देशात फक्त हातोड्या कोयत्याचीच चित्रे असतात अशी आपली भाबडी समजूत असते ! ते म्यूरल इतकं आकर्षक होतं की आपोआप त्या दिशेला माझे पाय वळले ! कॉरिडॉर ओलांडला की जुन्या राजवाड्यांना असत तशा लांबरुंद पायऱ्या. पायऱ्या चढून वर गेल्यावर चांगल्या दोनअडीचशे खुर्च्या बसतील असा संगमरवरासारखा फरश्यांचा चौक ! वरच्या छताकडे पाहिल्यावर इमारतीची उंची ध्यानात आली. एका बाजूची संपूर्ण भिंत काचेच्या तावदानांची. त्याच्यावर भले मोठे पडदे टांगलेले. तिन्ही बाजूच्या भिंतींना कॉरिडॉर्स त्या पलीकडे अनेक खोल्या. चौकाच्या मध्यभागी डावी उजवीकडे जाणाऱ्या पायऱ्या. त्या भागाला थोडासा ग्रीक स्थापत्यकलेचा स्पर्श ! आम्ही पायऱ्या चढून वर गेलो. त्या कॉरिडॉर्सना लागून असलेल्या खोल्यांतून त्या युवककेंद्रात चालणाऱ्या विविध कलाविभागांच्या प्रमुखांची कार्यालये होती. आटोपशीर असे दिवाणखाने होते. सगळीकडे भिंतीवर सुंदर चित्रे होती. पुतळे होते. कार्यक्रमांची तरबेज कलावंतांनी रंगवलेली पत्रके होती, आम्ही डायरेक्टरसाहेबांच्या खोलीत गेलो. काय सुरेख कार्यालय होते. आत झाडांच्या कुंड्या होत्या. फर्निचरचा ढंग अत्याधुनिक होता. कुठे कुठे म्हणून असुंदराचा आणि दैन्याचा स्पर्श नव्हता, पण श्रीमंतीचे भडक

प्रदर्शनही नव्हतं !

बूडापेष्टला डॉ. विथ्यानी यांची जी इन्स्टिटयूट ऑफ् पॉप्युलर कल्चर आहे, तिचीच ही शाखा. हंगेरीतल्या अनेक महत्त्वाच्या शहरांतून अशी 'यूथ सेंटर्स' आहेत. बूडापेष्टच्या मध्यवर्ती संस्थेत मिळते तसेच संगीत-नाट्य-चित्र असल्या कलांचे विनामूल्य शिक्षण इथे मिळते. ही कलासाधना किती कसोशीने चालते याचे प्रात्यक्षिक त्या दिवशी संध्याकाळी त्या सेंटरमधल्या नाट्यविभागातल्या हौशी कलावंतांनी करून दाखवलेल्या दोन नाट्यप्रयोगांतून पाहायला मिळालं. पहिला प्रयोग छोट्याशा संगीतिकेचा झाला. एका हंगेरीय लोककथेवर ही संगीतिका आधारली होती. साथीला फक्त गिटार. हा प्रयोग आतल्या चौकात झाला. समोर दीडदोनशे खुर्च्यांवर प्रेक्षक आणि दोन्ही दिशांना जाणाऱ्या जिन्यांच्या मधल्या जागेचा रंगमंच. अभिनय, गाणे आणि प्रस्तुतीकरणातले कौशल्य ह्यात कुठेही शिकाऊपणा नव्हता. तरबेज कलावंतांची सफाई होती. काय दमदार आवाज होते एकेकाचे. तो प्रयोग संपल्यावर पंधरा मिनिटांचे मध्यंतर झाले. आम्ही तळघरात गेलो. तिथे सुमारे तीनशे माणसं बसतील असं एक सुसज्ज रंगमंदिर होतं. तिथे ह्याच कलावंतांनी मोलियरचा 'मारून मुटकून वैद्यबुवा' हा फार्स केला. रंगमंचावर इंग्रजी ए च्या आकाराच्या दोन शिड्या. याखेरीज मांडामांड काही नव्हती. ह्या शिड्यांमधून नटनटींनी वाड्यातल्या खिडक्या, प्रवेशद्वार, गच्ची ह्या साऱ्यांचा सुंदर नाट्याभास निर्माण केला. अशा संस्था पाहिल्या की आमच्या देशातल्या गुणी मुलामुलींना साधी तालमीला जागा मिळवताना किती हाल सोसावे लागतात याची आठवण यायची. ह्या तरुणांपेक्षा हल्ली मिळेल त्या ठिकाणी गोची किंवा उद्ध्वस्त धर्मशाळा, घाशीराम, महानिर्वाण यासारख्या प्रायोगिक नाटकांचे प्रयोग करणारी तरुण मुले आणि मुली गुणवत्तेत कुठेही कमी नाहीत. पण त्यांच्या पाठीशी जाणते-पणाने सरकार उभे नाही. मी सहज विचारले, 'ही नाटके निवडतो कोण ?'

'कधी दिग्दर्शक निवडतात, कधी मुले निवडतात, कधी स्वतः

लिहितात .... मग त्याची चर्चा करतात — ही सगळी त्यांची जबाबदारी .... '

हंगेरीय तरुणतरुणींची नीतिमत्ता टणक आहे यावर वडील पिढीचा भरपूर विश्वास दिसला. त्याबरोबरच ती तरुण मुलेही आपल्या गुरुजनां-पुढे अतिशय आदराने वागताना दिसली. हे नाट्यप्रयोग सुरू होण्याआधी त्यांच्या दिग्दर्शकाने ड्रिलमास्तरसारखे व्यायामाचे प्रकार करून घेतले. मुलामुलींना सारखेच व्यायाम. पंधरावीस मिनिटांत पोरांना चांगलाच घाम फुटला होता. रात्री प्रयोग संपल्यावर त्या सेंटरमधल्या तरुणतरुणींचा आणि माझा प्रश्नोत्तरांचा कार्यक्रम ठरला होता.

एका कॉन्फरन्स् हॉलमध्ये सुमारे साठसत्तर मुले आणि मुली जमल्या होत्या. काही पत्रकार होते. तेवढ्यात रेडियोवाले आले. त्या तरुणांनी भारतीय संगीत, नाटय, ह्यासंबंधी कितीतरी प्रश्न विचारले. चर्चा संपली त्या वेळी रात्रीचे दहा वाजून गेले होते. त्यानंतर भोजनाचा कार्यक्रम. पाच-सहा तासांत ज्यिओर शहरातल्या त्या यूथ सेंटरमधल्या लोकांशी इतकी दोस्ती जडली की निरोप घेऊन निघताना जड वाटले. सहज बोलता बोलता पिढ्या-पिढ्यांतल्या दुराव्याविषयी मी चालक मंडळींना विचारले. त्यांच्यापैकी वयाने वडील असलेले एक गृहस्थ म्हणाले, 'आम्हाला हा प्रश्न पडत नाही. हेच पाहा ना. ही यूथ सेंटरची इमारत काही नुसती सरकारी मदतीवर उभारली गेली नाही. गावातल्या लोकांनीही पैसे दिले. आणि मुख्य म्हणजे आमच्या गावातल्या तरबेज सुतार-गवंड्यांनी दिवसभराचे काम झाल्यावर उरलेल्या वेळात ह्या इमारतीसाठी फुकट काम केले. त्यांच्या जोडीला ह्या शहरातले तरुण फुकट राबले. *ह्या यूथ सेंटरसाठी इथे येणाऱ्या प्रत्येकाने नावाजलीच* पाहिजे अशी इमारत, त्यातलं फर्निचर वगैरे तयार करण्यासाठी ह्या शहरातली वृद्ध, मध्यमवयीन आणि तरुण पिढी एकत्र राबली आहे. निरनिराळ्या पिढ्यांतल्या आपुलकीचा आणखी काय पुरावा हवा तुम्हाला ?'

हे असले काही पाहताना एखाद्या थोरामोठ्या घरच्या बाईने एखाद्या

गरिबाच्या बायकोला ' हा पाहिलात का नवा कंठा ? – कसा वाटला ?' म्हटल्यावर ' छान वाटला ' म्हणताना त्या बिचारीचा होत असेल तसा माझा चेहरा होत होता ! बूडापेष्ट शहरात चौदा मोठी नाट्यगृहे आहेत. शिवाय ऑपेरा हाऊस, पपेट थिएटर, प्रायोगिक रंगमंच निराळेच ! जावे तिथे हाऊस फुल ! प्रत्येक थिएटरचा स्वतंत्र नटसंच. स्वतंत्र दिग्दर्शक. नटांचे तीन तीन वर्षांचे करार. शिवाय रेडियो, चित्रपट, टी. व्ही. वर पैसे घेऊन काम करण्याची मुभा ! शेक्सपिअरपासून टेनेसी विल्यम्सपर्यंत आणि जुन्या ढंगाच्या नाट्यप्रयोगापासून ते ॲब्सर्ड थिएटरपर्यंत नाना लेखकांचे आणि नाना प्रकारचे नाट्यप्रयोग चालू असतात. इथल्या नाट्यशिक्षण विद्यालयाची स्थापनाच मुळी सवाशे वर्षांपूर्वी झाली. गाण्याचे अंग असणाऱ्या मुलामुलींना इथे प्रवेश अधिक सोपा असतो. पण चार-चार पाच-पाच वर्षे अभिनयकलेत आणि नाट्यसंगीतात घोळून काढतात. इथल्या आणखी एका नाट्याभ्यासाच्या संस्थेत तर देशोदेशींच्या नाटकांची पुस्तके आणि नाट्यप्रयोगांची माहिती गोळा करून ठेवली जाते. दर पंधरवड्याला नाट्यजगतात निरनिराळ्या देशांत नवीन काय घडले याची माहिती देणारे साध्या सायक्लोस्टाइलवर काढलेले पाक्षिक ही संस्था हंगेरीतल्या शेकडो नाट्यसंस्थांना पुरवते. मी नाट्यशिक्षणाच्या त्या विद्यालयातल्या प्रमुखांना विचारले, " किती ते किती तुमचे तास चालतात ? "

" सकाळी साडे आठ ते .... रात्री कितीही .... "

मला शूमान ह्या थोर संगीतकाराचे सूत्र आठवले. ' शिकण्याला अंत नाही ! ' बूडापेष्टमधली सगळी रंगमंदिरे सरकारी हे खरं. पण आपापसात खूप चढाओढ आहे. प्रत्येक नाटकाचे उत्पन्न त्या त्या थिएटरच्या खात्यात जाते. ते पैसे नव्या नाटकाच्या निर्मितीसाठी वापरता येतात. नटनटींना त्यातून बोनसही मिळतो. केवळ त्यामुळेच नसेल, ह्या कलांच्या शिक्षणपद्धतीतच कुठेतरी ' उत्तम ' करून दाखवण्याची जिद्द निर्माण केली जात असावी.

बूडापेष्टच्या मुक्कामात मी जितकी नाटकं पाहिली त्या प्रत्येकात

माणसं कशी जीव तोडून काम करताना दिसली. करणारे आणि पाहाणारे दोघांच्यातही उत्साह होता. अशा उत्साहाला आर्थिक नफ्याचे उद्दिष्ट नसले म्हणजे कलेच्या संदर्भात जे जास्तीत जास्त चांगले असेल त्याचा शोध घ्यायला सुरुवात होते. अशल्या एका शोधाचा फार परिणामकारक प्रत्यय मी ' ऑथेल्लो ' नाटक पाहताना मला मिळाला. यापूर्वी मी लॉरेन्स् ऑलिव्हिएचे ऑथेल्लो पाहिलं होतं. बाबूराव पेंढारकरांनी केलेल्या ऑथेल्लोला तर मी संपूर्ण नाटकभर पार्श्वसंगीत दिले होते. हे नाटक माझ्या कॉलेजमधल्या अभ्यासक्रमात दोनदा होते. एकदा इंटरला आणि एकदा एम्. ए. ला. त्यामुळे हंगेरियन भाषेत नाटक झाले तरी त्यातल्या मूळ संवादाशी पूर्ण परिचय होता.

पडदा वर गेला आणि व्हेनिसमधल्या एका चौकाच्या डाव्या अंगाला असलेल्या एका दगडी वाड्याचे दर्शन घडले. ब्रबेन्शियोच्या वाड्याचा तो पुढला भाग. पार्श्वभागी निळे आकाश. कमालीचे आटोपशीर सेटिंग. पण रंगसंगती, प्रकाशयोजना ह्यांचा अप्रतिम मेळ जमला होता. रॉडरिगो आणि यागो यांचा पहिला प्रवेश सुरू झाला. मी मराठी रंगभूमीवर जे थोडे-फार यागो पाहिले ते नमनालाच आपण अट्टल व्हिलन आहोत हे जाहीर करणारे! पण हा हंगेरीय यागो तरणाबांड देखणा होता. हसरा होता. एवढं सगळं असूनही यागोमधला कोडगेपणा चटकन् दाखवून गेला. यागो हा त्या नाटकातला कली आहे. सुंदर जीवनाचा विध्वंस करणारा. त्या दिग्दर्शकाने हे नाटक ह्या कलीभोवती घुमवले होते. त्याने साऱ्यांच्या जीवनाची सूत्रे आपल्या हातात हलकेहलके आणली होती. यागोचे 'प्रयोजनरहित पाशव' म्हणजे काय ते त्याने कुठेही नाटकी पोजबीज न घेता दाखवले. हूस्ती पेतर नावाचा हा नट अवघ्या चार वर्षांपूर्वी बुडापेष्टच्या त्या नाट्य विद्यालयातून शिकून बाहेर पडला होता. त्याच्यासमोर ऑथेल्लो होऊन उभा राहिलेला बेसेन्यी फोरेन्स हा तर हंगेरीय रंगभूमीवरचा फार मोठा नट. कसला धिप्पाड माणूस. नीग्रोच्या वेषात त्याने प्रवेश केल्याबरोबर आदर-भय-कौतुक असल्या संमिश्र भावनांची लाट प्रेक्षा-

गारात उमटली. आणि त्याच्या पहिल्याच वाक्यात माणसाच्या बोलण्याचा खर्ज इतका भेदक असू शकतो याचा मला तरी प्रथमच प्रत्यय आला. नीग्रो गायकांचा असा खर्ज असतो. पॉल रोबसनचा खर्ज असामान्य होता. पण बेसेन्यी फेरेन्त्सच्या खर्जाची जातच निराळी. देवळात प्रचंड नगारे असतात. तसल्या नगाऱ्यावर कापडी बोळा लावलेली टिपरी हलकेच मारल्यावर जो घनगंभीर नाद येतो तसा हा गुहेतून आल्यासारखा गंभीर पण कमालीचा मधुर खर्ज. ऑथेल्लो बोलताना त्या खर्जाचा साऱ्या शरीराला स्पर्श झाल्यासारखा वाटे. रंगभूमीवरचे आवाजदार नट यापूर्वी मी अनेक ऐकले आहेत. पण त्या आवाजाची अनुभूतीच निराळी होती. त्या अतिमंद्र नादाने माझी शुद्ध जाईल की काय अशी भीती मला वाटायला लागली. यागो आणि ऑथेल्लो यांच्या अभिनयांची अक्षरशः रविशंकरच्या सतारीबरोबरच्या अली अकबरच्या सरोदच्या जुगलबंदीसारखी जुगलबंदी सुरू झाली. सारखे वाटत होते की हे गाणारांचे आवाज आहेत. ' ओ माय् फेअर वॉरियर ' म्हणत पुढे आलेला तो वीरपुरुष आणि त्याच्या बाहूवर ' माय डिअर आथेल्लो ' म्हणत फुलून आलेल्या वेलीसारखी विसावलेली ती डेस्डिमोना. ' इट्स् टू मच ऑफ् जॉय् ' म्हणत तृप्तीने कोंदून गेलेल्या ऑथेल्लोने प्रेमभराने डेस्डिमोनाचे चुंबन घेताना ते सारे कलावैभव पाहात मीही म्हणत होतो — ' इट्स् टू मच ऑफ् जॉय् '. हा यागोने त्या छकड्या रॉडरिगोला तर एखाद्या बोक्याने लोकरीच्या गुंड्याशी खेळावे तसे खेळवले. त्यात त्याने कमालीच्या संयमाने समसंभोगी माणसाच्या वासनेचा सूचक अभिनय केला. हळूहळू त्याच्या हसऱ्या चेहऱ्याची घृणा यायला लागली. ' अधमकरणी वडेपर्यंत अधमांच्या चेहऱ्याचं खरं दर्शन होत नाही. ' अशी त्या प्रवेशाच्या अखेरीला यागोच्या तोंडी ओळ आहे. तो हे वाक्य बोलता बोलता रंगभूमीवरचा इतर प्रकाश कमी होत गेला आणि यागोच्या चेहऱ्यावर अशी काही प्रकाशयोजना झाली — *येतरचा देखणा चेहरा एखाद्या भक्ष्याच्या* शोधात असलेल्या लांडग्यासारखा दिसायला लागला. प्रयोगाचे नेपथ्य

आणि प्रकाशयोजना यांचा तर सौम्य पार्श्वसंगीतासारखा परिणाम साधला होता. आणि फक्त एक-दोन जागा सोडल्या तर पार्श्वसंगीतही नव्हते. सायप्रस बेटावरचा ऑथेल्लोच्या सैन्याचा तळ.... सैनिकांचा जल्लोष.... कॅशियोशी झालेली झटापट... सुरुवातीला वादळाची सूचना देखील फार चतुराईने दिली होती. डाव्या अंगाला आता किल्ल्यातला बुरुज होता आणि उजव्या बाजूला वादळी धोका दाखवणारा लाल दिवा. बुरुजामागून वादळी वाऱ्यावर फडफडणारे निशाणाचे टोक. त्याच्याशी संवादित्व साधणारी, त्या वादळी इशारा दाखवणाऱ्या धोक्याच्या लाल दिव्यातल्या ज्योतीची फडफड.... तिथेच पुढे एक किल्ल्यावरचे सैनिक, कॅशियो, मोन्तानो – यागो वगैरेंचा दारू पिऊन दंगा करण्याचा प्रवेश आहे. मूळ नाटकात यागोच्या तोंडी गाणे आहे. लष्करी जवानांचे जराश्या वाह्यात भाषेतले गाणे. इस्त्ती पेतरने ते गाणे म्हणताना हातात दारूचे दोन रिकामे बंपर घेऊन समोरच्या टेबलावर ते हापटीत ताल धरला.... आणि गाता गाता त्या लाकडी बंपर्सनी जाझवाले तालाच्या जश्या होष उडवणाऱ्या करामती करतात तश्या करता करता मनातली सारी हिंस्रता इतक्या परिणामकारक रीतीने दाखवली की काही क्षणांनंतर ते लाकडी बंपर नसून तो ऑथेल्लो, डेस्डिमोना, कॅशियो यांच्यासारख्या निष्पापांची मुंडकी धरून ठेचतोय असे वाटायला लागले. त्या गाण्याला आसुरी वळी गीताची भयानकता आली. हे कौशल्य जितके इस्त्ती पेतरचे तितकेच मुळात ते योजणाऱ्या दिग्दर्शक आदाम ऑतो यांचेही. ह्या सगळ्यांना प्रयोगानंतर आत जाऊन भेटायचा योगही अचानक-पणाने आला. नाटकाच्या मध्यंतरात एक वृद्ध पण चांगली टुणटुणीत अशी बाई आमच्याशी आपण होऊन बोलायला आली. तिला इंग्रजी चांगले बोलता येत होते. हंगेरीतली एकेकाळची ती प्रसिद्ध नटी गाबोर मारा. शॉच्या ' मिसेस् वॉरेन्स प्रोफेशन् 'च्या हंगेरीय अवतारातली ही पहिली मिसेस् वॉरेन्. आमचाही नाटकाशी संबंध आहे म्हटल्यावर माराबाईंना आनंद झाला. त्यांच्या बोटाला धरून आम्ही आत गेलो. जाता जाता मी त्यांना म्हटले, "ऑथेल्लोचा अभिनय केलेल्या नटाचा

आवाज किती 'म्यूझिकल्' आहे."

"तो रंगभूमीवरचा उत्तम गायक नट आहे. 'फिडलर ऑन द रूफ' मधल्या बापाची ती मुख्य भूमिका पाहायला हवी तुम्ही –" हा एवढा मोठा गायकनट ह्या नाटकात प्रोज-नट म्हणून उभा राहतो. प्रेक्षकही त्याचा तो ऑथेल्लो पाहायला येतात. मराठी रंगभूमीवर वसंतराव देशपांड्यांसारखा अपवाद वगळला तर गायकनट याचा अर्थ अभिनय हे रंगभूमीवरचं हलकं काम आहे असे मानून गाऊन गाऊन गळूल झालेल्या त्याच त्या फिरकीच्या ताना मारून टाळ्या वसूल करणारा माणूस! हंगेरीत अभिनयनैपुण्याच्या कोस्यूथ पारितोषिकाचा गौरव फार मोठा मानला जातो. बेसेन्यी फोरेन्त्स त्या मानाचे मानकरी आहेत. जवळ गेल्यावर त्यांचा विप्पाडपणा फारच जाणवला! आणि असा हा असामान्य नट त्याचे अभिनंदन केल्यावर ही त्यांची कृपा म्हणून त्या तरुण दिग्दर्शकाकडे बोट दाखवीत होता. तो मात्र अभिनय नव्हता. हंगेरीत आल्याचे सार्थक झाले अशा भावनेने आम्ही बिऱ्हाडी परतलो.

काही दिवस कधीही मनातून मावळत नाहीत. हंगेरीत असाच एक दिवस गाठीला पडला. बूडापेष्टच्या दक्षिणेला पाऊणशे एक मैलावर 'कालोच्या' नावाचे गाव आहे. पंधरा हजार वस्तीचे. फुलकारी, कुंभारकाम असल्या कारागिरीबद्दल प्रसिद्ध. गावात शिरताच उमगलं की रसिकतेने जगणाऱ्यांचं गाव आहे. घनदाट वृक्षाच्या छायेखाली कालोच्या नांदतो आहे. कोकणी गावासारखा गावात एक हमरस्ता आणि बाजारपेठ बाकीच्या सगळ्या चिमुकल्या गल्ल्या. तिथल्या मुन्सिपालिटीच्या इमारतीपुढे आमची गाडी येऊन थांबली. 'मुन्सिपालिटी' ह्या नावाशी अगदी विसंगत अशी ही इमारत. आत शिरतो तर भिंतीवर सुंदर वेलबुट्ट्या काढलेल्या. उत्तमोत्तम चित्रे लावलेली. व्हरांडे प्रशस्त. मधूनच एखाद्या काचेच्या कपाटात कालोच्याच्या पॉटरीचे सुंदर नमुने मांडलेले. माननीय महापौरांनी आमचे स्वागत केले. त्यांच्या कार्यालयात नेले. तिथे दुसरे एक काउन्सिलरही होते. तिथे हंगेरीय कॉफी-बिफी झाली. ही कडूझार कॉफी पिण्याचे धर्मकृत्य दरवेळी करावेच लागते. "आपल्याला

इथल्या शाळेत जायचंय. तिथली मुलं हंगेरीय लोकनृत्य करून दाखवणार आहेत." माननीय नगरसेवकांनी आमचा मोर्चा एका शाळेकडे वळवला. कालोच्या गावातल्या शाळेत मी बालकबालिकांचे ते समूह-नृत्य पाहायला थोडासा साशंक मनानेच गेलो. 'शालेय विद्यार्थ्यांचे कार्यक्रम' ह्या प्रकरणाची माझ्या मनात थोडीशी धास्तीच आहे. आपल्या तालुक्याच्या गावाला असते तसलीच लांबोडकी प्राथमिक शाळा होती. लांबलचक ओसरी, भिंतीवर बाल चित्रकारांनी केलेली – रंगरंगोटी सारे काही यथासांग होते. स्वागताला आलेल्या हेडबाई मात्र चांगल्या हसऱ्या निघाल्या. विनचष्म्याच्या आणि सडपातळसुद्धा ! आपल्या मुलखात अशा देखण्या, हसऱ्या, 'मेरे प्यारे बच्चो' वगैरे म्हणणाऱ्या शिक्षिका फक्त हिंदी सिनेमात असतात. त्या हंगेरीय हेडबाईंनी आम्हाला शाळेच्या सभा-गृहात नेलं. सभागृह थोडसं आपल्या इथल्या मंगल कार्यालयाच्या हॉल-सारखं होतं. पण त्याला लांबरुंद स्टेज होतं ! हॉलमध्ये साध्याच दुमडत्या खुर्च्या मांडल्या होत्या. आमच्या आधी पंधरावीस पोक्त स्त्रिया, चारपाच पेन्शनर वगैरे मंडळी येऊन बसली होती. रंगमंचावर डबल् बेस, फ्लूट, व्हायलीन आणि झिटर असा वाद्यमेळ होता. झिटर हे आपल्या संतूर-सारखे वाद्य. पण त्याला पायपेटीसारखे पेडल असतात. त्यामुळे तारांतून उमटलेला नाद रेंगाळायला नको असला तर पेडल दाबून ती कंपने थांबवता येतात. छोट्या दीड वीत लांबीच्या नाजुक काड्यांना टोकाशी बारीकसा कापडी गोळा बांधलेला असतो. त्या आघातांनी हे वाद्य वाजवायचे. वादकांनी खास हंगेरीय पोशाख केला होता. व्हायोलिन-वाल्या बाई पंचविशीतल्या होत्या. त्यांनी पांढऱ्या फुग्याफुग्याच्या ब्लाऊजवर काळे जाकिट घातले होते. काळा स्कर्ट, त्याच्यावर सुंदर वेलबुट्टीदार एप्रन बांधलेला. काळ्या जाकिटावरही नाजुक वेलबुट्टी होतीच.

वाद्यसंगीत सुरू झाले. क्षणार्धात रंगीबेरंगी फुलांचे ताटवेच्या ताटवे पाय फुटून नाचायला लागल्यासारखे वाटले. चिमण्या देवदूतांसारखी ती चाळीसपन्नास मुलं आणि मुली नाचत नाचत रंगभूमीवर आली.

समोरच्या प्रेक्षकांची त्यांनी अजिबात दखल घेतली नाही. एका स्वतंत्र विश्वात ती नाचत होती. पाऊण तास कसा गेला ते कळलं नाही ! वाढत्या लयीत सारे भान हरपून ताज्या फुलांसारखी ती सारी मुले आणि मुली नाचत होती. आणि पुन्हा पुन्हा मी माझ्या चष्म्याच्या काचांवर जमणारे धुके पुसत होतो. हे कसले बालनृत्य ! ते नृत्य अत्यंत प्रौढ होते. नाचणाऱ्या मूर्ती चिमुकल्या होत्या. कुशल नर्तकीसारखी ती मुले त्या लयीत विरून गेली होती. लहान मुलांची नृत्यकुशलता ही कालोच्यातल्या गावकऱ्यांच्या अभिमानाची गोष्ट आहे. इथेही परंपरा आहे. त्या मुलांनी युरोपमधल्या मोठमोठ्या शहरांतल्या रंगमंचावर आपल्या नृत्यकलेचे कार्यक्रम करून प्रेक्षकांना मंत्रमुग्ध केलं आहे !

एखाद्या गावाला कशा कोण जाणे पण कलेच्या सुंदर परंपराच लाभतात. काही अशी गावे असतात की, तिथे साधा देवळातल्या भजनाचा मृदुंग देखील नसतो. कालोच्यातल्या शाळेतला तो नृत्याचा कार्यक्रम संपल्यावर रंगमंचावर व्हायलीनची साथ करणारी रूपवती आम्हाला भेटायला आली. माझ्या पत्नीने तिच्या पोशाखावरची कला-कुसर न्याहाळून पाहिल्यावर इतर सात-आठ स्त्रिया जमल्या. ' कशिदा ' ह्या विषयातले तांत्रिक शब्द ॲण्ड्रूला त्याच्या इंग्रजीच्या मास्तरांनी शिकवले नव्हते. मग त्या बायकांनी कागदाचे एक छोटेसे पॅड मिळवले. आणि हा हा म्हणता नाना तऱ्हेच्या वेलबुट्ट्या काढून दाखवल्या. पूर्वी आपल्याही घरातल्या बायका सुरेख कशिदा काढायच्या. भरतकामाचे क्लास सुरू झाल्यापासून त्या कशिदाकामाचे नमुने न दिसता फ्रेममध्ये घातलेली प्रमाणपत्रे भिंतीवर दिसायला लागली. हंगेरीतल्या बायकांची जुनी खोड टिकून असावी. शिवाय इथल्या बायका ' को-ऑपरेटिव्हज् '-मध्ये आपली कलाकुसर पाठवून चार पैसेही गाठीला लावतात. ग्रामीण हंगेरीत घरांच्या भिंतीवर, म्हणजे पार छतापर्यंत रंगीबेरंगी वेलबुट्टी काढण्याचे कामही बायकाच हौसेने करतात. एकदा रंगारीबुवांनी पांढऱ्या किंवा इतर कुठल्यातरी फिक्कट रंगाने भिंती रंगवल्या की बायका चक्क दोन उंच स्टूलांवर फळी टाकून छताजवळ भिंतीच्या किनारी नाना

प्रकारच्या वेलबुट्ट्यांनी रंगवतात. आणि विशेष म्हणजे त्या वेलबुट्ट्या रंगवणाऱ्या बायका कोपऱ्यात ती किती साली रंगवली ते साल आणि जे काही मार्गारेट काकू किंवा मेरीमावशी वगैरे असेल ते आपले नावही लिहितात. मग लेकीसुनादेखील 'ही वेलबुट्टी आमच्या आजेसासूबाईंच्या हातची बरं का.' 'अहो द्राक्षांचे घोस काढण्यात आमच्या कॅथरीनकाकूंचा हात धरणारी बाई उभ्या कालोच्यात नव्हती.' असली कौतुके देखील *सांगतात. एक काळ तर असा होता की इथल्या* शेतकऱ्याची श्रीमंती शेतकरीणबाईकडे कशिद्याचे काम केलेल्या ब्लाउजच्या बाह्या किती आहेत यावर मोजली जात असे. ब्लाउज नेहमीच पांढऱ्याशुभ्र कापडाचे, चापाच्या बटणांनी त्याच्यावर बाही बसवतात. प्रत्येक बाहीवर स्वतंत्र कलाकुसर. ह्या बाह्यात्कारी श्रीमंती-प्रमाणे, बायकांनी वापरायच्या, वेलबुट्टीदार, जाळीदार डझनावारी टोप्या करायच्या आणि उशांचे अभ्रे कलाकुसरीने भरून छतापर्यंत त्या उशा रचवून ठेवायच्या – हेही एक श्रीमंतीचे प्रदर्शन असे!

आता असली कलाकुसर देशोदेशींच्या प्रवाश्यांनी विकत नेण्यासाठी होते. डोळ्यांना सतत काहीतरी निराळे पाहायला हवे असते. सगळ्या फॅशनचा जन्म याच प्रवृत्तीतून होतो. शिवाय बाहेर बर्फ पडायला लागले की शेतीची कामे नसतात मग घरी बसल्या बसल्या हे सुंदर उद्योग करायचे. मेंढपाळ देखील एकदा मेंढरे चरायला सोडली की झाडाखाली बसल्याबसल्या लाकडावर, काठ्यांवर, सुरेख कोरीव काम करीत बसायचे. असल्या धनगरदादांनी कोरलेल्या काठ्या, बाक्से, बासऱ्या ह्या वस्तू देखील कालोच्याच्या म्यूझियममध्ये आहेत. हंगेरीत जवळजवळ प्रत्येक गावात म्यूझियम आहेच. वास्तविक आपल्याही देशात हवीत. गेल्या शंभर वर्षांत आपलीही गावे, माणसांच्या पोशाखाच्या तऱ्हा वगैरे खूप बदलल्या. प्रपंचाला लागणाऱ्या कितीतरी जुन्या वस्तूंच्या जागी नव्या वस्तू आल्या. हळूहळू जाते, सूप, रोवळी, विळी, चूल *यासारख्या वस्तू इतिहासजमा होतील. ह्या वस्तू फार देखण्या होत्या* किंवा त्या आता नाहीशा होत चालल्यामुळे देशाचे वाटोळे होणार आहे

असे नाही. पण एखादे पितळेचे धंबाळ, पुणेरी पगडी-जोडा, मावळी पागोटे, तट्टावरचे खोगीर— असल्या वस्तू खूप काही सांगून जातात. अर्थात् असल्या वस्तूप्रमाणे भेसळ नसलेले तूप, अरगट नसलेली बाजरी कचरा न मिसळलेले तांदूळ ह्या वस्तूही आता म्यूझियममध्येच मांडून ठेवायला हव्यात.

दुपारचे जेवण झाल्यावर जवळच्या एका खेड्यात आणखी एक लोकनृत्याचा कार्यक्रम पाहायला जायचे ठरले आहे असे कळले. सकाळचे ते चिमण्या पऱ्यांचे नृत्य डोळ्यांपुढून हलायला तयार नव्हते. तेवढ्यात पाऊसही सुरू झाला. पण काउन्सिलरसाहेब म्हणाले— सकाळच्या नृत्यासारखे हे नृत्य देखील तुम्ही विसरणार नाही कधी.... निमूटपणाने निघालो. मुख्य रस्ता डावलून आम्ही त्या खेड्याच्या दिशेला लागलो तेव्हा मला तर थेट पेठ नाक्यावरून इस्लामपुराच्या दिशेला जातोय असे वाटले. मग ते चिमुकले खेडे लागले. त्या गावातले सांस्कृतिक केंद्र सापडले. शंभर उंबऱ्यांचे गाव असावे. पण सामोरे आले त्यात साठीच्या आतला एकही बाबा नव्हता की आवा नव्हती. मात्र सगळे कसे कुणाचे तरी लगीन काढल्यासारखे नटलेले !

केन्द्राची इमारत आपल्याकडे टुमदार डाकबंगले असतात तशी. पण आत शिरल्यावर प्रथम दर्शन झाले ते कॉफी आणि बिअर बारचे. बरीचशी वृद्ध मंडळी आरामात पीत बसली होती. सोबत काहीजणांच्या कारभारणीही होत्या. ( बहुधा ' आता आवरा ! ' म्हणायला ) मोटारी-पाशी आमच्या स्वागताला पाचसात आजीबाई आणि दोनतीन आजोबा. त्यातल्या एका आजीबाईंनी आमच्या हाती एक झकास फुलांचा तुरा दिला आणि तिथल्या तिथे स्वागतपर भाषण ठोकले. त्या चाळीसपन्नास वाक्यांचा अर्थ ॲण्ड्र्यूने तुम्ही आल्यामुळे आम्हाला खूप आनंद झाला, एवढ्या एका वाक्यात गुंडाळला.

सकाळी प्राथमिक शाळेत होते तसलेच सभागृह होते. पण कार्यक्रम स्टेजवर न होता सभागृहातच होणार होता. भिंतीपाशी खुर्च्या मांडल्या

होत्या. काही वेळाने प्रवेशद्वारातून वाद्ये वाजवणारे तीन–चार वृद्ध वादक आले. त्यांनी सूरलय पकडली आणि त्या दरवाजातून एकामागून एक अशी एकेका नर्तकीने एंट्री घेतली. पंधरा–सोळा नर्तिका आणि तितकेच नर्तक ! त्यातल्या सगळ्यात तरुण नर्तकीचे साठावे वरीस नुकतेच सरले होते आणि सगळ्यात ' अणभवी ' नर्तिका पंच्याऐंशीच्या उंबऱ्यावर उभी होती. तिच्या तोंडावर वर्षागणिक एक अशी सुरकुती होती. तिच्या झग्यावरच्या जाळीकामापेक्षा चेहऱ्यावरचे जाळीकाम अधिक आकर्षक होते. पण त्या जाळीतून नीलमण्यांच्या खड्यासारखे लुकलुकणारे डोळे मात्र सोळाव्या वर्षातल्या भूलीला विसरले नव्हते. सकाळच्या बालनृत्याच्या दुसऱ्या टोकाला असलेले हे वृद्ध–नृत्य पाहायचे हा एक अजब अनुभव होता. ही काही व्यावसायिक नर्तक मंडळी नव्हेत. पण सगळ्या आजीबाया कशा नटूनथटून आल्या होत्या. नाचातला जोष वयाची मोजदाद विसरायला लावणारा होता. हंगेरीय लोकनृत्यात नाच रंगात आला की नाचणाऱ्या स्त्रिया उत्साहाच्या भरात एक मजेदार चीत्कार करतात. ही वृद्ध मंडळी – अतिशय तन्मयतेने ते लोकनृत्य करीत होती. साठी सत्तरीतले ते जोडीदार आणि त्या जोडीदारणी ! किती कडू-गोड आठवणींची पाखरे त्यांच्या मनातून भिरभिरत असतील ते कुणी सांगावे. सकाळी त्या चिमण्यांचा नाच पाहिला. ती मुलेच नाच होऊन गेली होती. रंगीबेरंगी परांच्या पाखरांच्या थव्यासारखी आली आणि तशीच भुर्रकन् गेली. इथे हे वार्धक्य नाचातला फेर धरून घुमता घुमता किती वर्षे मागे जात होते ते कोणाला कळणार ! त्या नाचातला एक प्रकार मात्र मनाला चटका लावून गेला. वधूच्या पाठवणीच्या वेळचे ते लोकनृत्य सुरू झाले. त्या नाचात वधू झालेली बाई मात्र चाळिशीतली होती. ठेंगणी ठुसकी पण देखणी. डोळेभर पापण्या होत्या. चेहऱ्यावर लज्जेचा भाव होता. चार मुलांच्या आईने वधू म्हणून उभं राहताना वाटणारा संकोचही लपत नव्हता. वाद्य संगीत सुरू झाले. वर्षानुवर्षे त्या गावातल्या लग्नात वाजलेली सुरावट आणि ते पाठवणीचे गाणे माहेर सोडून वधू दिल्या घरी जायला

निघाली की शेवटी आईचा निरोप घ्यायला येते. तिच्यासाठी आईने जो तळहाताचा पाळणा आणि डोळियाचा दिवा केलेला असतो त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करायचं ते गाणं पण हे गाणं म्हणायचं असतं मात्र नवरदेवाने एक बुड्ढेबाबा लुटुपुटीचे नवरदेव झाले. "तुमची लाडकी लेक म्हणतेय्, की – " हे ध्रुवपद. मग आई तू मला कसं वाढवलंस्, किती जपलंस, कसं न्हाऊमाखू घातलंस .... हे सारं पुढे त्या गाण्यातून येते. ॲण्ड्रूने त्या गाण्याचा भावार्थ सांगितला. थेट आपल्याकडच्या जुन्या पाठवणींच्या गाण्यासारखंच गाणं. क्षणभरात त्या सभागृहाला पुणेरी मंगलकार्यालयाचं रूप आलं. त्या म्हाताऱ्या ह्या नाचातल्या वधूकडे देखील अशा मायेने आणि थबथबल्या डोळ्यांनी पाहायला लागल्या की ते नृत्य नसून खरोखरीची पाठवणी सुरू झाली की काय असे वाटायला लागले. नृत्य संपले. मग गॅदरिंगमधल्या प्रमुख पाव्हण्यांच्या भोवती स्वाक्षरीसाठी पोरं जमतात तसा तो वृद्धांचा मेळावा आमच्याभोवती जमला. माझ्या पत्नीने त्या पंच्याऐंशी वर्षांच्या पणजीबाईंना विचारले, 'हे गाणं तुमच्या लग्नात म्हटलं होतं का?' ॲण्ड्रूने त्या प्रश्नाला हंगेरीय भाषेतून ओतून काढल्याबरोबर त्या वृद्ध डोळ्यातले ते निळे मणी चमचमले. म्हातारी पुढे आली नि म्हणाली, "हे जाकीटदेखील त्या दिवशी मी घातलं होतं! – " त्या जाकिटावर सुंदर कलाकुसर होती. पासष्ट-सत्तर वर्षांपूर्वीचे ते जाकीट कसे काल शिवल्यासारखे वाटत होते. तिच्या आईच्या कुशल बोटांनी केलेली ती कुसर होती. मग जी ती म्हातारी आपल्या झग्यांचे, टोप्यांचे, जाकिटाचे वय सांगायला लागली. तुमच्या देशात लग्नात गाणी कुठली म्हणतात – नाच कसे असतात – पोशाख काय – नाना तऱ्हेचे प्रश्न विचारायला सुरुवात झाली आणि आला आहात तर राहून जा हा आग्रह! – भाषांतर करताना ॲण्ड्रूची त्रेधा उडत होती. त्या वेळी मात्र मला हंगेरीय भाषा येत नसल्याचे खरे दुःख झाले. नाहीतर मी सांगणार होतो त्यांना – "मावश्यांनो भाग्यवान् आहात' अशा ह्या उतरल्या वयात तुमची नाचायची हौस टिकून आहे. किती लढाया – किती वंडाळ्या पाहिल्या

असतील तुम्ही – गावं बेचिराख झालेली बघावी लागली तुम्हाला – ह्या साऱ्यातून तुमचा नाच आणि गाणी टिकवून धरलीत .... ह्या दुनियेत माणसांच्या गळ्यातलं गाणं आणि पावलातला नाच जर असा सदैव टिकून राहील तर किती चांगलं होईल ! ...."

परतीच्या वाटेवर माझ्या डोक्यात एक प्रश्न आला — 'सकाळी शाळकरी पोरींचा नाच पाहिला .... संध्याकाळी ह्या आजोबा–आजी-बाईंचा नाच पाहिला — पण ह्या देशातल्या तरुणांचा ह्या परंपरेशी संबंध आहे की तुटला ?' — ह्या प्रश्नाचं उत्तर त्याच रात्री मला मिळालं.

संध्याकाळी बूडापेष्टला परतल्यावर पुन्हा थिएटरात जाऊन लोक-नृत्याचा कार्यक्रम पाहणे जिवावर आले होते ! पण तिथे आमच्या खुर्च्या राखून ठेवल्या होत्या. आणि खुर्च्या राखलेल्या असूनही आयत्या वेळी न येणाऱ्या पाव्हण्याबद्दल नाटकवाल्यांना काय वाटते याचा आम्हाला अनुभव असल्यामुळे आम्ही थकव्याकडे दुर्लक्ष करून थिएटर गाठले ! बघतो तर तिथे तरुण–तरुणींची ही झिम्मड उडालेली. थट्टा विनोद चालले होते. नसता संकोच नव्हता की अधिक आखडणे नव्हते. जे सौंदर्य होते ते मुद्दाम खुलवून दाखवण्याची गरज नव्हती. मोकळ्या केसांइतकेच ते मुक्त होते. पण त्या मुक्तपणात असभ्य ओंगळपणाचा लवलेश नव्हता. किंबहुना मला हंगेरीत असली हिप्पी छाप उदासीनता, भकासपणा–ओंगळपणा कधीच दिसला नाही. मी तो उत्साह पाहून अॅण्ड्र्यूला म्हणालो, "लोकनृत्याच्या कार्यक्रमाला तुमच्या-कडे भलताच मोठा प्रतिसाद दिसतोय !"

"प्रतिसाद असतो — पण आजचा हा खास कार्यक्रम आहे. आमच्याकडे दरवर्षी हंगेरीतल्या यूथ सेंटर्सच्या लोकनृत्याच्या चढाओढी होतात — त्यातल्या नऊ उत्कृष्ट ठरलेल्या संघांचे आज कार्यक्रम होणार आहेत ! — म्हणून तर एवढा उत्साह !"

त्या नऊ नृत्यवृंदांनी जुन्या लोकनृत्यांचे नुसते पुनरुज्जीवनच केले नव्हते तर काहींनी त्यांच्यावर अत्याधुनिक साजही चढवला होता. पण

लोकनृत्याचे तत्त्व सोडले नव्हते. बुटांच्या गुडघ्यापर्यंत येणाऱ्या कातड्या-वर हाताने तडातड चापट्या मारून तबल्याच्या तुकड्यासारखे तिहाई घेऊन समेवर येणे, हे हंगेरीतल्या लोकनृत्यातले एक सतत जाणवणारे वैशिष्ट्य! एका नृत्यात मी सनईसारखे वाद्य ऐकले. दिसायला थेट सनई. हंगेरीय भाषेत त्याला सूर्ना म्हणतात. त्यावरची धूनही भारतीय संगीताची आठवण करून देणारी होती. प्रेक्षागारातल्या तरुण-तरुणी त्या निरनिराळ्या वृंदाना मोठ्या जाणकारीने दाद देत होते. नर्तकांचा जोष विलक्षण होता. पण डिस्कोथेक्समधल्या त्या अंगात आल्यासारख्या नाचण्याचा प्रकार नव्हता. इथे एकतानता होती. कैफ नव्हता. अमेरिकन् डिस्कोथेक्समध्ये मला वासनांचे ड्रेनेज् फुटल्यासारखे वाटले होते. इथे सुंदर कारंजी थुयथुयत होती. आणि हे सर्व नर्तक-नर्तिका अव्यावसायिक होत्या. उसळत्या तारुण्याला हंगेरीतल्या सांस्कृतिक विकासाची चिंता करणारांनी किती सुंदर पाट काढून दिले आहेत त्याचे दर्शन ह्या नृत्याच्या कार्यक्रमातून झाले!

समाजाचे दर्शन हे अशा रीतीने निरनिराळ्या कलांचा विकास करण्याच्या प्रयत्नातून तर होतेच, पण अगदी लहानसहान गोष्टींतूनही आढळते. बूडापेष्ट हे कुठल्याही युरोपीय राजधानीसारखे मोठे शहर. हल्ली मोठी शहरे फार धोक्याची झाली आहेत. विशेषत: अमली पदार्थांची व्यसने लागलेल्या तरुण मुलांच्या टोळ्या मी युरोप-अमेरिकेतल्या शहरांत नाक्यानाक्यावर पाहिल्या आहेत. मला हे दृश्य बूडापेष्टमध्ये दिसले नाही. रात्री नाटक सुटले की टॅक्सी शोधत थोडा वेळ हिंडावे लागे. थेटरांच्या मोहल्ल्यात आडोशाला उभे राहून गिऱ्हाइके गटवणाऱ्या वेश्या दिसल्या नाहीत. इतकेच नव्हे तर नाटक संपल्यावर मध्यरात्री चालत चालत निघालेली कितीतरी माणसे भेटत. हंगेरीत सगळेच सज्जन नसतीलही. तसे कुठेच नसतात. पण बूडापेष्टच्या रस्त्यांतून आम्ही रात्री अपरात्री काही कमी हिंडलो नाही. असभ्य, अवाच्य असे वर्तन आमच्या तरी दृष्टीला पडले नाही. रस्त्यात नवख्या माणसाला धरून लुबाडणे वगैरे तर दूरच राहिले.

हंगेरीय खेडयातल्या माणसांचे अगत्य तर अतिशय लोभसवाणे. 'पेच्य्' नावाच्या गावाला आम्ही जायला निघालो होतो. आमच्याबरोबर कमलादेवी चट्टोपाध्यायही होत्या. त्यांचाही मुक्काम हंगेरीतच होता. त्यांचा आणि माझा पूर्वपरिचय होता. आधुनिक रंगभूमीच्या विकासासाठी त्यांनी केलेल्या धडपडीची फार थोडया लोकांना माहिती आहे. आपल्या देशातल्या कलाकुसरीच्या उद्योगांना तर त्यांनी पुनर्जन्म दिला आहे. त्या दुसऱ्या एका हॉटेलात उतरल्या होत्या. तिथून त्यांना घ्यायचे होते. हॉटेलच्या दारातच आमची प्रतीक्षा करीत त्या उभ्या होत्या. आज आमच्या बरोबर त्यांची इंटरप्रीटरबाई येणार होती. तिचे नाव ज्यूडिथ. मी मोटारीतून उतरून कमलादेवींना अभिवादन केले. त्यांनी चक्क मराठीत मला विचारलं,

"काय कसा काय चाललाय तुमचा इथला कार्यक्रम?" कमलादेवींची मातृभाषा कोकणी आहे हे मला ठाऊक होते. पण त्या इतके अस्खलित मराठी बोलतात याची कल्पना नव्हती. इतकी वर्षं उगीचच मी त्यांच्याशी इंग्रजी बोलत आलो होतो! कमलादेवी म्हणजे अत्यंत सुसंपन्न व्यक्तिमत्त्व. सत्तरीच्या वयात देखील त्यांचा जग हिंडून नवीन नवीन गोष्टी पाहण्याचा उत्साह कायम आहे. दोन दिवस कमलादेवींच्या सहवासात घालवायला मिळणार याचा आनंद वाटत होता.

'पेच्य्'चे वर्णन ऐकल्यावर पेच्य् हे हंगेरीचे 'पुणे' असावे हे ध्यानात आले. माणसागणिक एक अशा हिशेबात पुण्यासारख्या इथेही संस्था असाव्यात. उणेपुरे दीड लाख वस्तीचे हे गाव. म्हणजे दुसऱ्या महायुद्धापूर्वीच्या पुण्याएवढेच. आणि पुण्याप्रमाणेच उशापायथ्याला डोंगर-टेकडया घेऊन वसलेले. बाहेरच्या लोकांचे सुट्टीत यायचे गाव आणि गावच्या लोकांचे जगाच्या उचापती करण्याचे! गावाच्या मध्यावर गाझी कासीम पाशा नावाच्या एके काळच्या तुर्की सत्ताधाऱ्याची भव्य मशीद! कासीम पाशाला गाशा गुंडाळायला लावल्यावर त्या इमारतीचे चर्च झाले. सभोवताली जुनेच पण घासूनपुसून लख्ख ठेवलेले वाडे. सारे गाव एकमजली उंचीचे! म्हणजे सायकलवरचे एक पाऊल

पायरीला लावून वरच्या मजल्यावरच्या बंडयाशी गप्पा मारीत उभे राहता यायला हवे! जुन्या काळी घोडयावरचा शिलेदार घोडयावर बसल्या बसल्या बाल्कनीच्या कठडयावर रेलून उभ्या असलेल्या सुंदरीच्या हाताचे चुंबन घेत असला पाहिजे. ह्या एवढ्याशा गावात सुसज्ज नाट्यगृह. शेपन्नास वर्षांपूर्वीचे.

कमलादेवींना हंगेरीतल्या विणकरांची कला पाहायची होती. आम्ही ते खेडे शोधीत निघालो. ज्यूडिथबाई ह्या तरबेज दुभाषीच नव्हे तर चौभाषी होत्या. साठी जवळ आल्या होत्या. पण चाळिशीत असल्याचा आव आणायच्या. देशोदेशींच्या पाव्हण्यांना घेऊन हंगेरी दाखविली होती. त्यांनी आम्हाला एका शेतकऱ्याच्या घरापुढे आणून उभे केले. पावसाने अंगणात चिखल केला होता. समोरच गोठा. अंगणात कोंबड्या. सारे काही यथासांग होते.

ज्यूडिथबाईंनी आमची ओळख करून देण्यात शेदीडशे हंगेरीय वाक्ये खर्ची घातली.

'या बसा' झाले. चौकोनी घरकुल होते. बाहेरची एक चांगली दोन अडीच खणी खोली. तोच दिवाणखाना. तिथे टी. व्ही. होता. पलंगही होता. एका बाजूला विजेच्या चुली. कोपऱ्यात लाकडी ओंडका घालून पेटवलेली 'फायर प्लेस'. ती चूल दगडी विटांची होती. शेतकरी-दादांनी माझे कुडकुडणे पाहून चुलीत आणखी एक ओंडका टाकून ताव वाढवला. आतली झोपायची खोली. तिथेच हातमाग होता. नाना प्रकारच्या संसारोपयोगी जिनसा तिथे गचडीगचडीने मांडल्या होत्या. शेतकरीदादाची लाडकी लेक, त्या वयाच्या पोरी चारचौघापुढे घरकामात मदत केल्याचे दाखवतात तशी उगीच इकडली वस्तू तिकडे ठेव करीत मधेमधे लुडबुडत होती. पण नाव सांग म्हटल्यावर लाजायची ती लाजलीच!

कमलादेवी ते विणलेल्या कापडाचे नमुने जाणकारीने पाहात होत्या. इथल्या सहकारी सोसायट्यांतून, मागावर विणता येणाऱ्या बायकांना सूत देतात. डिझाइन देतात. मग त्या कापड विणून देतात. त्यांना

त्रिगगावळ मिळते. मी मनात म्हणत होतो, खादीग्रामोद्योगाची कल्पना तरी निराळी काय होती? पण ती योजना राबवणाऱ्या मंडळींचे हात स्वार्थाने बरबटले आणि चांगल्या योजनेचा बट्ट्याबोळ झाला. हंगेरीत तसे घडत नसावे. कारण शेतकऱ्याची कारभारीण आणि ते सारे कुटुंब प्रसन्न वाटत होते. काहीतरी मीही विचारायला हवे म्हणून मी शेतकरीणबाईंना म्हणालो,

"हातमाग चालवायला शिकवलं कोणी?"

"माझ्या आईने! हा माग देखील माझ्या आईचा. विणण्याच्या कामात माझ्या आईचा हात धरणारी दुसरी बाई नाही आमच्या गावात!" पोरीच्या कौतिकाने म्हातारी लाजली. दुर्दैवाने बिचारीचा हात त्या वेळी प्लॅस्टरमध्ये होता. निरोप घेताना मी म्हातारीला म्हणालो, "*पुढल्या खेपेला येईन तेव्हा तुम्ही कसं विणता ते बघायला मिळायला हवं* — लवकर हात बरा करून घ्या—"

आता आम्ही भूदान मागायला निघाल्यासारखे एक एक खेडे पालथे घालीत निघालो होतो. करता करता रात्रीचे साडेसात वाजले. मिट्ट काळोख! ज्यूडिथबाई म्हणाली, "ह्या खेड्यातलं म्यूझियम् पाहण्यासारखं आहे." संध्याकाळचे साडेसात ही काही म्यूझियम् पाहायची वेळ नव्हे. त्यापेक्षा खेड्यातला मयखाना पाहण्यासारखा आहे म्हणाली असती तर ते साजून दिसलं असतं. आम्ही त्या खेड्यात शिरलो. कुठे काही मनुष्यप्राण्याचा सुगावा लागत नव्हता. कुत्रंसुद्धा भुंकत नव्हतं. आपल्या देशात कुठल्याही खेड्यात प्रवेश केला की स्वागतपर पद्य *म्हणायची वतनदारी बेवारशी कुत्री आज वर्षानुवर्षे सांभाळीत आली* आहेत! इथे सगळी कुत्री मालकांच्या घरातच राहतात. तंगडी वर करायला देखील बाथरूममध्ये जात असतील. सकाळी कोंबड्याचे आरवणे आणि रात्रभर कुत्र्यांचे भुंकणे हे ग्रामीण वातावरणाचे व्यवच्छेदक लक्षण आहे. एका टुमदार चर्चपाशी आमची गाडी थांबली. म्यूझियम् तिथेच होते पण बंद! रोज सकाळपासून रात्रीपर्यंत उघडे ठेवायला ते म्यूझियम् म्हणजे मारुतीचे देऊळ नव्हते. मी म्हटले,

'चला सुटलो.' दहा मैल चालून तुटणार नाहीत इतक्या एक म्यूझियम् पाहताना तंगड्या तुटतात. पण ज्यूडिथबाईंचा उत्साह दांडगा. तिने आम्हाला तिथेच थांबवले आणि गावच्या पाटलाच्या शोधात निघाली. थंडीचाही जोर होता. अंधारात आम्हाला हंगेरीय वाक्यांची उधळपट्टी ऐकू आली. एका म्हातारबुवांना घेऊन ज्यूडिथ आली. म्हाताऱ्याने अंधारातच कुलूप उघडून बत्ती लावली. मग ज्यूडिथने त्यांची आमची ओळख करून दिली. ते त्या गावचे सरपंच. सारे गाव त्यांना अंकल नेम्या म्हणते. म्हणजे चक्क नेम्याकाका. गावकऱ्यांच्या कलाकौशल्याचे ते म्यूझियम् होते. पण नेम्याकाका ही वल्ली महाराष्ट्रातल्या कुठल्याही पिंपळाच्या पारावर अड्डा जमवू शकणाऱ्या गावकाकांत चपखल बसली असती. म्यूझियम्‌मध्ये त्या गावाचा जुना इतिहास, जुने दस्तऐवज, पूर्वीच्या हिशेबाच्या वह्या, एखादे महत्त्वाचे पत्र, जुन्या पद्धतीच्या लग्नातले फोटो, गावातल्या एखाद्या पोराने कुठल्यातरी क्षेत्रात 'ऑल हंगेरीत' प्रसिद्धी मिळवली असली तर त्याचे बालपणचे फोटो, वर्तमान-पत्रात त्याच्याविषयी आलेले कौतुक.... असल्या वस्तू होत्या. हे थंडगार म्यूझियम् नव्हते. त्या वस्तूंना मायेचा स्पर्श घडला होता. नशीब काढायला गावकरी कुठे का जाईना, मायेचा एक धागा त्याच्या गावाने ताणून धरला आहे. नेम्याकाकाला सगळ्यांची वंशावळ पाठ होती. कितीतरी कथा त्याला सांगायच्या होत्या. हजार वस्तीचे खेडे. पण नेम्याकाका म्हणत होता – 'काय राव, तासात काय बघून होणार आमचं गाव. चार दिवस राहिला असतात तर लय् गमती सांगितल्या असत्या....' हंगेरीय भाषेत, डोळे मिचकावीत, माझ्या पाठीवर थापबीप मारीत नेम्याकाका हे बोलत होता आणि ज्यूडिथबाई 'खालील वाक्यांचे भाषांतर करा' च्या थाटात त्याचा तर्जुमा सांगत होती. पण त्या तर्जुम्यात हळूच मिचकवलेले डोळे, पाठीवरची थाप, हे कुठून येणार?

त्या रात्री आमचा मुक्काम एका किल्ल्यात होता. युरोपीय लोकांना 'कॅसल्स्'चे फार प्रेम सध्या ह्या कॅसलचे हॉटेल केले होते. तिथे पोहोचायला रात्रीचे नऊ वाजले. पाऊसही आता आलापीतून जोरदार

तानबाजीत शिरला होता. आम्ही गडावर पोहोचलो. आमच्या खोल्या दुसऱ्या मजल्यावर आहेत हे कळले. प्रत्येक मजल्यावर एकेकाळी घोड्यावर बसूनच चढत असावेत. खोलीत पोहोचेपर्यंत माझ्या पोटऱ्यात गोळे आले होते. जेवणाची सोय तळघरात आहे हे कळल्यावर मी उपवास जाहीर केला. अंगावरचे खोगीर उतरले. आणि बिछान्यावर आडवा झालो.

सकाळी जाग आल्यावर पहिल्यांदा खिडकीचा पडदा बाजूला करून हवामानाचा अंदाज घेतला. घटकाभर पन्हाळ्याला आलो की काय असे वाटले. रात्रीच्या अंधारात मोटार आम्हाला इतक्या उंचावर घेऊन आली असेल ही कल्पना नव्हती. कुठल्याही डोंगरमाथ्यावरून सभोवतालचा भूप्रदेश दिसतो तसाच हाही होता. पण हंगेरीत सहकारी शेती असल्यामुळे शेतांची शंकरपाळी न दिसता झाडांचे ठिपके घातलेला अखंड हिरवा गालिचा पसरल्यासारखे वाटत होते. पाऊस थांबला होता. सूर्याने रविवारची हक्काची सुटी घेतली होती. आकाश ढगाळ होते.

कालपासून ज्यूडिथबाईंचे व्हिलेज बझार, व्हिलेज बझार चालले होते. जवळपासच्या खेड्यात रविवारी आठवड्याचा बाजार भरतो. मला जत्रा आणि बाजार फार प्रिय. वाढत्या वयाबरोबरही न कमी झालेल्या माझ्या तीन आवडी. जत्रा, आठवड्याचा बाजार आणि सर्कस ! हल्ली तीन्ही दुर्मिळ झाल्या आहेत. रंगू बाजारला जाते जाऊ द्या – म्हणत त्या बाजाराच्या गावाकडे निघालो. पावसाने बाजाराची मजा घालवली होती. तरीही आपल्याकडल्या आडगावच्या बाजारासारखाच बाजार होता. तशीच पाले लागलेली. आणि विशेष आनंदाची गोष्ट म्हणजे तसाच चिखल. शेतकरीही पोराला खांद्यावर बसवून चालणारे. फक्त सुटाबुटातले, एवढाच फरक ! आणि माश्या नव्हत्या. थंडीत माशीचे पंख काकडत असावे. बाकी संसारोपयोगी वस्तूंची दुकाने, जवळपासच्या कुंभारदादांनी आणलेली चिनी मातीची भांडी, स्वेटर-गंजीफ्राकवाल्यांची पाले, त्यातच एक हॅटवालासुद्धा होता. शिवाय मळ्यातली ताजी भाजी, अंडी-बिंडी सगळे होते. भाषा आणि हंगेरीय वेषभूषा वगळली तर मौजे घोडेगाव

किंवा बाजार भोगाव! फक्त एकच नव्हते म्हणजे पैशाची घासाघीस. फिक्स रेट! हंगेरीत प्रत्येक वस्तूच्या पाकिटावर, डब्यावर, बाटलीवर किमतीचे लेबल असावेच लागते! पण मग परतीच्या वाटेवर शेतकरी मंडळींचे संवाद काय होत असतील? आमच्याकडे बाजार संपवून परतताना ऐकण्यासारखे संवाद असतात. "केवढ्याला बसली धोतर-जोडी?" – मग किंमत ऐकल्यावर "आमच्याकडनं पावणेचार रुपाय् ज्यादा उपटले की फोकलीच्यानं – आयला त्या शिंध्याच्या —" असले खमंग ड्वायलाग चालतात. इथेही काहीतरी असे असणार. अपरिचित भाषेच्या मुलखात हे भाषेच्या अज्ञानाने आलेले बहिरेपण फार ताप-दायक होते. ज्यूडियआक्का इंग्रजी तर्जुम्यात काय काय म्हणून बसवणार?

आता पुन्हा एकदा पेच्यू ओलांडून आणखी एका खेड्यातले कुंभारकाम बघायला जायचे होते. आम्ही बाजार आटपून पेच्यला पोहोचलो त्या वेळी दुपार झाली होती. पुन्हा एकदा गुय्याश सूप ओरपले. आणि हंगेरीतला तो कुंभार ज्या खेडयात राह्यचा ते शोधीत निघालो. पेच्यू सोडता सोडता पोलीसवाल्यांनी गाडी थांबवली! टॅक्सी ड्रायव्हरही बुचकळ्यात पडला. माझ्या पोटात गोळा. उगीचच आपल्याला प्रतिक्रांतिवादी वगैरे समजले तर काय घ्या! बरे एक नाही चांगले दोन तरणेबांड ऑफिसर. एक तर थेट तरुणपणीच्या फ्रेडरिक मार्चसारखा दिसत होता. त्याने आम्हाला झकास सलाम ठोकला. ड्रायव्हरकडून लायसेन्सही 'जरा काडयाची पेटी देता काहो?' म्हणावे तशा सुरात मागून घेतले. गावात ओव्हरटेक करायची परवानगी नव्हती. आमच्या ड्रायव्हरने चक्क पोलीसच्याच गाडीला ओव्हरटेक केले होते. बापरे! पण काही नाही. साहेबांनी ड्रायव्हरसाहेबाच्या लायसन्सवरचे नाव गाव नंबर टिपून घेतले. पुन्हा सलाम – आम्हाला एक आणि दुसरा ड्रा....य....व्ह....र....ला! ज्यूडियबाईकडे पाहून दोन-चार हंगेरीय वाक्ये! मी, 'म्हणजे काय?' अशी बाईकडे पाहून नेत्रपल्लवी केली. "तुमचा खोळंबा केल्याबद्दल फौजदारसाहेबांनी तुमची

क्षमा मागितली...." ज्यूडिथआक्कांनी तर्जुमा केला. पोलीसवाल्यांशी अशी गाठ पडल्यावर काय काय होते याचा मायदेशीचा अनुभव असल्यामुळे ह्या पेच्य्‌-प्रसंगातून इतक्या झटक्यात सुटका होईल हे स्वप्नातही आले नव्हते. माझ्या मनात टॅक्सीवाले आणि पोलीस या विषयावर आमच्या टॅक्सीवाल्याशी संवाद सुरू करावा असे फार होते. पुन्हा भाषेचा प्रश्न ! त्यामुळे 'तुमच्याकडे ट्रॅफिकवाल्यांचा हप्ता काय बसतो हो ?' हा प्रश्न मी गिळून टाकला.

पहाडी मुलखातून टॅक्सी चालली होती. थोडयाफार शोधाशोधीनंतर ते खेडे सापडले. किंचित् कोकणी खेडयासारखे. शेतकऱ्यांची टुमदार घरे. सफरचंदाची झाडे. त्यांच्यावर शेकडो सफरचंदांचे लालबुंद ठिपके. गावाच्या मधून एक चांगला पुष्ट ओढा वाहात होता. इंग्लंडमध्ये नदी म्हणून खपला असता. ओढ्याच्या अल्याड पल्याड गाव वसले होते. मधे दोन्ही तीर जोडणारा छोटा पूल. तेवढ्यात गावात पाहुणे मंडळी आल्याची वर्दी लागली. पाच-सात वडीलधाऱ्या मंडळींनी कोण-कुठले-काय चौकशी सुरू केली. त्यांच्यापैकी एकाने कुंभारदादांच्या घराकडे आम्हाला नेले. रस्त्यात खूप चिखल झाला होता. निसरडेही होते. तेवढ्यात माझ्या पत्नीच्या दृष्टीला सफरचंदांनी लदलेले झाड दिसले. आम्ही ज्यूडिथला म्हटले, 'भाव विचारा'! त्या माणसाने लगेच पाचसात सफरचंदे तोडून दिली आणि खेडयातल्या गुऱ्हाळावर रसाचे पैसे घेत नसतात ह्या चालीवर पैसे घ्यायचे नाकारले. त्या चिखलातून कमलादेवींना चालत येणं शक्य नव्हते. गाडी पुढे जाऊ शकत नव्हती.

कुंपणाचे फाटक बाजूला करून आम्ही आत शिरलो. गर्द झाडांच्या मध्ये कुंभारदादांची बुटकी बंगली लपली होती. बाहेर देशचे पाव्हणे आल्याची वर्दी तिथे पोचली होती. कुंपणापाशीच कुंभारीणबाई येऊन उभ्या होत्या. कुंभारदादा सुटीचा दिवस असल्यामुळे गावातच कुठेसे आपल्या मित्रमंडळींबरोबर चिलीम ओढायला गेले होते. त्यांना 'लवकर या' हा निरोपही गेला होता. तिकडे कमलादेवींना येता येत नाही हे पाहून कुंभारीणबाई घरात गेल्या आणि हातात बूट घेऊन तसल्या

चिखलातून धावत धावत त्यांच्यापाशी गेल्या. त्यांच्या चपला काढून आपल्या हातात घेतल्या. कमलादेवींना ते बूट चढवले आणि हळूहळू एक एक पाऊल टाकीत घरापर्यंत आणले. कुंभारीणबाईंची साठी उलटली होती. पण अतिशय चटपटीत. ब्रेश्तची मदर करेज आणि साने गुरुजींची श्यामची आई अशा मिश्र रसायनातून घडलेली बाई.

घरात शिरल्यावर अलीबाबाच्या गुहेत शिरल्याचे आश्चर्य मनातून प्रकटले. कुंभारदादांचे चिनी मातीच्या भांड्यांचे काम, त्यावरची रंगीत कलाकुसर, मातीला त्यांनी दिलेले ते नाना प्रकारचे आकार, हे पाहून आम्ही थक्क! तेवढ्यात कुंभारदादा आले. ठेंगणी मूर्ती. चेहऱ्याला सात्त्विक हास्याखेरीज दुसऱ्या भावांचा कधी स्पर्शच घडला नसावा अशी प्रसन्नता लाभलेली. कानाला ऐकण्याचे यंत्र लावले होते. बोंगेबाज विजार. त्यात शर्ट खोचला न खोचला अशी अवस्था. विजार उचलून धरणारे पट्टे खांद्यावरून ताणलेले. ओळख करून दिल्यावर माझ्याशी हस्तांदोलनाला हात पुढे केल्यावर मी जरा दचकलोच होतो. माती मळणारा हात माझ्या केवळ शाईने मळणाऱ्या हाताचा भुगा करील ही भीती!—पण त्या हातांनी मला फसवले. इतका रेशमी हात होता की त्या अकल्पित स्पर्शाने माझ्या शरीरावर काटा आला. हे हस्तांदोलन मी कधीही विसरणार नाही! सारे गाव कुंभारदादांना गेझाकाका म्हणते. आणि कुंभारीणबाईंना पोन्ना नेनी. नेनी म्हणजे आत्या-मावशी किंवा काकू! कारवारीतही नेनी हा शब्द अशाच संदर्भात वापरतात.

गेझाकाका हे मडकेवाले कुंभार नव्हते. पोर्सेलिनच्या कलाकृती करणारे कलावंत होते. तिथली प्रत्येक वस्तू लोककलेशी नाते सांगणारी होती. कुठलीही वस्तू उचलून 'सुंदर आहे' म्हटले की गेझाकाका म्हणायचे 'घेऊन जा!' तिकडे पोन्नानेनी चा पाण्याच्या तयारीला लागली होती. म्हातारीची कोण धांदल उडाली होती. भाषा कळत नव्हती. माझ्या पत्नीला जवळ घेऊन कुरवाळीत काहीतरी बोलली. ज्यूडिथआक्कांनी खुलासा केला. 'ती म्हणतेय की तिची मोठी मुलगी ह्याच वयाची आहे.' माझी पत्नी म्हणाली, 'तिला सांगा की माझी आई

देखील पोन्नानेनीच्याच वयाची आहे.' ज्यूडिथबाईंनी हे सांगितल्यावर पोन्नानेनीने आपल्या लेकीचा घ्यावा तसा ह्याही दूरदेशीच्या घटकाभरापूर्वी अज्ञात असलेल्या लेकीचा मुका घेतला. कमलादेवी मृत्तिकापात्र कलेतल्या जाणकार. गाण्याला दाद द्यावी तशा तिथल्या वस्तूंना दाद देत होत्या. मला त्यांतल्या कारागिरीच्या खाचाखोचा समजावून सांगत होत्या. कमलादेवी किती चांगल्या शिक्षिका आहेत याची मला त्या दिवशी प्रचीती आली! भारताचा सांस्कृतिक भूगोल तर त्यांना इंचाइंचांनी ठाऊक आहे. तेवढ्यात गेझाकाकांचे एक चांगले धिप्पाड वयस्कर मित्र आले. दणदणीत शेतकरी बाणाचा नमुना होता. त्यांनी गेझाकाकांना काहीतरी प्रश्न विचारला आणि तो ऐकून गेझाकाका लुटलुट करीत खोलीतून बाहेर गेले. आणि रेड वाईनची भक्कम सुरई घेऊन आले!

त्या चिमुकल्या गावाला गेझाकाकाचा कोण अभिमान! गावकऱ्यांनी गेझाकाकांच्या कलाकृतींचे गावात म्यूझियम् उभे केले आहे. ती वास्तू त्या भक्कम शेतकरी दादांची. गेझाकाकाच्या म्यूझियमला त्यांनी आपल्या वाड्यातली दालने दिली आहेत. "साहेब हे काय बघता? तिथली कारागिरी बघा न् मग बोला –" अशा थाटात ते आम्हाला काहीतरी सांगत होते. म्हातारा कुंभारदादा लाजून लाल होत होता. आम्ही निवडलेल्या वस्तूंची किंमत विचारली तर म्हातारा-म्हातारी पैशाची बात करायला तयार नाही. मग बळेबळे आग्रह करून त्या वस्तूंचे बाजारभाव सांगायला लावले. पोर्सेलिनच्या वस्तू वजनाला जड. आमचा विमान-प्रवास. त्यामुळे इच्छा आणि पैसे असूनही फार वस्तू घेणे शक्य नव्हते. तऱ्हेतऱ्हेच्या डिशेस् होत्या. फुलदाण्या होत्या. नुसत्याच आकृती होत्या. माझ्या मनात एक कोंबडा फार भरला होता. पण वजनात बसला नसता. त्या कोंबड्याची हौस पोन्नानेनीने कलाकुसर केलेल्या अंड्यावर भागवावी लागली. पोन्नानेनींनी रंगाकृतींच्या अनेक गमती करून अंडी सजवली होती. त्यांच्याही बोटात जादू आहे. मी म्हणालो, "तुम्हाला गेझाकाकांनी शिकवले का!"—तशी म्हातारी चुटकन् म्हणाली—

“ हे शिकवताहेत ! ह्याना असली कुसर नाही जमत ! ” सगळी मंडळी म्हातारीच्या त्या लाडिक फणकाऱ्याला मनापासून हसली. गेझाकाकांनी नुसत्या अभिनयाने, पाहिलंत कसं कडक काम आहे – असे सुचवीत माझा पेला पुन्हा भरला.

मी म्हणालो, “ पोन्नानेनी, गेझाकाकांच्या म्यूझियममध्ये तुमच्या हातच्या वस्तू आहेत की नाही ? ”

ह्या प्रश्नावर पोन्नानेनींने दिलेल्या उत्तराचे भाषांतर करताना ज्यूडिथ-आक्कादेखील गलबलल्या.

“ त्यांच्या म्यूझियममध्ये माझी कारागिरी ? छे छे .... अहो त्या म्यूझियमची मी झाडूवाली आहे. ” आणि खरोखरच ते म्यूझियम् पोन्नानेनी स्वत: झाडतात. सरकारातून त्याना दरमहा त्या कामाबद्दल पगार मिळतो. सरकारी दप्तरात पोन्नानेनींच्या नावाची नोंद त्या म्यूझियमची झाडूवाली अशीच आहे. एवढ्या मायेने ते म्यूझियम दुसरं कोण झाडून पुसून लख्ख ठेवणार ?

रात्रीचे आठ वाजत आले होते. बूडापेष्ट अजून शेसवाशे मैल दूर होते. आम्ही उठलो की म्हातारा ग्लासात द्राक्षासव ओतायचा. आणि खुणेने म्हणायचा एवढी संपवान् उठा. आम्ही विकत घेतलेल्या वस्तू पोन्नानेनींने बांधून दिल्या. माझ्या पत्नीने परदेशातल्या नवीन स्नेही-मंडळींना भेट म्हणून द्यायला काही वस्तू घेतल्या होत्या. त्यातच एक काश्मिरी कला कुसर केलेली कातडी थैली होती. त्या थैलीत त्या वस्तूंचे झालेले पैसे घातले आणि पोन्नानेनींच्या हाती ती थैली दिली. म्हातारीने ती थैली घेतली – भिंतीवर गेझाकाकाच्या हातची एक सुंदर डिश लावली होती, ती काढून ही थैली तिथे लावली आणि म्हणाली, “ माझ्या नातवांच्या नातवंडांपर्यंत सारी जणं ही थैली पाहतील .... ”

उशीर होत होता. तरी आम्ही त्या म्युझियममध्ये गेलो. तिथे गावातली आणखी पंचवीस तीस माणसं गोळा झाली होती. खरोखरीच तिथली एक एक वस्तू लोकगीताइतकीच सुंदर होती. इथल्या कोंबड्याची शान तर भलतीच होती. गावकऱ्यांनी उत्साहाने ते म्युझियम् केलेले

पाहून सरकारने त्या जागेचे भाडे, व्यवस्था ठेवणाऱ्या नोकरांचे पगार, ही जबाबदारी स्वतः उचलली ! ते म्यूझियम् पाहताना गेझाकाका तेवढ्यात आपले ते ढगळ कपडे बदलून लग्नाचा काळासूट – पांढरा शर्ट – टायबिय लावून आले. घरी पोन्नानेनींनी दम भरला असावा. "यवढी भाइरच्या येशातली शानी मानसं आली आन् त्येंच्या म्होरं काय ध्यान दिसत व्हतं तुमचं – जरा चांगली कापडं चढवा न् जावा त्येनूला गुडबाय कराया."

कुणीतरी माझ्यापुढे पाव्हण्यांसाठी शेरे लिहिण्याची वही असते ती दिली. मी लिहिले-- "ह्यातली प्रत्येक वस्तू ही गेझाकाकांनी पोर्सेलिनमध्ये रचलेली एक एक सुंदर कविता आहे !" मग मंडळींनी गेझाकाका झिंदाबाद असा हंगेरीय भाषेत गजर केला.

आम्ही पोन्नानेनींचा घरीच निरोप घेऊन आलो होतो. परत मोटारीशी येतो तर भली भक्कम टोपली सफरचंदांनी भरून घेऊन म्हातारी त्या झिमझिम पावसांत तिथे उभी ! तसल्या अंधारात म्हातारीने झाडावरून शे-पन्नास सफरचंदे उतरवली होती.

"बाप रे ! एवढ्या सफरचंदांचं काय करायचं ?"

"जाताना खात खात जा – दूरचा पल्ला आहे...." म्हातारी म्हणाली. तेवढ्यात गेझाकाका आला. आणि म्हातारीला बिलगून उभा राहिला. आमची मोटार 'यू'च्या आकाराचे वळण घेऊन फिरली. दिव्याच्या प्रकाशात हा गोरा कुंभार आणि त्याची पोन्ना उभी दिसली. गेझाकाकाचा डावा हात पोन्नानेनींच्या कमरेभोवती होता – उजव्या हाताने आम्हाला तो टाटा करीत होता – त्या खेड्यात पाहिलेल्या सर्व कलाकृतीत ह्या कलाकृतीची सर मात्र कशालाही नव्हती.

एखादा सुंदर कविता संग्रह वाचीत जावे तसा मी हंगेरी वाचीत जात होतो. अनोळखी, रंगीत, आनंददायी अनुभूतींनी भरलेले एक एक पान असावे तसा एकेक दिवस. करता करता हंगेरीतला शेवटला रविवार उजाडला. सोमवारी परतीचा प्रवास सुरू. हंगेरीत असताना इम्र मॉडाच्य नावाच्या लेखकाने सुमारे शंभर वर्षांपूर्वी लिहिलेलं 'मानवाची शोकांतिका'

नावाचे नाटक माझ्या हाती आलं. मूळ हंगेरीय नाटयकाव्याचे 'द ट्रॅजिडी ऑफ् मॅन्' असे इंग्रजी भाषांतर आहे. प्रत्येक युगात आदम–ईव्ह आणि ल्यूसिफर हा सैतान ह्या त्रयीची अवस्था दाखवणारं हे नाटक. हंगेरीला ह्या नाटकाचा अभिमान आहे. एक असामान्य नाटक आहे हे. मानवी संस्कृतीतली नवी मृगजळं–नवे भ्रमनिरास.... नव्या आशा.... ह्या नाटकातल्या ओळी आता हंगेरीय भाषेतली सुभाषितं होऊन राहिली आहेत. प्रत्येक दिग्दर्शक ह्या नाटकाशी झुंज घेत असतो.

वाचता वाचता लक्षात येतं की आदम–ईव्ह आणि सैतान हे एकाच माणसात वसणारं त्रिगुणात्मक तत्त्व आहे. आदमची ईव्हपासून सुटका नाही–ह्या नाटकाच्या शेवटी विधाता अवतरून भरतवाक्य म्हणतो. त्यात इम्र मॉडाच्यने 'आतल्या आवाजा'चा उल्लेख केला आहे. तो आवाज माणसाला 'सावध आणि उन्नत' करण्यात चुकणार नाही असा विश्वास व्यक्त केला आहे. मला महात्मा गांधींच्या 'आतल्या आवाजा'ची आठवण झाली. आणि योगायोग असा, इम्र मॉडाच्यच्या स्मरणार्थ बांधलेल्या बूडापेष्टमधल्या भव्य रंगमंदिरात मी हंगेरी सोडण्यापूर्वी जे शेवटले नाटक पाहणार होतो त्या नाटकाचे नाव 'गांधी' असे होते. गांधीजींचे चिटणीस प्यारेलाल यांनी लिहिलेल्या द लास्ट फेज–अखेरचे पर्व ह्या ग्रंथावरून हे नाटक रचले होते आणि हंगेरीतल्या काझिमीर नावाच्या नामवंत दिग्दर्शकाने ते बसवले होते.

रविवारी सकाळी अकरा वाजता प्रयोग होता. मी त्या नाटकाच्या इंग्रजी भाषांतराची टंकलिखित प्रत आणून वाचली होती. डॉक्युमेंटरी प्ले म्हणतात तशा थाटाची रचना होती. प्रयोगाबद्दल मला अतिशय उत्कंठा होती. पण मनात मात्र शंका होती. कारण ह्याच काझिमीरने बसवलेल्या 'रामायणा'च्या प्रयोगातली छायाचित्रे पाहून मी हबकलो होतो. त्यातल्या सगळ्या राक्षसपात्रांना त्याने तुर्की पेहराव चढवला होता. खुद्द रावण तुर्की सुलतानासारखा दाखवला होता. रामायणात तुर्की सुलतान कसा यावा ते कळेना. मग माझ्या लक्षात आले. काझिमीरसाहेब हंगेरीय इतिहास शाळेत असताना शिकले असणार.

हंगेरीला तुर्कांनी फार छळले. त्यामुळे जे दुष्ट ते तुर्की सुलतानशाहासारखे असे चित्र बालवयातच त्यांच्या डोक्यात घर करून बसलेले असणार. मनात म्हटले, राम–सीता हंगेरीय भाषेत बोलतात हे स्वीकारल्यावर रावणाचा तुर्की पोशाख का स्वीकारू नये ? उद्या जपानी लोकांनी 'रामायण' केले तर त्यांनी राजीव लोचन राम त्या फुजुकी टिकोझी आणि काटामारू दोरागाटूंच्या अर्ध्या झाकीव लोचनातून कुठून शोधून काढायचा ? तेव्हा गांधी पंचाऐवजी फुलाफुलांचा झगा घालून आले तरी त्या पलीकडे जाऊन ते नाटक पाहायचा मी निश्चय केला.

गांधीजींच्या जीवनातले ते कारुण्यकांड. नवाखालीतले ते भीषण हत्याकांड. बिहारमधले सूडाचे सत्र. त्या साऱ्या रक्ताचे पाट वाहणाऱ्या पानातून उमटलेली ती गांधीजींची एकाकी पावले ! रंगभूमीवर ते दृश्य आले. आपल्या नातीच्या खांद्यावर हात ठेवलेल्या बापूजींनी प्रवेश केला. पीस कोअरमधल्या अमेरिकन तरुणासारखा दिसणारा नट गांधी म्हणून स्वीकारणे मनाचे सारे औदार्य जमेला धरून अशक्य. डोळे मिटून नाटक ऐकावे तर भाषेचा गंध नाही. त्या नाटकात गांधी, नेहरू, वल्लभभाई, कृपलानी, लुई फिशर, जिना, बिर्ला, सुऱ्हावर्दी हे सारे तत्कालिन पटावरचे मोहरे आहेत. काझिमीर साहेबांनी निदान त्यांचे फोटो तरी नीट पाहायचे ! फक्त लेडी आणि लॉर्ड माउंटबेटन् ठीक होते. पण व्हाइसरॉय साहेबांचा ए. डी. सी. अरबी सुलतानाला करतात तसा पायांच्या आंगठ्याकडे हाताची बोटे नेऊन कुर्निसात करीत होता ! नेहरूंची वेषभूषा आणि त्या नटाची शारीरिक ठेवण ठीक होती. पण नाटकभर त्यांच्या डोळ्यांना गॉगल ! त्यामुळे ते व्हिलन् वाटत होते. कृपलानी कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून गळ्यात चक्क हिऱ्याचा कंठा ! गांधीजींच्या हातात सतत पेटता कंदील आणि डोक्यावर रात्रंदिवस छत्री! स्वतः दिग्दर्शक त्या दिवशी हजर नव्हते. साहाय्यक दिग्दर्शिकेला माझ्या पत्नीने हे लफडे काय आहे ते विचारले. त्या म्हणाल्या, रामायणातदेखील रामाच्या डोक्यावर सतत छत्री असते. छत्र आणि छत्रीत घोटाळा झाला होता ! तरीसुद्धा रामाच्या डोक्यावरही सतत 'छत्र' कशाला ? आपल्या

ऐतिहासिक नाटकात जसे बिनतलवारीचे शिवाजी महाराज बघायला मिळत नाहीत तसलाच प्रकार! नवाखालीतल्या मुसलमान बायकांच्या कपाळीही कुंकू होते. बाकी गांधीजींचे केस हिंदी सिनेमा नटाच्या वळगावर असल्यावर एखाद्या कादरमियाच्या बिब्बीच्या कपाळी कुंकूच काय खुद्द मियासाहेबांना शेंडी लावली असती तरी चालले असते. हंगेरीय प्रेक्षकांना त्याचे सोयर सुतक नव्हते. आम्हाला सारखे सुतकच. कारण त्या नाटकातल्या अंतर्दर्शनाच्या आड त्या नटनटींची चुकीची वेषभूषा आणि केशभूषा येत होती. पण मग माझ्या लक्षात आले की त्या नाट्यगृहात सर्वांत विसंवादी आम्ही दोघे आणि कमलादेवीच होत्या. कारण बाकीचे सर्वजण त्या वातावरणात आणि अपरिचित जीवनदृष्टीत खूप रमले होते. प्रेक्षकांत बहुसंख्य विद्यार्थी विद्यार्थिनीच होत्या. वर्ग-विग्रहावर आधारलेल्या क्रांतीचे तत्त्वज्ञान शिकणाऱ्या त्या तरुणांना सत्याग्रहाने, अहिंसेने, प्रेमाने, संघर्ष मिटवण्याचे तत्त्वज्ञान सांगणाऱ्या गांधींचे दर्शन अद्भुत वाटले असणार. आणि हंगेरीत ते दर्शन घडवण्याच्या ह्या नाट्यरूप प्रयत्नाचे कौतुकही 'यशाहूनही प्रयत्न सुंदर' असे म्हणतच करावे असे होते.

सोमवारी विमानतळ गाठला. बेरूटमार्गे भारतात परतायचे होते. विमानात चढलो. पट्टे आवळा वगैरे रीतसर सूचना झाल्या. विमानाने आकाशात झेप घेतली. हां हां म्हणता बूडापेष्ट दृष्टीआड झाले. हळूहळू हंगेरीही दृष्टीआड होणार होता. आमचे इतके आतिथ्य करणाऱ्या साऱ्या हंगेरीलाच उद्देशून मी म्हणालो, 'क्योसोन्योम् हंगेरी....' आता मी तो शब्द विसरणार नाही. पण मला आता एकच नवी चिन्ता आहे. ह्या बकासुरी जगात, पृथ्वीवर नंदनवन आणू पाहाणाऱ्या ह्या हंगेरीला शांततेची शंभर वर्षे कशी लाभतील याची! अतिस्नेह हा पापशंकी असतो!

—

## उदंड पाहिले पाणी !

" ह्या खेपेला इंग्लंड अमेरिकेला विशेष काय पाहिलंत ?—" विमानतळावरून घरी परतताना माझ्या मित्राने मोटारीतच प्रश्न विचारला आणि मी म्हणालो, " पाणी ! "

" काय ? " त्याने धक्का बसल्यासारखे विचारले. विमानात नशापाणी करायची सोय असते, हे त्याला माहीत होते. त्यामुळे माझे ते विमान उतरले, तरी दुसरे विमान उतरले नसावे, अशीही त्याला शंका आली असणार. तरीही त्याने पुन्हा विचारले, " काय म्हणालास ?— पाणी ? यू मीन वॉटर ? "

" यस्. आय मीन वॉटर ! " मी म्हणालो. त्याने विषय बदलला.

मला पाण्याचं व्यसन आहे. एखाद्या गावाला नदी आहे, म्हटल्यावर मला ते गाव न पाहताच आवडायला लागतं. वास्तविक जीवघेण्या उन्हाळ्याच्या ह्या देशात पाण्याचं केवढं आकर्षण पाहिजे ! पाण्याच्या आनंदाला आपण कमी मानतो, असं नाही. देवाचीदेखील बिनपाण्याने पूजा नाही करता येत. लग्नातल्या मंगळाष्टकात गंगा सिन्धु सरस्वती च

यमुना म्हणून सगळ्या नद्यांना हाका घालतो. स्वतःच्या संस्कृतीला सिंधु-संस्कृती, गंगा-संस्कृती अशी नावे देऊन नद्यांचे उपकार आठवतो. पण वन्दे मातरम् सुरू झालं की 'सुजलाम्' म्हणताना जीभ अडखळते. डोळ्यांपुढे त्या पाण्याच्या नळासमोर लागलेल्या न संपणाऱ्या रांगा दिसायला लागतात. दिवसाच्या आणि रात्रीच्या कुठल्याही वेळी पाण्याच्या शोधार्थ निघालेल्या बाया दिसू लागतात. नळावरची भांडणे करणाऱ्या '*सुहासिनी सुमधुरभाषिणी*' *आठवतात. मुंबईतल्या नळातून* किरंगळीच्या मापाची धार गळायची तासन्-तास प्रतीक्षा करणारी एक माउली अमेरिकेत नोकरीला असलेल्या आपल्या लेकाला भेटायला गेली. परतल्यावर अमेरिकेचं कौतुक सांगत होती—"अहो, तिथली श्रीमंती म्हणजे काय सांगू ? अहो विश्वास बसणार नाही तुमचा ऽ ऽ नळाला दिवसभऽऽर पाणी".

प्रत्यक्षात आम्हांला पाण्याची गरज असून किंमत नाही असा चमत्कारिक विरोधाभास आहे. वास्तविक आम्ही वृक्षपूजक, जलपूजक, दगडाधोंड्यांचे आणि मातीचेदेखील पूजक. पण स्त्रीला जशी एका तोंडाने 'देवता' मानून संसारात खुशाल झिजवून मारून टाकतो, तसेच आपण आपल्या जळा-स्थळा-काष्ठा-पाषाणांचे केले! नुकतेच मी गिरसप्पाचा धबधबा आटून नाहीसा झाल्याचे वाचले. आपल्या एखाद्या आवडत्या कलावंताच्या निधनाच्या बातमीने धक्का बसावा, तसे मला झाले. त्या गिरसप्पाच्या सान्निध्यात दोनच दिवस होतो मी. काय एकेक लीला दाखविल्या होत्या त्याने! त्या दोन दिवसांत मी पावसाच्या धारांतला गिरसप्पा, धुक्यातला गिरसप्पा आणि सूर्यकिरणांत अंगावर एक नाही तर दोन इंद्रधनुष्ये घेऊन नाचणारा गिरसप्पा पाहिला होता. त्या गिरसप्पाच्या निधनाची वार्ता वर्तमानपत्रात ठळक ठशांत यायला हवी होती. एखाद्या महान् व्यक्तीच्या निधनाच्या वार्तेसारखी. अवर्षणाचा हा सगळ्यांत मोठा बळी! त्याचे प्रथमदर्शन मी खूप लहानपणी होनावरहून शरावती नदीतून वर प्रवास करीत घेतले होते. त्याने उडवलेल्या फवाऱ्यात मनसोक्त भिजलो होतो. त्याचे सारे रंगढंग

पाहिले होते. तो गिरसप्पा एखाद्या दरिद्री शेतमजुरासारखा ह्या दुष्काळात प्राण्यावाचून तडफडत नाहीसा झाला. अशा वेळी वाटतं की, ह्या नद्यांना, धबधब्यांना, तलावांना माणसांसारखी नावे देऊ नयेत. त्या नावांमुळे ती माणसांत येतात. मग यमुना सावळी होते. गंगा गोरीपान होते. नर्मदा सोज्वळ शिवभक्तीत रमलेली मैया होते. कृष्णाबाई कोयनाबाईंना बाळंतविडा घेऊन निघाल्या आहेत, असं वाटतं! गिरसप्पा तर मला कथाकलीतल्या एखाद्या नर्तकासारखा वाटे! डोळ्यांपुढे ह्या नद्या आणि पर्वत नाना रूपे घेऊन येतात. सह्याद्री मला तानाजी मालुसऱ्यासारखा वाटतो. संगमेश्वराजवळ 'शास्त्री' नावाची नदी आहे. तिला मी शास्त्रीणबाई म्हणतो. सगळ्याच पाण्याच्या प्रवाहांशी अशी जवळिक जमते, असं नाही. 'नीरा लेफ्ट बँक कॅनॉल' आणि 'राइट बँक कॅनॉल' बद्दल मला अजिबात सोयर-सुतक नाही. ते कुठे जातात, कुठे भेटतात, याची मी चौकशी करीत नाही. पण नरसिंहपूरला जाऊन नीराबाई भीमाबाईला कश्या भेटल्या ते मात्र पाहावेसे वाटते. ही कॅनॉल मंडळी मला पीडब्ल्यूडी खात्यातल्या लोकांसारखी वाटतात. त्यांच्याशी जर गप्पागोष्टी संभवल्याच तर कुणी किती पैसा खाल्ला आणि कुठला झेद्पीवाला आपले किती पाणी चोरून स्वतःची बागाईत भिजवतो, ह्याच कथा ऐकायला मिळतील. पण नीरा-भीमा मला प्रल्हादाला नरसिंह आपल्या देखत कसा प्रसन्न झाला होता आणि 'काय सांगू तुम्हाला? अवं त्ये शिंव्हाचं मुंडकं न् मानसाचं धड पघितल्यावर पोरगं काय भेदरलं म्हनतायसा देसपांडेकाका—' असं काही तरी आंतलं रहस्य सांगतील असं वाटतं! ह्या नद्या माझ्याशी बोलताना, 'बरं का दादा'—'त्येचं काय झालं, भाऊ' किंवा वाईकर कृष्णाबाई भेटल्या, तर 'बरं का भाऊजी' अशी सुरुवात करतील. पण कॅनॉल मात्र 'त्याचं काय आहे पुलसाहेब' म्हणतील! आता दादा–भाऊ–भाऊजीची जवळीक साहेबात कशी येणार? हे अवसानघातकी नळ किंवा सत्ता-धाऱ्याना धार्जिणे असणारे 'क्यानाल' कधी मनात वस्तीला उतरत नाहीत. अशा वेळी युरोप-अमेरिकेत हिंडायची संधी मिळाली, की मुक्त-

पणाने सर्वांना लाभणारे पाणी पोटभर पाहून ध्यावंसं वाटायला लागतं. पाणी ही किती पाहण्यालायक चीज आहे, हे तिथे कळतं! काय त्या पाण्याचे लाड ी माणसं करतात! आपले ओढे मोठे म्हणावे, इतक्या चिमुकल्या नद्या. पण केवढं त्यांचं कौतुक! त्यांच्या दोन्ही तीरांवरच्या हिरवळी — त्यांच्या पाण्यात डोकावून पाहणाऱ्या विलोज — वसंतात फुलणारी नाना प्रकारची फुले—मधेच कुठे तरी नितळ पाण्याचा डोह झालेला — त्यात हंसांच्या जोड्या — त्या दोन्ही तीरांना जोडणारे चिमुकले लाकडी पूल — त्यांच्या कठड्यांवर रेलून राजहंसाच्या लीला पाहणारे एखादे तरुण जोडपे — काठावरच्या हिरवळीवर दुमडत्या खुर्च्या टाकून पहुडलेले म्हातारे – सगळी स्थिरचर सृष्टी अशी त्या चिमुकल्या नदीच्या कौतुकाला जमल्यासारखी. आमचे ओढे विचारे दगडाधोंड्यांच्या वाटातून एकटेच निराधार उपेक्षित वाटसरूसारखे जात असतात. त्याचे फोफावणेही कुणी पाहत नाही, की रोडावण्याची कुणाला खंत नाही. युरोप-अमेरिकेत नद्या आणि मोठे जलाशय तर जाऊ द्या, पण चिमुकल्या झऱ्यांची आणि ओढ्यांचीदेखील किती काळजी घेतात! जपानात तर प्राचीन शिल्पे जपावी, तसे त्यांनी आपले ओढे आणि झरे जपले आहेत. खळाळतं पाणी पाहिल्याशिवाय जपान्यांना चैनच पडत नसावं. त्यांच्या त्या छोटया-छोटया जपानी रॉक् गार्डन्स म्हणजे छोटे मोठे खडक, फुलझाडं आणि वाहातं पाणी यांचाच खेळ असतो. एकीकडे लहान-लहान नद्यांची आणि ओढ्यांची ही बालेबाने, तर दुसरीकडे समुद्रप्राय महानद आणि सरोवरे. त्यांतून भीमकाय महासागरी आगबोटी देखील ये-जा करीत असतात.

ह्या खेपेची माझी पश्चिमयात्रा पाण्याच्या नाना प्रकारच्या लीलांचे दर्शन घेतच झाली. खुद्द पर्जन्यराजानेही आपले विलक्षण नृत्य दाखविले. रोममध्ये मुक्काम होता. तीनचार दिवसांत रोम पाहायचे, म्हणजे एन्-सायक्लोपीडिया ब्रिटानिकाचे सर्व खंड तीनचार दिवसांत वाचून टाकण्याचा संकल्प सोडण्यासारखे होते. रोम पाहायला तीनचार दिवसच नव्हे, तर तीनचार शतकं पुरणार नाहीत! गिबनचा ' रोमन साम्राज्याचा

उदयास्त' हा ग्रंथ वाचायचा संकल्प जगातली अनेक ग्रंथप्रेमी माणसे करतात आणि पुढे ढकलतात. रोम हे मनात आदरयुक्त भीतीच निर्माण करीत असते. मीदेखील मनात फारसे रोम पाहण्याची महत्त्वाकांक्षा ठेवून गेलो नव्हतो. इटालियन टॅक्सीवाले हे गंडवागंडवीतले सर्वश्रेष्ठ कलावंत आहेत, वगैरे ऐकून होतो. तरीही सावधगिरी ठेवून आम्ही रोममधली जमतील तितकी प्रेक्षणीय स्थळे पाहत होतो.

रोममध्ये ख्रिस्तपूर्व रोम आहे, ख्रिस्ती रोम आहे आणि आधुनिक रोमही आहे. प्राचीन रोमचे ते भग्नावशेष इतके महाप्रचंड आहेत की, त्यावरून मूळ भव्यतेची कल्पना करणेदेखील अशक्य होते. ह्या रोम शहराची सगळी मोजमापेच महाप्रचंड! इसवी सनाच्या पहिल्या शतकात बांधलेले 'कोलेशियम्' म्हणतात, ते अँफी–थिएटर पाहून तर छातीच दबली. पासष्ट हजार प्रेक्षकांची तिथे सोय होती! हे कोलेशियम् काय, पँथियाँ काय, ते रोमन फोरम्स काय, 'विराट' याशिवाय विशेषण सुचू नये अशा वास्तू. ख्रिस्तोत्तर रोममध्ये तर एकाहून एक भव्य आणि सुंदर चर्चेस बांधायची चढाओढच होती. आपल्या आवडत्या देवांना देखील देवळाच्या भव्यतेने मोठेपण देण्याचा माणसाचा हेतू असतो. पण शेवटी ही भव्यता शिल्पकाराची आणि स्थापत्य विशारदांच्या प्रतिभेची भव्यता दाखवूनच जाते! ही खरी स्मारके त्या कलावंतांची! सेंट पीटरचे ते जगप्रसिद्ध चर्च पाहत असताना मी दिपून गेलो, तो राफाएल आणि मायकेल अँजलोच्या प्रतिभेच्या उंचीने! इथला प्रचंड घुमट ही मायकेल अँजलोची महान् निर्मिती. त्या घुमटापर्यंत आता लिफ्टमधून जाता येते. तिथून घडणारे रोमच्या अफाट वास्तुवैभवाचे दर्शन विजिगिषु समाजाला केवढी भव्य स्वप्ने पडतात, आणि ती प्रत्यक्षात उतरविण्यासाठी प्रयत्नांची केवढी पराकाष्ठा होत असते याचाच साक्षात्कार घडविते! भव्य पुतळे भव्य वास्तू आणि तितकेच भव्य वृक्ष हे रोमचे चिरंतन वैभव आहे.

असल्या ह्या विराट अतिविराट वास्तूंच्या आणि शिल्पाकृतींच्या दर्शनाने दबलेलो असताना पाण्याचा एक अभूतपूर्व खेळ निसर्गाने दाखवला आणि शेवटी विश्वरूपदर्शन ह्या मनुष्यनिर्मित विराटपणाला चिमूटभर

कसे करून टाकते, ते दिसले. रोममधल्या मुक्कामात खरा रोमहर्षक अनुभव आणून दिला तो त्या दिवशी पडलेल्या पावसाने. सकाळपासून थोडीबहुत भुरभुर होती. तरीही आम्ही निघालो. पोपसाहेबांच्या व्हॅटिकन्‌मध्ये गेलो. आता पाऊस जोर धरायला लागला होता. हां हां म्हणता पावसाचे तांडव सुरू झाले. रस्त्यांतून एरव्ही वाहनांचा प्रवाह वाहत असतो. आता एकही वाहन नव्हते. गारांचा वर्षाव सुरू झाला होता. आणि आकाशातून कोट्यवधी हत्तींच्या सोंडांमधून पाण्याचा मारा चालला होता. आयुष्यात मी आता चांगले पन्नासहून अधिक पावसाळे पाहिले आहेत. पाऊस पाहणे हा माझा छंद आहे. मी बोटीतून प्रवास करताना पाऊस पाहिला आहे. आगगाडीतून पाहिला आहे. राजस्थानच्या प्रवासात तर मोटारीतून जाताना आकाशात आलेला प्रचंड काळा ढग, भांडे फुटावे तसा, आमच्या समोरच एकाएकी फुटून पडलेला पाहिला आहे. धामापूरच्या त्या विस्तीर्ण तलावावर ताशा बडवावा तसा पावसाच्या धारांचा तडतडाट पाहिला आहे. मुंबईच्या मान्सूनमध्ये लोकलगाडीत चांगला तीनतीन तास अडकून पडलो आहे. छातीभर पाण्यातून माहीमपासून सांताक्रूझपर्यंत, वाहन बंद पडल्यामुळे, चालत गेलो आहे – नव्हे, त्या प्रवासात हिसके खाताना मुन्सिपालटी-वाल्यांनी खणलेल्या खड्ड्यातही पडून गुडघे फोडून घेतले आहेत. पण ह्या रोमन पावसाची जातच निराळी होती. जो–तो अशी वृष्टी पाहिली नाही म्हणून सांगत होता. तासा दीड तासात रस्त्यांच्या नद्या झाल्या. बंगालात मी कालवैशाखीचे रौद्र स्वरूप पाहता पाहता समोरच्या विशाल मैदानांची तळी झालेली पाहिली आहेत. पण इथे आकाश कोसळलं होतं! एखादे धरण फुटल्यासारखे पाणी वाहत होते. रोममध्ये अनेकांनी अनेक गोष्टी पाहिल्या असतील, पण असला पाऊस कोणी पाहिला नसेल. गारा पाऊस–विजांच्या नर्तनाला तर उपमा नाही. आणि दुसऱ्या दिवशीच्या वर्तमानपत्रात आणि टेलिव्हिजनवर त्या अतिवृष्टीची चित्रे पाहून छातीच दबली. रस्त्यातल्या असंख्य मोटारी वाहून गेल्या होत्या. घराघरातून पाणी शिरले होते. असंख्य मांजरे मेली होती. पाचसहा दिवसांपूर्वीच

ह्याच इटालीत मी पाण्याचे किती अभूतपूर्व पण सुंदर स्वरूप पाहिले होते! काप्री बेटातल्या त्या ब्ल्यू ग्रोटोमध्ये मी पाण्याचे ते प्रकाशमान नीलस्वरूप पाहून मंत्रमुग्ध झालो होतो. आणि आज वरुणाने ह्या रोमवर आपले पर्जन्यास्त्र सोडलेले पाहत होतो. त्या नील कुहरात साक्षात् शांत रसातली घननील द्रवमूर्ती पाहिली होती. आज पाण्याने रौद्राचे दर्शन घडविले होते. पावसाने झोडपले, असे आपण म्हणतो. हे झोडपणे नव्हते, इथे युद्धच मांडले होते. त्या तीनचार तासांत मी साऱ्या जन्माचा पाऊस बघून टाकला.

ह्या द्रवस्वरूप जलराशीवर उतारा म्हणजे घनस्वरूप पाणी पाहणे हाच होता. आणि तो योगही एकदोन आठवड्यातच आला. आतापर्यंत मी स्वित्झर्लंडमधल्या त्या माँ ब्लॉच्या म्हणजे धवलगिरीच्या माथ्यावरून उडत गेलो होतो. कधीतरी त्याचे जवळून दर्शन घेण्याची इच्छा होती. मला डोंगर चढण्याची अजिबात हौस नाही. अशा परिस्थितीत आल्प्स पर्वताचे शिखर गाठणे वगैरे योग आपल्या कुंडलीत नाहीत, याची मला खात्री होती. पण जिनीव्हाच्या प्रवासी कचेरीत, आल्प्सच्या माथ्यावर आपल्याला अलगद नेऊन ठेवतात, हे कळल्यावर परमसंतोष जाहला. स्वित्झर्लंडला तर निसर्गाने अनंत हस्तांनी दान दिले आहे. त्या वैभवात स्विस् लोकांनी विज्ञानाची मदत घेऊन आपल्या अंगमेहनतीने कल्पनातीत भर घातली आहे. त्यातूनच ही आल्प्सच्या माथ्यावर प्रवाशांना अलगतपणाने उचलून नेण्याची किमया आहे. डोंगरच काय, सगळ्या निसर्गाला ह्या स्विस् लोकांनी आपल्या तालावर नाचविले आहे. खुद्द जिनीव्हातल्या त्या विशाल सरोवरात शेकडो फूट उंचीचे कारंजे थुयथुयत असते. आता तर जमिनीवर मोटारी ठेवायला जागा नाही, म्हणून तलावाखाली हजारो मोटारी राहतील, असे भुयारी गराज केले आहे. तलावात नौकाविहार–जलविहाराच्या नाना प्रकारच्या सोयी आहेत. तीरावर उंच–उंच वृक्षांनी भरलेली सुंदर वने–उपवने. इथे सहाही ऋतूंचे वैभव लुटायची सोय आहे. वसंत ग्रीष्मात वासंतिक महोत्सव आणि हेमंत शिशिरात शिशिरमहोत्सव. पाणी वाहताना वाहत्या पाण्यात खेळतात

आणि गोठले की गोठलेल्या पाण्यावरचे खेळ सुरू करतात !

आल्प्समधल्या जुंग-फ्राउचे दर्शन घ्यायला निघालो. जुंग म्हणजे तरुण आणि फ्राऊ म्हणजे मुलगी. म्हणजे जुंगफ्राऊला कन्याकुमारी म्हणायला हरकत नाही. सुरुवातीला काही मैल मोठ्या आगगाडीतून — तिथून मग डोंगरातून लुटुलुटू करीत जाणाऱ्या छोटया झुकझुक गाडीतून — त्यानंतर भक्कम दोरांना टांगलेल्या व्रिजेवर चालणाऱ्या पाळण्यातून आणि शेवटी तो डोंगर पोखरून केलेल्या भुयारी आगगाडीतून असा प्रवास करीत करीत तिथे जाऊन पोहोचलो. जिनीव्हाच्या तलावाची बराच वेळ संगत होती. मग खळाळणारे पाण्याचे प्रवाह सुरू झाले. त्यांच्या उडया मारण्याला खंड नाही. ह्या भागाला मुळी झऱ्यांचा प्रदेशच म्हणतात. मधूनच चिमुकले स्टेशन आणि चित्रासारखे स्विस् खेडे. स्वित्झर्लंडला 'भूलोकीचे नंदनवन' म्हटलेच आहे. त्यामुळे गंधर्व-अप्सरा, किन्नर-किन्नरी तर ठायी ठायी ! इथे दैन्य-दारिद्र्याचा कुठे स्पर्श नाही. ती सुबक रंगीबेरंगी खेळण्यांसारखी लाकडी घरे आणि त्यातले ते जिवंत बाहुला-बाहुलींचे संसार ! या स्विस् लोकांनी हवेचा अफाट लहरीपणा संभाळीत, निसर्गाच्या सगळ्या निर्घृणतेला सामने देत त्यालाच राबवून ही नाना तऱ्हेची आनंदनिधाने निर्माण केली आहेत. उद्दामपणाने उड्या मारणाऱ्या पाण्याला वेठीला धरून प्रचंड चक्रे फिरवायला लावून वीज तयार केली आहे. यंत्रनिर्मितीच्या शास्त्रातली गती तर एवढी मोठी की, जिथे शंभर टक्के अचूकपणा लागतो अशा ज्याला 'प्रेसिजन् इन्स्ट्रुमेंट्स' म्हणतात त्या यंत्रात आज स्विस् यंत्रे अग्रगण्य आहेत. पण इतकी घडयाळे आणि इतर यंत्रनिर्मिती करणारे ते कारखाने डोंगरांच्या कुशीत कुठे दडवले आहेत, त्यांचा पत्ता लागत नाही. धूर ओकणाऱ्या चिमण्या मला तरी कुठे दिसल्या नाहीत. चारी बाजूला दिसत होते ते गर्द वृक्षवैभव मिरवणारे डोंगर, हिरवीगार कुरणे, त्यात संथपणाने चरणाऱ्या त्या पुष्ट गायी, त्यांच्या गळ्यांत घणघणणाऱ्या घंटानादांतून निसर्गासारखेच ते सहज प्रकटणारे संगीत आणि नाना तऱ्हेच्या लयीत वाहणारे ते जलप्रवाह !

एका छोटयाशा गावात सकाळी साडे-अकराच्या सुमाराला येऊन पोहोचलो. इथून त्या हिमचर्चित आल्प्सचे घडणारे दर्शन हा एक अनिर्वचनीय अनुभव आहे. तो शब्दात पकडताना लेखणी पांगुळते. फोटोग्राफर मंडळी तर, हलवायाच्या दुकानात 'खा लेको किती खाता ते' म्हणून फुकट सोडलेल्या काटर्यांसारखी त्या दृश्यांचे सपासप फोटो काढण्यात दंग होती. माझे सर्व फोटो आल्प्सच्या फोटोसारखेच येतात. त्यामुळे मी मन:पटलावरच्या चित्रावर खूष होतो.

*ह्या गावातून पर्वताच्या एका टप्प्यापर्यंत एक विजेचा पाळणा जातो.* एखाद्या मीटरगेज आगगाडीच्या छोटया डब्याएवढ्या ह्या पाळण्यात तीस पस्तीस माणसे उभी राहू शकतात. भरभक्कम अशा पोलादी दोरांना टांगलेला एक पाळणा वरून खाली येतो आणि एक खालून वर जातो. पायथ्याकडून आपली उचलबांगडी होत असताना काचेच्या खिडक्यांतून सारा परिसर दिसायला लागतो. हां हां म्हणता पायथ्याचे गाव रांगोळीतल्या रंगीबेरंगी ठिपक्यांसारखे दिसायला लागते. हिरव्या रंगाच्या नाना छटांचे पट्टे ओढल्यासारखी ती कुरणे चिमुकली चिमुकली होत जातात. खालून उंच उंच वाटणाऱ्या डोंगरांच्या हिरव्या सोंगटया होतात. सूचिपत्र वृक्षांची घनदाट जंगले तर हिरव्या गणवेषातल्या असंख्य अक्षौहिणी सैन्याच्या पलटणीच्या पलटणी संचलनाच्या हुकुमाची वाट पाहात 'दक्ष' होऊन त्या डोंगरांच्या उतरणीवर हारीने उभ्या असल्यासारख्या दिसतात. ही देवाची दुनिया ह्या माणसांनी आपल्या अविश्रांत मेहनतीने आणखी शतपट समृद्ध केली आहे. ह्या साऱ्या हिरवळीतून वाहाणारे ते पाण्याचे स्रोत तर मोजदादीच्या पलीकडले. ही सारी हिरवळ पाण्याची श्रीमंती दाखवीत दाखवीत आमचा पाळणा पहिल्या मुक्कामावर येऊन पोहोचला. त्यातून बाहेर पडलो आणि एका लहानशा बोगद्यांतून पलीकडे आलो; तर सारा 'ट्रान्सफर सीन' — समोर आकाशाला लागलेल्या हिमराशी. त्या पर्वतावरून खाली पसरलेल्या अफाट हिमनद्या. त्यांनी त्या महापर्वताला मैलोन् मैल लांबीच्या पांढऱ्या शुभ्र वस्त्राने झाकून टाकले होते. आता चारी दिशांना शुभ्रता !

शुभ्रतेखेरीज दुसरे काही नाही. स्थिर, निश्चल आत्मानंदी विलीन झालेल्या तपस्व्यासारखी ती शुभ्र शुचिर्भूत शिखरे. पाण्याचे हे अत्यंत उदात्त स्वरूप! इथून त्या कन्याकुमारी शिखरापर्यंतचा प्रवास एका भुयारी आगगाडीतून! इथे मात्र मी ती भुयारी रेल्वे तयार करणाऱ्यांना मनोमन दंडवत घातला. तसला बर्फाच्छादित डोंगर पोखरून त्यांनी त्या बिळातून ही वीजगाडी हिंडवली आहे. अखंड दीडएक तासाचा प्रवास त्या बोगद्यातून आहे. आम्हांला साधा पारसिकचा बोगदा अजब वाटतो. तो दोनचार मिनिटांत संपतो. इथे सतत तास दीड तास प्रवास चालला होता त्या आल्प्सच्या पोटातून. हजारो फूट उंचीवरून. त्या बोगद्यातून जाताना कंटाळा येऊ नये म्हणून निम्म्या वाटेवर एक स्टेशनही आहे. तिथे पाच मिनिटे पाय मोकळे करायला उतरायचे. तिथे एक सुंदर रेस्टॉरंट आहे. आम्ही त्या फलाटातून हजारो फूट उंचीच्या एका कड्याच्या टोकावर असलेल्या त्या हॉटेलाकडे गेलो. आणि थंडीचा पहिला झटका बसला. आतापर्यंत आगगाडीत उबदार हवा खेळवली होती. त्यामुळे बाहेरच्या थंडीची कल्पना नव्हती. तसा गरम कपड्यांचा बंदोबस्त होता. पण कुठले काय आणि कुठले काय! नाकाचा शेंडा तुटून पडतो की काय असे वाटायला लागले. हॉटेलात गरम कॉफी मिळाली. तिथल्या भिंतीच काचेच्या होत्या. त्यामुळे चारी बाजूंच्या त्या पांढऱ्याधोप हिमनद्या, मैलोन् मैल पसरलेला बर्फ, त्यांत पुन्हा एखाद्या चिमुकल्या घराचा ठिपका! असल्या त्या बर्फाच्या दर्यात कशाला कोण कडमडायला राहत असेल ते कळेना. मग एखाद्या साखरेच्या ढिगावरून मुंगी सरकत खाली यावी तसे बारीकबारीक रंगीबेरंगी ठिपके त्या हिमराशीवरून सरकताना दिसले. ते घर म्हणजे डोंगरावरून जो स्कीइंग नावाचा घसरगुंडीचा खेळ चालतो, त्या खेळाडूंचे क्रीडाभवन होते. आणि ते जे सरकते ठिपके होते, ते हजारो फूट बर्फावरून घसरगुंडी करीत येणारे स्त्री-पुरुष होते! ह्या डोंगरमाथ्यावरून पायथ्यापर्यंत येणाऱ्या हिमनद्यांच्या उतरंडीवरून, पायाला लांबलचक लाकडी निमुळत्या फळ्या बांधून सूं सूं सूं करीत घसरगुंडी करण्याचा धाडसी

खेळ खेळायला शेकडो प्रवासी येत असतात! त्या खेळात हातपाय मोडूनही घेतात. पण त्या साहसाची ती धुंदी त्यांना पुनःपुन्हा तो खेळ खेळायला खेचून आणीत असते. ह्या स्कीइंगसारखाच बर्फावरच्या स्केटिंगचा खेळ! पायाला चाकांचे बूट बांधून नाना तऱ्हांनी माणसे त्या बर्फावरून चकरा मारीत असतात. इतकेच नव्हे तर सामूहिक नृत्ये सुद्धा करतात. पायाला चाके बांधून बर्फावरचा हॉकीदेखील खेळतात.

कन्याकुमारीकडे पाहात आणखी एक शिखर आहे. त्याला स्फिंक्स म्हणतात. इजिप्तमधे दगडाची स्फिंक्स आहेत, इथे बर्फाची! ११७२३ फूट उंचीवरची ही बर्फातली स्फिंक्स! ती यक्षप्रश्नासारखे प्रश्न विचारून उत्तर देता आले नाही तर प्राण घेते. ह्या हिमयक्षिणीचा एकच प्रश्न असावा – इथे कशाला मरायला आलात?

आमची भुयारी गाडी आता शेवटल्या टप्प्यावर येऊन थांबली. हे युंगफ्राऊ स्टेशन. इतक्या उंचीवर जगात दुसरे कुठलेही रेल्वे स्टेशन नाही. म्हणजे साडेतेरा हजार फूट उंचीवर आम्ही आलो होतो. बर्फाच्या एका लहानशा गुहेतून आरपार जाण्याची वाट आहे. तिच्या पलीकडल्या टोकावरून ह्या युंगफ्राऊचे दर्शन घ्यायचे असते. मी त्या बर्फाच्या गुहेत शिरलो. समोर शिखर दिसत होते आणि काय झाले कळेपर्यंत दाणकन त्या बर्फाच्या खडकावर साष्टांग दंडवत घडला. कपाळ-मोक्षच व्हायचा, थोडक्यात वाचलो. मला सावरायला मागून येणारे तीन-चार प्रवासीही दणादण आदळले. ती बर्फाची लादी भलतीच निसरडी होती. ही आल्प्सची कन्या असे सक्तीचे दंडवत घालून घेईल असे वाटले नव्हते.

इतक्या अफाट उंचीवर तरी बर्फाला मोकळे सोडावे? नाही. इथेसुद्धा ह्या उद्योगी स्विस लोकांनी बर्फाच्या गुहा खोदून त्यांत हिमप्रासाद तयार केले आहेत. आतल्या सगळ्या वस्तू हिमशिल्पाच्या. कोच, टेबले, कपाटे, पलंग, स्वयंपाकघर – दगडांतून शिल्प कोरावे तसे बर्फात कोरले आहे. त्या उंचीवरचा बर्फही खडकासारखा! वितळण्याची भीती नाही. बर्फात कोरलेली एक मोटरगाडीही त्या हिमप्रासादात होती. थंडीचे तर आता आगीसारखे चटके बसत होते. त्यामुळे हिमप्रासादातून कधी बाहेर

पडतो असे झाले. हां हां म्हणता परतीचा प्रवास सुरू झाला. त्या पर्वत शिखरावर आता मावळते सूर्यकिरण पडायला लागले होते. हिमांगिनी आता हेमांगिनी झाली होती. आल्प्सच्या माथ्यावर मिरवणारी ती हिमगौरी ' कन्याकुमारी ' पाहाताना मला हिंदी महासागराच्या तीरावरची आमची कन्याकुमारी आठवली. ही स्विस कन्याकुमारी आपल्या चिरयौवनाचे आव्हान देत एका महापर्वताच्या शिखरावर उभी – तर आमची भारतीय जुंगफ्राऊ आपल्या त्या भणंग प्रियकराच्या पायी सर्वस्व वाहण्याची समोरच्या महासागराच्या साक्षीने शपथ घेऊन युगानुयुगे तिष्ठत राहिलेली. तिचे आव्हान स्वीकारण्याचे साहस असणारा तरुण नाही म्हणून तीही कन्या कुमारीच राहिली आणि हिच्या प्रियकराला त्या समर्पणाचे मोल कळले नाही म्हणून हीही तशीच राहिली. दोघीही श्रीमंताघरच्या. एकीच्या मागे बर्फाचा महापर्वत उभा आहे, तर दुसरीच्या-पायी उसळत्या पाण्याच्या महासागराचे ऐश्वर्य लोळण घेत आहे. दोघीही दिसायला किती देखण्या ! पण दोघींच्याही कुंडल्यांत कडक मंगळ असावा. आता, असामान्यांच्यासुद्धा हस्तस्पर्शापलीकडे जाऊन बसलेल्या त्या हिमगौर स्विस जुंगफ्राऊच्या एकाकी जीवनाविषयी मला खूप सहानुभूती वाटायला लागली. मघाशी त्या हिमप्रासादात बसलेल्या बर्फाच्या चटक्यापेक्षा जुंगफ्राऊने मनाला लावलेला चटका अधिक दुःसह होता.

रात्री येऊन जिनीव्हाला पोहोचलो त्या वेळी जिनीव्हातल्या त्या विस्तीर्ण सरोवरावरच्या छोट्यामोठ्या बोटीत दीपोत्सव चालला होता. असंख्य दिव्यांच्या प्रकाशात तो जलाशय कसा रत्नालंकार चढवल्या-सारखा चमचमत होता आणि तो कारंजाचा फवारा आनंदाची आरोळी मारीत उडाल्यासारखा शेदीडशे फूट उंच उडत होता. आपल्या आनंदोत्सवात पाण्यालाही असे नाचायला लावणाऱ्या स्विस लोकांची कमाल आहे. बाकी पाणी नाचायला लागले की नकळत माणसाची पावले नाचतात. पावसाच्या पागोळ्यांचा नाच पाहून बाळपणी ज्याला त्या तालावर नाचावेसे वाटले नाही असा माणूस नसेल. पानी तेरा रंग

कैसा, जिसमे मिळावे वैसा, असे म्हणतात. इतर रंगांचे जाऊ द्या, पण मनाचे रंग पाण्यात मिसळले तरीदेखील पाणी आपल्याला साथ देते. यमुनेने गोपिकांना केलेली कृष्णाची कौतुकेंही ऐकली, तक्रारीही ऐकल्या आणि अक्रूराने त्याला गोकुळातून मथुरेला नेल्यानंतर त्यांच्या विराण्याही ऐकल्या. वाहती नदी ही असंख्य मुकी दुःखे घेऊन जगणाऱ्या स्त्रियांना म्हणूनच आपली जिवाभावाची सखी वाटत आली आहे. वर्षानुवर्षे भारतीय स्त्रियांची तर सारी हितगुजे—रहस्ये—मनातल्या कहाण्या घाटावरच्या पायऱ्यांवर नदीच्या साक्षीने नाही तर पाणवठ्यावर विहिरींच्या सोबतीने मोकळ्या झाल्या. म्हणूनच की काय कोण जाणे कोस कोस वाट तुडवीत पाणी भरायला जायचे त्यांना दुःख वाटले नाही. त्याहून मोठी अशी मनात बाळगलेली दुःखे त्या जलवंतीपाशी बोलता येत असावीत. दुःखच नव्हे तर चारचौघांत बोलायला संकोच वाटणारी सुखेसुद्धा ! बहिणाई चौधरी खानदेशातली ती पायाला चटके देणारी वाट तुडवीत सासरहून माहेरी जायच्या. त्या आपल्या माहेराचे मोठेपण सांगता सांगता त्यांनीच म्हटलंय—'माझ्या माहेराच्या खेपा लौकी नदीले विचारा !' बहिणाई किती वेळा माहेरी आल्या आणि पुन्हा सासरी गेल्या ह्याचा हिशेब लौकी नदीजवळ मागायला सांगणाऱ्या बहिणाईचे मन घेऊन पाणी पाहाता आले पाहिजे.

हिमराशी होऊन आकाशापर्यंत पोहोचणारा आल्प्स पाहिल्यावर थोडक्याच दिवसांत जलराशींनी पाताळात घेतलेली झेप पाहायचा योग आला. रॉचेस्टरहून आम्ही आणि आमचा मित्र प्रभाकर दीक्षित, त्याच्याच मोटरीतून कॅनडाच्या दिशेला निघालो. रॉचेस्टरहून साठ सत्तर मैलांवरच अमेरिकेची आणि कॅनडाची सरहद्द ! आणि त्या सरहद्दीवरचा तो जगातल्या सगळ्या धबधब्यांचा शहेनशहा नायगारा ! यापूर्वी गिरसप्पा आणि गोकाक ह्या दोनच धबधब्यांना मी 'येन्न अप्पा येन्न समाचारा ?' म्हटले होते. तसे खंडाळ्याच्या घाटात पावसाळ्यात छोटे-मोठे धबधबे कोसळत असतात. पण आजवर ज्यांच्या गाठीभेटी झाल्या ते धबधबे आणि आता दिसणारा नायगारा यांची तुलनादेखील

मीं मनातून काढून टाकली होती.

तो अमेरिकन फॉलचा म्हणजे हेमंताचा मोसम होता. आम्ही हेमंताची वृक्षावर थाटलेली रंगीबेरंगी शोभा पाहाण्यासाठी मुद्दाम सरळसोट स्पीड वे म्हणजे द्रुतगती मार्ग सोडून पार्क वे धरले होते. मैलोन् मैल रस्त्याच्या दोन्ही बाजूंना नाना तऱ्हांच्या वृक्षांच्या नुसत्या पलटणीच्या पलटणी उभ्या ! आणि त्यांच्या पानांनी पालटलेले ते रंग ! कुठे काही वृक्षांच्या रांगांच्या रांगा ताम्रवर्णांच्या पानांनी नटलेल्या — कुठे बावनकशी सोन्याची पाने — कुठे लालभडक तर कुठे आपले हिरवेपण न सोडता उभी. ह्या असंख्य वृक्षांच्या माथ्यावरून जशा काही कोणी हिरव्या, पिवळ्या, गुलाबी, जांभळ्या, केशरी, नारिंगी, शेंदरी अशा नाना रंगांच्या बादल्या ओतल्या होत्या ! पानगळ सुरू व्हायला थोडा अवकाश होता. तत्पूर्वीचा हा शेवटला उत्सवी पोशाख ! फुलांच्या रंगांचा दंगाही मी खूप पाहिला आहे. इंग्लंडमध्ये मी काही वर्षांपूर्वी हेमंतशोभाही पाहिली होती. पण ह्या अमेरिकन वृक्षांच्या रंगपंचमीच्या सणापुढे इलाज नव्हता. ह्याच सुमाराला इथे हॅलोविन्‌चा सण येतो. आपल्या होळीसारखा. पण अमेरिकन होळीला पोळी नसते. भोपळ्याचे नाना प्रकारचे खाद्यपदार्थ. अजून भोपळे मंडळी शेतात होती. त्यामुळे त्या वृक्षांच्या खड्या ताजमीतून जरा मोकळ्या रस्त्याला आलो की शेतात भीमकाय भोपळे पसरलेले दिसायचे. पिवळ्या धम्मक रंगाच्या हिरव्या चट्टयापट्टया ओढलेल्या शेकडो लोड-तक्क्यांनी भरावी अशी ती भोपळ्यांची शेते ! म्हणजे बाजूच्या वृक्षांची रंगलीला होतीच, शिवाय धरतीवरही ही भोपळ्यांच्या रंगाची उधळपट्टी. अशा ह्या रंगलीलेतून प्रभाकरची मोटर नायगाराच्या दिशेला चालली होती.

मोटार नायगाऱ्याच्या गावात शिरली आणि मिनिटा दोन मिनिटांतच त्या धबधब्याची घनगर्जना ऐकायला येऊ लागली. खूप गाजलेल्या नाटकाचा प्रयोग पाहायला बसावे, दर्शनी पडदा पडलेला असावा. तो वर केव्हा जातो याची आतुरतेने वाट पाहात असताना आतून नांदीचे स्वर कानी यावेत आणि केव्हा एकदा पडदा वर जातो असे होऊन जावे तसे

त्या नायगाऱ्याची गर्जना ऐकल्यावर झाले. सुदैवाने मोटर ठेवायला जागाही चटकन मिळाली. अमेरिकनांच्या कुंडलीत मोटरी पार्क करायचे स्थळ मिळण्याचे योगही तिथले ज्योतिषी पाहात असतील! गाडी पार्क केली आणि त्या धबधब्याच्या दिशेला जवळजवळ धावत गेलो. आणि जे पाहिले त्या सौंदर्याचे वर्णन करताना तुलसीदासाच्या भाषेत बोलायचे म्हणजे 'गिरा अनयन नयन बिनबानी—' अशी अवस्था होऊन जाते. आल्सच्या शिखरावरून पुढल्या सात जन्मांचे बर्फ पाहून घेतले होते! इथे त्या विराट कमंडलून ॐकाराची गर्जना करीत पडणारे पुढल्या सात जन्मांचे पाणी पाहून घेतले. समुद्राचे पाणी पाहताना ते खारट आहे ही उणीव मनाला भासत असते–पण हा गोड्या पाण्याचा सागर! एका बाजूला एकशे व्याऐंशी फूट उंच आणि हजार फूट रुंद असा तो अमेरिकन धबधबा आणि दुसरीकडचा तो कॅनडाच्या हद्दीतला जवळजवळ तितकाच उंच पण दोन हजार फूट रुंदीचा अर्ध-चंद्राकार धबधबा! अमेरिकन धबधबा म्हणजे पाण्याचा विशाल हिरवा पडदा आणि हा अर्धचंद्राकार धबधबा कसा पांढरा शुभ्र. अमेरिकन धबधब्याला हा हिरवा रंग पाण्याच्या घनतेमुळे आला आहे असे मला तिथे कळले. लुईस्टन नावाच्या गावाजवळून अवघ्या सात मैलांच्या अंतरावर वाटेतल्या डोंगरातून वाटा फोडीत फोडीत ह्या ठिकाणी यायला ह्या प्रचंड जलराशींना पस्तीस हजार ते पंचाहत्तर हजार वर्षे लागली असावीत असे निरनिराळे अंदाज आहेत, खरी किती वर्षे लागली ते तो नायगाराच जाणे!

वैज्ञानिकांनी आणि तंत्रविशारदांनी तर ह्या धबधब्याचे सौंदर्य सर्वांगांनी पाहायची सोय केली आहे. हेलिकॉप्टरमधे बसून त्याच्या डोक्यावरून पाहावे, तो कडा पोखरून पायथ्याशी नेणाऱ्या लिफ्टमधून तळाकडून वरपर्यंतचे दर्शन घ्यावे, अशा नाना सोयी. पण सगळ्यात रोमहर्षक अनुभव येतो तो 'मेड् ऑफ् द मिस्ट'—'धुक्याची पोर' असे मजेदार नाव दिलेल्या लॉंचमधून त्या कोसळत्या जलराशींच्या पायांशी जाताना! पाण्याचे तुषार उडत असतात म्हणून त्या नावेत

चढताना मेणकापडाचे डगले आणि टोप्या घालायला देतात. एरव्ही प्रचंड गर्जना करीत कोसळत येणारा हा जलाशय धरतीला भेटला की कसा प्रेयसीच्या मिठीत विसावलेल्या वीरपुरुषासारखा शांत होतो. आमची ती मेड ऑफ द मिस्ट मोठ्या मजेत चालली होती. धिटाईने धबधब्याच्या जवळ जात होती. वरून कोसळणारा तो धबधबा खालच्या खडकांवर आदळला की त्या प्रवाहाचा सारा जोरच संपतो ! खालून वर पाहताना मात्र नजर ठरत नाही.

पण नायगाऱ्याच्या त्या अफाट वैभवाचे खरे दर्शन होते कॅनडाच्या सरहद्दीवरून ! अलीकडे अमेरिका, पलीकडे कॅनडा आणि मध्ये ही पाण्याने आखलेली सीमारेषा. संध्याकाळ होत आली होती. आता दुसऱ्या तीरावरून ह्या जलराशींच्या अवतरणाचे दर्शन घेत होतो. कॅनडाच्या बाजूला नायगाऱ्याच्या कड्यावर एक वीसतीस मजली हॉटेल आहे. त्या हॉटेलचा सगळ्यात वरचा मजला म्हणजे फिरत्या रंगमंचासारखा, पण खूप सावकाश फिरत असतो. तिथून ह्या धबधब्याच्या पाण्यावर नाना रंगांचे प्रकाशझोत टाकून केलेली जादुगिरी पाहायची होती.

आम्ही त्या फिरत्या भोजनगृहात आमची टेबले नायगाऱ्याला पोहोचण्याआधीच 'आरक्षित' केली होती. 'जगा नहीं नीचे उतरो' म्हणाले असते तर तीस मजले उतरावे लागले असते ! आम्ही वर पोहोचलो त्या वेळीच हॉटेल तुडुंब भरले होते. आम्ही खुर्च्या धरल्या आणि देखावा पाहू लागलो, तर नायगाऱ्याचा पत्ता नव्हता. शेकडो मैल पसरलेला भूभाग दिसत होता. सवयीप्रमाणे 'व्हॉट इज हॉट ?' हा प्रश्न जिभेवर आला होता, पण तिथल्या त्या देखण्या वेट्रेस तथा परिवेषिकेच्या स्वागतपर गद्याने आणि स्मितानेच गार झालो ! पण इथून नायगारा पाहायला आलो आणि भोवताली तर भलतेच दृश्य हा काय प्रकार ? मी पुण्यात गेल्यावर 'ही फसवणूक शोभत नाही' छापाचे 'सकाळ'ला पत्रही लिहून केनेडियन सरकारला ठणकावण्याच्या विचारात होतो. काही वेळाने खुर्चीवर बसताना बाजूला ठेवलेली माझी छोटी बॅग गायब झालेली दिसली. लगेच हॉटेलातल्या दुसऱ्या एका

परिचेपिकेला 'इथे माझी बॅग होती ती दिसत नाही' म्हणालो. ती म्हणाली, 'इथे नक्की होती ना ?'

'होय हो –' मी किंचित् काकुळतीने म्हणालो. आणि ती फटाकडी हसून म्हणाली, 'मग येईल ती बॅग तुमच्याकडे. तुम्ही कुठं एका जागी बसला आहात ?' मग माझ्या लक्षात आले की आम्ही ज्या टेबलाशी बसलो होतो, तेवढीच पट्टी आमच्या नकळत फिरत होती. त्यामुळे बॅग मागे राहिली होती आणि आम्ही त्या फिरत्या तबकडीवरून चक्कर काटीत होतो. आता बाहेरचा देखावा बदलत होता. हां हां म्हणता नाना तऱ्हांच्या प्रकाशांत उजळलेला नायगारा डोळ्यांपुढे आला. मी म्हैसूरच्या वृंदावन बगीच्यात पाण्यावरच्या प्रकाशलीला पाहिल्या आहेत. अगदी खरे सांगायचे म्हणजे पाण्यावर रंगित दिवाबत्तीचा प्रकाश टाकणे वगैरे प्रकार मला फारसे मंजूर नाहीत. मुंबईला श्रीमंतांच्या लग्नसमारंभात मोठमोठ्या झाडांवर रंगीबेरंगी बल्ब लावून आरास करतात. त्या आराशी-सारखेच मला पाण्यावरचे रंगीबेरंगी प्रकाश टाकणे अडाणीपणाचे वाटते. पण नायगाऱ्याच्या पाण्यावरची ही प्रकाशलीला त्या सौंदर्याला एक निराळेच परिमाण देते. आता त्या धबधब्याचे सारे रौद्र स्वरूप नाहीसे होऊन ती एक शृंगारलीला झाली होती. टेबलावरचे भोजनही उत्तम होते. आरक्तवर्णी मॅनहॅटन मद्याचे मिश्रणही यथायोग्य जमले होते. मनातली भावावस्था रंगित संगीत. समोर रंगित संगीत प्रकाशाचा कोसळत्या जलराशीशी चाललेला तो खेळ. निसर्गाच्या अफाट शक्तीला वेठीला धरून विज्ञानी लोकांनी आणि जिद्दी तंत्रविशारदांनी केलेला तो चमत्कार दिङ्मूढ करीत होता.

निसर्गाच्या सगळ्या देणग्यातली पाणी ही फारफार मोठी देणगी. त्या पाण्याशी ही माणसे किती तऱ्हांनी दोस्ती जमवीत असतात. महिनोन् महिने होड्या घेऊन सफरी करतील ! उसळत्या दर्याच्या लाटांवर सर्फ रायडिंग करतील ! संथ जलाशयात पोहायला पडतील ! नाना तऱ्हांच्या जलक्रीडा करतील. इतकेच नव्हे तर एखाद्या जलस्रोताने आव्हान दिले तर प्राणांची पर्वा न करता त्या स्रोताबरोबर कड्यावरून त्याच्याचसारखी

उडीही मारतील ! नायगाऱ्याच्या धबधब्यातून तळाशी उडी मारणाऱ्या साहसी वीरांनी ह्या साहसापोटी आपले प्राण गमावले आहेत. शेवटी एक बहाद्दर लाकडी पिंपात बसला आणि धबधब्याबरोबर कड्यावरून खाली कोसळला. ते पिंप वाहात वाहात काठाला लागले–त्यातून तो सुखरूप बाहेर पडला–अशीही कथा मला तिथे कुणी तरी सांगितली होती.

ह्या कॅनडातच मी पाण्याच्या संगतीत राहायला निसर्गाने वसवून दिलेली एक वसाहत पाहिली, ती म्हणजे 'थाउजंड आयलंडस'– सहस्रद्वीपे नावाच्या ठिकाणी. मॉंट्रीयालहून मोटरीचा प्रवास करीत करीत आम्ही ह्या सेंट लॉरेन्स नदीच्या किनाऱ्यावरच्या मॅलरी टाउन नावाच्या छोट्याशा गावात जाऊन पोहोचलो. सेंट लॉरेन्सदेखील नदी नसून नदच आहे. सतरा मैल रुंदीचे पात्र ! ह्या नदीचा एक तीर कॅनडात आणि एक अमेरिकेत ! संध्याकाळचे चार साडेचार वाजले होते. आम्ही काही हॉटेलमध्ये खोल्या वगैरे राखून ठेवायची व्यवस्था केली नव्हती. लॉरेन्स नदीत ह्या मॅलरी टाउनजवळ थाउजंड आयलंडस आहेत असं ऐकलं होतं. ह्या पलीकडे काही माहिती नव्हती. रस्त्याच्या बाजूलाच एक टुमदार मोटेल दिसले. बाहेर पाटी होती, 'कायगर्स लॉज् !' आत शिरलो. सुरेख बंगली होती आणि तिला लागूनच हे मोटेल. बंगलीच्या दारातच एक मध्यम वयाची केनेडियन बाई भेटली. ती ह्या मोटेलच्या मालकाची मुलगी. तिने जणू आमची वाटच पाहात असल्यासारखे स्वागत केले आणि खोल्या दाखवल्या. ओसरीवर येतो तर दारात लॉरेन्स नदीच्या लाटा लप लप करीत होत्या. नदीच्या पाण्याकडे झुकणारे अंगण–त्या अंगणात व्यवस्थित कापलेली हिरवळ आणि टोकाला लॉरेन्स नदीच्या लहरींचा नाच ! थाउजंड आयलंडसना येण्याचा मोसम संपल्यामुळे ह्या मोटेलमध्ये फक्त आम्हीच पॅसिंजर होतो. थोड्याच वेळात म्हातारे कायगर आले. पंचाहत्तरीच्या पुढला म्हातारा. सुरुवातीची काही वर्षे सैन्याविन्यात नोकरी केली आणि गेली चाळीस पंचेचाळीस वर्षे ह्या हजार बेटांना प्रदक्षिणा घालणाऱ्या छोट्या

आगबोटीवरचा तो कप्तान होता. नुकताच निवृत्त झाला. पण लॅरेन्स नदीवरून सफर करायची हौस संपली नव्हती. त्यामुळे आपली स्वतःची लँच घेऊन रोज मच्छिमारी करायला जायचा. "आज आराम करा. उद्या तुम्हांला सगळी हजारच्या हजार बेटं दाखवून आणतो–माझ्या होडीतून ! खरं सांगायचं तर सतराशे बेटं आहेत."

"आपण सगळी पाहिली आहेत ?" माझा एक अजागळ प्रश्न.

"यंग मॅन्–आय नो एव्हरी ड्रॉप ऑफ् सेंट लॅरेन्स !–माझी ह्या लॅरेन्स नदीच्या थेंबाथेंबाशी ओळख आहे. गेली चाळीस वर्षे माझ्या हातात त्या मोठ्या बोटीचं सुकाणू होतं. लक्षावधी टूरिस्टांना मी दाखवली आहेत ही बेटं–पण तुम्हांला मी टूरिस्टांना न दाखवलेली बेटंही दाखवीन. कारण, ती मोठी बोट त्या पाण्यातून वाट काढू शकत नसे–ही लँच वाटेल तिथून धावेल ! इजण्ट शी अ डियर ?" आपल्या लँचकडे पाहात म्हातारा म्हणत होता, "गोड आहे की नाही माझी सोनी ?"

ह्या नाविकांचे आपल्या नौकेवर प्रियकराचे प्रेयसीवर असावे तसे प्रेम असते. त्या म्हाताऱ्या कायगरने पाण्यातल्या गॅरेजमध्ये डुलणाऱ्या त्या लँचकडे ज्या कौतुकाने पाहिले त्याचा कायगिरीणबाईंनासुद्धा हेवा वाटला असता. रात्री म्हाताऱ्या कायगरने आपल्या कारभारणीशी परिचय करून दिला. कायगर म्हातारा–म्हातारी, त्यांची ती प्रसन्न चेहऱ्याची मुलगी–जावई–नात–नातू असे मोठे प्रेमळ कुटुंब ! म्हातारी तर इतकी लाघवी होती की त्या मोटेलमध्ये येणाऱ्या प्रत्येकाला आपण आजोळी आलो आहो असे वाटायला लावीत असेल. आपल्या मुलीचे, जावयाचे, नातवंडांचे खूप कौतुक सांगत होती. त्याबरोबरच आपला नवरा कसा बुद्दू आहे–त्याला पाणी आणि मासे यांपलीकडे जगातले कसे काही कळत नाही हे सांगून म्हाताऱ्याची चेष्टा करीत होती. मधूनच म्हातारबुवांचा गालगुच्चाही घेत होती. मग म्हातारा लाजून लालेलाल व्हायचा !

"यस् ! वॉटर ॲण्ड फिश् ! बस्. मला दुसरं काही नको !" आणि

मग त्याने वादळवाऱ्याला तोंड देत आपण आयुष्यभर या लॉरेन्स नदीच्या पाण्याशी कसे खेळत आलो याच्या गोष्टी सांगितल्या. फार वर्षांपूर्वी खारदांड्याच्या एका कोळीबुवाशी मी गप्पा मारीत बसलो होतो. त्याही म्हाताऱ्याच्या गोष्टी थेट या गोऱ्या कोळीदादासारख्याच होत्या. कायगरकाकाने आपल्या गळाला लागलेले काही खास मासे स्वयंपाक-घरात न पाठवता त्यात पेंढा भरून कसले तरी रासायनिक संस्कार करून फ्रेमबीममध्ये बसवून भिंतीवर टांगले होते. त्यातल्या प्रत्येक माशाचे मत्स्यपुराण होते! एक दोन अध्याय झाल्यावर म्हातारी मिस्किलपणाने मला म्हणाली — "आता तुझी चार तास धडगत नाही!" चार तास काही नाही, पण तास दीड तास म्हातारबुवा लॉरेन्स नदीच्या आणि माशांच्या लीला सांगत होते.

दुसऱ्या दिवशी म्हातारा सकाळी न्याहरी आटपून दारात हजर! "चांगले स्वेटर्स विटर्स चढवा." आम्ही थंडीचा कडेकोट बंदोबस्त करून त्या लॉंचमधून निघालो आणि मैल दीड मैलाचे अंतर काटतो न काटतो तो लॉरेन्स नदीवरचा अमेरिका आणि कॅनडाला जोडणारा प्रचंड पूल दिसला. खूपच उंचीवर हा पूल बांधला आहे. "हा काही जगातला सर्वांत मोठा पूल नव्हे. पण माझ्या नदीत (लॉरेन्सला कायगरबाबा 'माय रिव्हर' म्हणायचे) जगातला छोट्यातला छोटा आंतरराष्ट्रीय पूल आहे. बघालच आता."

थोड्याच वेळात ती बेटे दिसायला लागली. बेटे कसली, बेटांची पेठच होती ती. गल्लीबोळांऐवजी पाण्याचे पाट. काही काही बेटे तर मोठ्या शहरातल्या ट्रॅफिक आयलंड एवढी. पण जवळ जवळ प्रत्येक बेटावर टुमदार बंगले होते. बगीचे होते. काही बेटांवर फक्त एकच बंगला आणि छोटी बाग. त्याहून अधिक काही करायला जागाच नव्हती. हजार दीड हजार फुटांच्या प्लॉटवर बंगला बांधावा तसले बेट! आणि बेटांच्या ह्या ठिपक्यांतून गल्लीबोळांतून सायकल हाकावी तशी लॉंच हाकीत कायगरबाबा चालले होते. प्रत्येक बंगल्याच्या फाटकापाशी छोटी मोठी लॉंच उभी. अशी शेकडो बेटे आणि टुमदार बंगले.

अमेरिकेतल्या कितीतरी श्रीमंत व्यापाऱ्यांचे आणि सिनेमा नटनटींचे इथे बंगले आहेत. वर्षातून कधीतरी उटी किंवा मसुरीला आपल्या बंगल्यात श्रीमंत लोक जातात तसे कोट्याधीश लोक पाण्याच्या संगतीत ह्या बंगल्यातून चैनीसाठी येऊन राहतात. कायगरबाबांना मला वाटते हजार दीड हजार बंगल्यांच्या मालकांची आणि मालकिणींची नावे पाठ होती. एकेकाच्या मालकीचे एकेक बेट ! मोठे असले तर तीनचार जणांच्या मालकीचे. पण प्रत्येक बेटावर चांगली उंच झाडे आणि फुल-बागा. काही काही बेटे तर इतकी चिमुकली होती की त्यांवर जेमतेम दोन खोल्यांचे एक कुटीर उभे होते. पण तेवढ्या जागेतदेखील एखादा वृक्ष आणि चिमुकला बगीचा होता. कायगरबाबा त्या बेटाबेटांतून किती उत्साहाने नाव चालवीत होता ! गेली चाळीस पन्नास वर्षे तो त्या बेटांना प्रदक्षिणा घालतो आहे. पण ' हे झाड पाहा – ती बाग पाहा – ह्या विलोज पाहा कशा पाण्यात झुकल्या आहेत – ह्या बंगल्यात एकदा मर्लिन मन्रो उतरली होती – ' अशी त्याची रनिंग कॉमेंट्री न कंटाळता सारखी चालली होती.

" कायगरसाहेब, ह्या वयात तुम्हांला थकवा येत नाही ? "

" पाण्यात राहणाऱ्या माणसाचं आयुष्य जमिनीवरच्या माणसाच्या दुप्पट असतं. ए फिशरमन नेव्हर गेट्स ओल्ड ! " बाकी म्हाताऱ्याचे मनगट असे काही दणकट होते की अजूनही त्या मनगटात व्हेल मासा खेचायचीही ताकद असावी. त्या थंडीने आणि वाऱ्याने आम्ही जेरीला आलो होतो. पण म्हातारा ऐकायला तयार नव्हता. इतक्यात त्याने एका बेटाजवळ मजेदार वळण काढले आणि म्हणाला, " तो बघा जगातला सगळ्यात छोटा आंतरराष्ट्रीय पूल ! " दोन कमालीची छोटी बेटे होती. एकावर अमेरिकेचा आणि दुसऱ्यावर कॅनडाचा राष्ट्रध्वज फडकत होता. त्या दोन बेटांना जोडणारा चार-सहा फुटांचा पूल होता. म्हणजे त्या पुलावर माणूस आडवा पडला तर डोके कॅनडात आणि पावले अमेरिकेत गेली असती आणि पोट सापडले असते ' नो मॅन्स लॅण्ड 'मध्ये ! तो चिमुकला पूल समोरच्या प्रचंड पुलाला वाकुल्या दाखवीत होता !

कायगरबाबा म्हणत होता – चला, आणखी आठ-दहा मैल आत जाऊ या. पण मी म्हातान्याला आवरले. थंडीने मी हैराण झालो होतो. तरीही त्याने आपली लॉंच नदीच्या दुसऱ्याच एका दिशेला वळवलीच. थोड्याच वेळात आम्ही एका जुन्या किल्ल्यासारख्या इमारतीपाशी आलो. त्या नदीत कुण्या जर्मन सरंजामदाराने कधीकाळी एक किल्ल्यासारखा महालही उभा केला होता. ही माणसेही अफाट! ह्या हजार बेटांचे हजार तऱ्हांचे लाड केले आहेत. तो महाल पाठीशी टाकून आम्ही मोटेलच्या दिशेला वळलो. आता ती हजार बेटे मागे राहिली होती. नदीच्या त्या विशाल पात्रावर दुतर्फा जंगलासारखी वनराजी होती. होता होता नदीचे पात्र आणखीच विशाल होत गेले. घटकेपूर्वी त्या हजार बेटांतून गल्लीबोळ काढल्यासारखे धावणारे ते पाणी आता विशाल जलाशय होऊन क्षितिजापर्यंत पोहोचले होते. हे एवढे गंभीर विशाल पाणी दोन चार मैलांतच त्या बेटाबेटांतून असे खेळकरपणाने वाहत असेल अशी कुणालाही कल्पना येणार नाही.

आमची लॉंच कायगरबाबांच्या गॅरेजमध्ये शिरली. आम्ही त्या मोटेलच्या लाउंजमध्यें आलो. कायगरची मुलगी म्हणाली, ' आय् नो–तुम्हांला आता गरम गरम चहा पाहिजे ! "

आम्ही चहाची वाट पाहात बसलो. तेवढ्यात कायगरबुवा पुन्हा जायला निघाले.

"कुठे निघालात ? "

" मासे पकडायला. आज दुपारच्या जेवणाला तुम्हांला असले मासे खाऊ घालतो की तुम्हांला थाउजंड आयलंडसची खूप वर्षं आठवण राहिली पाहिजे ! " क्षणातच लॉंच सुरू झाल्याचा आवाज आला आणि खिडकीच्या काचेतून आम्ही पाहिले, म्हातान्याची होडी पाणी कापीत माशांच्या शोधात निघाली होती.

" मासे ही नुसती सबब बरं का— " त्याची मुलगी सांगत होती. " आमच्या डॅडींना जमिनीवर राहायला आवडत नाही. नदी हेच त्यांचं खरं घर आहे. येताना खूप मासे मारून आणतील–पण ते आम्हांला खूप

करायला. पण खरी ओढ पाण्याची —"

त्या कायगर लॉजमधला आमचा केवळ दोन दिवसांचा मुक्काम! पण साऱ्या कुटुंबाने चटका लावला. जाण्याच्या दिवशी म्हातारा म्हणाला, "मला तुमच्या देशात यायचंय."

"अवश्य या." मी म्हणालो.

"आय् वॉंट टु सी युवर गॅंजेस्!" त्याला फक्त भारतातली गंगा बघायला यायचे होते. मला वाटते, गंगेच्या निव्वळ पाण्याची शोभा पाहायला येणारा हा गंगामैय्याच्या जीवनातलादेखील पहिलाच यात्रेकरू असेल! आम्ही काशीयात्रा करतो. गंगेचं तीर्थ घेतो. चार बुचकळ्याही मारतो. पण पुण्याबिण्याची कसलीही अपेक्षा न बाळगता गंगेचे निव्वळ जलवैभव बघायला कुणीही जात नसेल.

तंबूतल्या जंगी सर्कशी मी खप पाहिल्या आहेत. पण आकाशाचा तंबू आणि विस्तीर्ण जलाशयाची पटभूमी असलेली सर्कस कधी पाहायला मिळेल अशी कल्पना नव्हती. उत्तर अमेरिकेच्या दक्षिणेला फ्लॉरिडा संस्थान येते. इथली हवा पुष्कळशी आपल्या देशातल्या थंड हवेसारखी. भरपूर पाऊस, भरपूर ऊन आणि उत्तम माती. त्यामुळे हे संत्र्या-मोसंब्याच्या शेकडो एकरांच्या बागांनी बहरलेले राज्य. मला वाटते निम्म्याहून अधिक अमेरिकेला फ्लॉरिडा संत्री पुरवीत असेल. पाण्याच्या विपुलतेला तर सुमार नाही. ह्या राज्यात काही हजार सरोवरे आहेत असे मला कुणीतरी सांगितले. विपुल पाणी, विपुल ऊन आणि सुपीक धरती मिळाल्यावर आणखी काय हवे?

आमचे विमान ओर्लॅंडोच्या विमानतळाच्या दिशेने जाताना आकाशातून ह्या समृद्धीचे दर्शन घडत होते. ओर्लॅंडोला आलो होतो डिस्नेचे ते अद्‌भुत जग पाहायला. त्या अद्‌भुततेला तर तोडच नव्हती. पण हॉटेलमधला एक अमेरिकन सहप्रवासी सहज म्हणाला, 'तुम्ही सायप्रस गार्डन्सही पाहा. तिथली पाण्यावरची सर्कस फॅन्टॅस्टिक असते.' अमेरिकेत फॅन्टॅस्टिक् हे विशेषण वापरायला विशेष्यात कुठलेही खास वैशिष्ट्य असावे लागत नाही. 'हॉट डॉग' पासून निक्सनपर्यंत काहीही

फॅण्टॅस्टिक् असू शकते. त्यामुळे पाण्याच्या सर्कशीत फॅण्टॅस्टिक असे काही असेल की नाही कोण जाणे अशा साशंक मनाने आम्ही ओर्लांडोहून पन्नास – एक मैलांवरच्या सायप्रस गार्डनला जायला निघालो. पाण्यावरची सर्कस कशी का असेना, गार्डन निश्चितच चांगली असणार याची खात्री होती.

या सायप्रस गार्डनमध्ये एक दोन नव्हे तर दोन हजार जातींच्या वनस्पतींच्या विविधतेने एक सुंदर उपवन नटवले आहे. छोटीशी नाव बगीच्यातून आपल्याला हिंडवीत हिंडवीत नेते. दुतर्फा एकाहून एक सुंदर असे सायप्रस वृक्ष. त्या पाणवाटेवर झेपावणाऱ्या फांद्या. त्यांना लटकलेल्या वेली. दोन्ही काठांवर नाना फुलांच्या रंगांची उधळपट्टी ! तिथून वर पसरलेले हिरवळीचे गालिचे. त्यात उद्यान-वाटिका. आणि एवढ्याने समाधान होणार नाही म्हणून त्या गालिच्यावर कधी पहुडलेल्या, कधी झाडांना टेकून उभ्या असलेल्या सौंदर्यवती ! ह्यादेखील उद्यानात नोकरीला आहेत. नंदनवनीच्या अप्सरांसारख्या किंवा वनदेवतांसारख्या ! मधूनच एखादा धबधबा. मधूनच खळाळणारे निर्झर. मधेच गर्द झाडीतून जाणारी ती पाण्यातली वाट आणि वळणावळणावर 'क्या बात है' अशी दाद जावी अशा प्रकारची रंगीबेरंगी पुष्पसज्जा ! आणि ह्या सायप्रस बगीचाला साहचर्य एका क्षितिजापर्यंत पोहोचलेल्या जलाशयाचे !

पाण्यावरच्या सर्कशीचा, हा जलाशयच एक विशाल रंगमंच ! तीरावर प्रेक्षकांसाठी झकास स्टेडियम. आम्ही जागा धरून बसलो. अजून सर्कस सुरू व्हायला थोडा अवकाश होता. कर्ण्यातून सर्कशीच्या बॅण्डसारखे संगीत ऐकू येत होते. स्टेडियम भराभर भरत होता. छान ऊन पडलेले. समोर तो जलाशय. उजव्याडाव्या बाजूंनी त्या जलाशयात घुसलेली भूशिरे ! गर्द रायांच्या दूरवर विंग असाव्या तशी ! डोक्यावर आकाशाचे छत आणि पार्श्वभागी आकाशाचाच पडदा. त्या पडद्यावर पाचदहा ढगही लटकले होते. त्यामुळे आकाशाचा भगभगीतपणा भासत नव्हता. फ्लॉरिडा हा उष्णकटिबंधातला प्रदेश असल्यामुळे प्रेक्षकांतल्या गौरांगनांनी स्वतःचे कटिबंध आणि वक्ष निमित्तमात्र झाकून सूर्यस्नानही

उरकून घ्यायचे ठरवले होते. डोक्यावर, ह्या बगीच्यातल्या विचित्रवस्तू भांडारात मिळणाऱ्या रंगीबेरंगी फुलांच्या पाकळ्यांनी गुंफल्यासारख्या दिसणाऱ्या टोप्या चढवल्या होत्या. त्यामुळे त्या स्टेडियमच्या पायऱ्यांवर हजारो रंगीबेरंगी फुलांच्या कुंड्या ठेवल्यासारखेच वाटत होते. सगळ्यांच्या डोळ्यांना गो गो गॉगल. गोरीपान–लालबुंद–स्वर्णकांती अशी शरीरे आणि डोक्यावर त्या पाकळ्या पाकळ्यांच्या टोप्या. शेकडो कॅमेरे हेच दृश्य टिपीत होते.

इतक्यात त्या कर्ण्यातून तरबेज निवेदकाचा आवाज उमटला— ' मित्रहो, वॉटर स्कीइंग सुरू होत आहे. ' पूर्वी सिनेमा थिएटरात पाटी यायची – खामोष ! अब टाकी शुरू होती है ! त्या निवेदकाच्या बोलण्यात तसली जरब नव्हती. पण भलतीकडे लक्ष जाण्यासारखे त्या स्टेडियममध्ये खूपच असते हे त्याला ठाऊक असल्यामुळे त्या बोलण्यात ' खामोष ' आणि ' अगर आपकी इजाजत हो ' ह्या दोन्हींचे मिश्रण होते. यूरोप-अमेरिकेतल्या करमणुकीच्या कार्यक्रमांचे निम्मे यश ह्या चतुर निवेदकांना द्यायला हवे. किती वेचक आणि वेधक बोलतात ! ' यानंतर.... यम् यम् यम् कुमारी–माफ करा हं, सौभाग्यवती चंद्रलेखाबाई....अं अं चंद्रप्रभाबाई सादर करीत आहेत पापड कसे लाटावे—' असला बेचव प्रकार नाही. निवेदकाने पहिल्या सलामीत समोरच्या त्या विस्तीर्ण जलाशयाकडे लोकांचे लक्ष वेधले. "पाणी. . .पाणी ....पाण्याचं दर्शन आनंद देतं – पण पाणी लोआव्हानही देतं–" असं गुलवत गुलवत त्याने कांचे लक्ष दुरून येणाऱ्या एका छोट्याशा मोटरबोटीकडे वेधले. त्या मोटर बोटीच्या मागे जणू काय लाल रंगाचे ठिपके असलेला पंखा पसरल्यासारखे वाटत होते. सरसर पाणी कापीत ती मोटरबोट स्टेडियमच्या दिशेला आली आणि त्या मोटरबोटीला बांधलेल्या दोरांना घट्ट पकडून वॉटर स्कीइंग करीत डझनभर कमालीच्या बांधेसूद तरुणी आपला एक हात उंचावून अभिवादन करीत पाण्याच्या पृष्ठभागावरून सामोऱ्या आल्या ! सन्नाट वेगाने ती मोटरबोट सुटली होती आणि ते मागले दोर घट्ट पकडून त्या तरुणी पाण्यावरून त्या वेगात खेचल्या जात होत्या. इथून पुढले दोन

तास त्या पाण्यावरच्या अद्‌भुत साहसलीला पाहाताना कसे गेले ते कळले नाही. हा त्यांचा पाण्याशी खेळ नव्हता, जिवाशी होता. पायाला लांब-लचक निमुळत्या टोकदार फळ्या बांधलेल्या–हाताने दोर गच्च पकडलेले आणि मोटरबोट कमालीच्या वेगाने खेचते आहे, अशा अवस्थेत नाना प्रकारची समूहनृत्ये झाली. विदूषकाच्या कोलांटया उड्या झाल्या. मधेच त्याच्या हातातला दोरदेखील सराईतपणे निसटला–त्याने हवेत कोलांटया घेतल्या–खाली जणू काय मऊ गादीच पसरली होती! त्या सगळ्या साहसात ॲडमही होते आणि ईव्हही होत्या! शेवटी तर एक माणूस भला मोठा पतंग पाठीला बांधून आला आणि त्या मोटरबोटीवरून वेगाने धावता धावता पाण्यातच ठेवलेल्या एका लाकडी घसरगुंडीवर उलटा जाऊन त्याने असा काही झटका दिला की बघता बघता तो स्वतःच पतंगासारखा आकाशात विहार करायला लागला! पतंगाला बांधलेला तो माणूस तीन एकशे फूट उंचीवर उडत होता. त्या उंचीवर त्याने पतंगा-सारखे झोके खाल्ले–फडफडला–सगळं काही केलं. आता खाली–म्हणजे त्या प्रचंड जलाशयात तो उतरतो कसा हा प्रश्न सगळ्यांपुढे होता. खाली ती मोटरबोट फिरत होती. हा पतंगराव जणू काय तीनशे फूट उंचीची घसरगुंडी असल्यासारखा सरसर खाली उतरला आणि क्षणार्धात त्या मोटारबोटीमागचे दोराचे शेपूट पकडून, पाण्यावर चकरा काटायला लागला! आकाश, पाणी आणि जमीन ह्या तिन्ही ठिकाणी इतक्या सहजतेने विहार करणाऱ्या त्या साहसी कलावंताला लोकांनी उभे राहून टाळ्यांच्या कडकडाटाने अभिवादन केले. ह्या पतंगोड्डाणाने डोळ्यांचे पारणे फिटले. पण ह्या कार्यक्रमाचा रंगमंच केवढा भव्य होता! जलाशयाचे अनेक उपयोग आहेत. पण त्या जलाशयाची इथे नृत्यभूमी झाली होती. आता फक्त पाण्याने स्वतःच साग्रसंगीत नृत्य केलेले पाह्यचे राहिले होते.

तोही योग आला. आजवर आकाशातून पडणाऱ्या जलधारांचे नृत्य अनेक वेळा पाहिले आहे. ते नृत्य मुक्त असते. त्या नृत्याची योजना देवाघरी होते. पण प्रत्यक्ष पाण्याला आपल्या नृत्ययोजनेबरहुकूम नाचायला लावलेले पाहाणे हा एक अपूर्व अनुभव होता.

लॉस अँजेलिसला असताना कुणी तरी सुचवले की, सान् डियागोला जाऊन वॉटर फण्टसी पाहून या. मला वॉटर फॅण्टसी हा शब्दप्रयोगच आकर्षक वाटला. जलधारांची अद्‌भुत नृत्यलीला ! भल्या पहाटे आम्ही लॉस अँजेलिस सोडले आणि शेदीडशे मैलांवरच्या सॅन् डियागोला बस-मधून निघालो. एक दिवसाची सफर होती. ड्रायव्हर म्हणाला, “ सॅन-डियागोला पाहण्यासारखी दोन महत्त्वाची ठिकाणे ! एक म्हणजे तिथले प्राणिसंग्रहालय आणि दुसरे म्हणजे तिथली समुद्रनगरी. ”

मी विचारले, “ पण ती वॉटर फॅण्टसी कुठं आहे ? ”

“ जिथे वॉटर असेल तिथे ! व्हेअर देअर इज वॉटर देअर इज वॉटर फॅण्टसी ! ”

“ आयला हाही मिट्ट विनोदात शिरलाय– ” मी मनात म्हणालो.

“ मला जर कोणी चॉइस दिला तर मी वॉटर फॅण्टसीच पाहीन. ”

“ पण इथलं झू देखील प्रसिद्ध आहे ना ? ” एक म्याडाम.

“ यस् मॅडम् ! द ॲनिमल्स विल बी डिलायटेड् टु मीट यू– ” डायवरसाहेब भलतेच बेरकी होते.

शेवटी त्याने आमच्यापैकी काही लोकांना समुद्रनगरीत सोडले आणि बाकीच्यांना वाघसिंहांच्या भेटीला घेऊन गेला. सान्‌डियागोच्या समुद्र-नगरीत तर जलचर सृष्टीतले हजारो नमुने ! मत्स्यालयात करंगळीएवढ्या माशापासून अक्राळविक्राळ देवमाशापर्यंत शेकडो जातीचे मासे ! त्यांनाही निमूटपणे पोहू दिले नव्हते. त्यातल्या डॉल्फिन्सना, व्हेल माशांना, सील आणि सी लायन्सना, पेंग्विन्सना आणि शार्कलासुद्धा करमणुकीच्या कार्यक्रमातले कलावंत करून टाकले होते. एवढा महाप्रचंड दोन टन वजनाचा तो व्हेल मासा पोटासाठी डोंबाऱ्याचा खेळ करून दाखवताना पाहून मला तर वाईट वाटले. मला सर्कशीत हत्ती स्टुलावर बसलेलाही पाहवत नाही. माणसाने पाण्यावर सर्कउ केलीच, पण इथे तर पाण्यातल्या माशांना पाण्यावर येऊन नाना तऱ्हेचे खेळ करायला लावले आहे. हा प्रचंड व्हेल मासा तर सराईत सर्कसपटूसारखा तऱ्हेतऱ्हेच्या उड्या मारतो. मला त्याचे ‘ शामू ’ हे नाव फार आवडले. वास्तविक त्याला श्यामराज

म्हणायला हवे. डॉल्फिन्ही अति चतुर! त्यातला एक तर चक्क सर्कशी-तल्या विदूषकासारखा गमती करीत होता.

पाण्यात राहून माशाशी वैर करू नये हे खरे. पण माशाशी मैत्री देखील कुठल्या थराला जाते याचेही दर्शन घडले! एका प्रचंड अशा काचेच्या हौदात पाण्याखाली जलपरींसारख्या सुंदरींनी आणि ह्या माशांनी केलेले नृत्यही आम्ही पाहिले. शेंदीडशे माणसे बसतात एवढेच प्रेक्षागार. रंगमंच म्हणजे तीस पस्तीस फूट लांबरुंद आणि तितकाच उंच असा पांढऱ्या स्वच्छ काचेचा हौद. पाण्याने तुडुंब भरलेला. सुंदर संगीत सुरू झाले. प्रेक्षागारातले दिवे मालवले आणि त्या हौदातले पाणी प्रकाशाने उजळले. झरा खळाळत यावा तसे पिआनोचे सूर खळाळले आणि त्या पाण्यात जलपरीसारख्या अर्धमानवी अर्धमत्स्य अशा तंग वेषातल्या तरुणी अवतरल्या. एखाद्या मत्स्यमुनींकडून तालीम घेतल्या-सारखे त्यांनी पाण्याच्या पोटात शिरून आपले नृत्य सुरू केले. हे नृत्य म्हणजे माशांसारख्या सुळकांड्या होत्या, पण तालबद्ध. कमालीच्या मोहक संगीताची त्याला साथ. त्यातली सुरावटदेखील पाण्याच्या प्रवाहा-सारखी झुळझुळणारी. जणू काय एवढ्याने झाले नाही म्हणून त्या जलपरींबरोबर प्रत्यक्ष पाचसहा फूट लांबीचे मासे कुठून तरी सुळकन आले आणि आता पाण्यातले ते तळपत्या तलवारीसारखे लपलपणारे पण चांगले भक्कम मासे आणि त्या तरुणी यांची नृत्यातली जुगलबंदी सुरू झाली. सुरांच्या फेकीबरोबर त्यातल्या एखाद्या जलपरीने पाण्यात इंग्रजी आठाच्या आकाराची सुळकांडी घ्यावी आणि तो आकडा उलट्या बाजूने उलगडत त्या नृत्यकुशल मत्स्यराजाने जवाब द्यावा! त्या नर्तक माशांनी माणसाकडून तालसूर उचलला होता आणि इतक्या खोल पाण्यात जाऊन त्या नर्तकींनी माशांच्या अवगाहन लीलेतले नृत्य उचलले होते! मला नेहमी कौतुक वाटते ते ह्या असल्या कल्पना ज्यांना प्रथम सुचतात त्यांचे! असला हा प्रचंड हौद बांधायचा, त्याला काच बसवून आतला खेळ दिसेल अशी योजना करायची, मग मासे आणि माणसे एकत्र आणून त्यांना जोडीने नाचायला लावायचे—हे सारे प्रथम ज्याला

सुचत असेल तया माझा दंडवत !

पाण्याची अशी नाना कौतुके पाहात पाहात एका उपसागराच्या तीरावरच्या त्या सागरनगरीतून आम्ही हिंडत होतो. चांगले ऐंशी एकरांचे हे उद्यान आहे. पण इथली मुख्य ' थीम् ' ' पाणी ' ही आहे. जल आणि जलचर हा इथला विषय. घनदाट वृक्ष तर आहेतच, पण ते वृक्षदेखील दर्याकिनारी वाढणारे ! त्यामुळे इथल्या करमणुकीच्या कार्यक्रमातले सारे कलावन्त व्हेल, डॉल्फिन्स, सील्, पेंग्विन्, सी लायन्स, शार्क्स वगैरे मत्स्यकुळातले प्राणी. त्या सागरनगरीत साडेपाच हजार जातींचे मासे आहेत. त्यांचे फुलांशीच नव्हे तर नाना प्रकारच्या रत्नांशी स्पर्धा करणारे रंग. त्या मत्स्याकृतींना तर सीमा नाही. नाताळात खिस्ती लोक ताऱ्यांच्या आकाराचे आकाशकंदील लावतात. थेट त्या आकाराचे लालभडक तारकामत्स्य ! काही तर फुटबॉलला दोन डोळे फुटल्यासारखे ! वॉलरस बुवांच्या झापडमिश्या पाहून मला आमच्या दामलेमास्तरांच्या मिश्या आठवल्या. अर्धांगवायू झालेल्या एखाद्या विनसोंडेच्या बालहत्तीसारखा हा धिप्पाड मासा. त्याला खायला रोज मण अर्धा मण कोलंबी लागते म्हणतात. आमची त्यांची भेट झाली तेव्हा वॉलरससाहेबांचा लंच चालला होता. शी: शी: ! इतके आधाशी खाणे मी कधीही पाहिले नव्हते ! ती कोलंबीची रास रिचवून पुन्हा एकदा खुरटत खुरटत तो अवाढव्य देह त्या पाण्यात पडला तेव्हा मला त्या प्राण्याइतकीच पाण्याचीही दया आली. एकेका जलाशयाच्या नशिबी-देखील कुणाकुणाला आश्रय देणे असते पाहा ! त्या जलनृत्यांतल्या हौदाच्या पाण्याला त्या सुंदर नर्तकींचा सहवास आणि ह्या पाण्यात ओंगळवाणेपणाचे हे मूर्तिमंत स्वरूप घसरून आसरा घेत होते !

आता धारानृत्याची वेळ झाली होती. आम्ही त्या नृत्यमंदिराकडे वळलो. छोट्याशा स्टेडियमसारखे ते बंदिस्त नृत्यमंदिर. त्या गोलाकार आम्ही प्रेक्षागारात खुर्च्या धरल्या. मध्यभागी एक सुमारे पन्नास फूट लांबीचा आणि पाचसहा फूट उंचीचा अंडाकृती मंच होता. त्या मंचावर शे-दोनशे लहानमोठ्या कारंज्यांच्या तोट्या होत्या.बरोबर तीनच्या ठोक्याला

प्रेक्षागारातले दिवे मालवले आणि युरोपीय अभिजात संगीताचे सूर वाद्यमेळ्यांतून उमटले. मिनिटभर त्या अंधारात ते सूर वाजत होते. इतक्यात वाद्यमेळांतल्या व्हॉयलिन्सनी वरचा षड्ज गाठून तिथे ती स्थिरावली, त्यासरशी प्रकाशात ती कारंजी उसळली आणि घटकाभर पांढऱ्या शुभ्र पण हिऱ्यासारख्या झगमगत्या वेषात पॅरिसच्या फोलिजमधल्या पाचपन्नास नर्तकी नाचत आल्याचा त्या जलधारांनी भास निर्माण केला. त्या कारंज्यातून उडणारी प्रत्येक धार आणि उडताना होणारी तुषारांची किमया अशी होती की त्या धारांना सजीव नर्तकीचे व्यक्तिमत्त्व लाभले होते. इथे साक्षात् जलधारांनी 'बॅले'चा कार्यक्रम सुरू केला. त्या कारंज्यांच्या निरनिराळ्या रचना केल्या होत्या. त्यातून उडणाऱ्या फवाऱ्यांचा जोरही इतका कमीअधिक होत होता की एखादे कारंजे हळुवारपणे वर येत असताना दुसरे सुर्रकन उसळी मारून येत असे. त्या कमजास्त जोषातून त्या उसळत्या जलधारांचा स्वभाव प्रकटत होता. त्या नृत्याला बाख्, बीटोव्हन यांच्यासारख्या असामान्य संगीतकारांनी रचलेल्या स्वरशिल्पाची साथ होती. रंगमंचावरच्या नर्तकीच्या वेषभूषेत जशी नाना रंगांच्या कपड्यांची संगती साधतात तशी प्रकाशाची जादूगिरी करून त्या कारंज्यांतून थुयथुयणाऱ्या जल-धारांना नटविले होते. जलधारा, सूर, रंग आणि प्रकाश यांचा हा अलौकिक असा चौपदरी गोफ होता. त्या धारांनी नानाप्रकारांची नृत्ये केली. सुरांबरोबर ती कारंजी नुसती उंचच उडत नव्हती-तर वाकत होती, डोलत होती, चक्करधार घेत होती. कुशल नर्तकी जे जे करते ते सारे काही त्या चतुर संयोजकांनी ह्या पाण्याच्या धारांना करायला लावले होते. त्या धारांनी स्वतःभोवती पिंगा घालून हवाई बेटातल्या सुंदरी-सारखा हूलाहूपसुद्धा केला. त्या धारासमूहातली धारन् धार ते नृत्य करताना कमरेत लचकत होती. शेवटी नृत्य म्हणजे तरी काय? तालाने बांधलेली रेषांचीच गतिमान लीला. त्या जलधारांनी नृत्यातले हे कैवल्यस्वरूप दाखवले. हा नाच कधी संपूच नये असे वाटत होते. प्रेक्षकांना असे वाटता वाटता तो संपवण्यात खरी मौज आहे. सुंदर

कलापूर्ण उत्कर्ष साधून पाण्याला नाचवणाऱ्या त्या अदृश्य तंत्रज्ञांच्या हातांनी हे नृत्य संपवले. टाळ्यांचा गजर झाला आणि त्या अभिनंदनाचा अभिवादनाने स्वीकार करायला नर्तक-नर्तकींचा ताफा रंगमंचावर येतो तशा त्या कारंज्या-कारंज्यांतून हारीने त्या जलधारा वर आल्या आणि कुठल्या चतुर यांत्रिकाने ही किमया केली असेल तोच जाणे, त्या जल-धारांनी नर्तिकांसारखे कमरेत झुकून त्या टाळ्यांच्या गजराचा स्वीकार केला. इथे मात्र पाहणाऱ्याच्या काळजाचे पाणी झाले !

ते जलनृत्यमंदिर सोडताना वाटत होते की, पाण्याच्या ह्या दर्शनाने साक्षात् मनालाच आनंदाचे अवभृत स्नान घडले. शरीराला स्नान घडवणारे पाणी असे मनाला स्नान घडवून जाते तेव्हाच त्या पाण्याचे तीर्थ होते ! युरोप-अमेरिकेच्या प्रवासात पाण्याने हा आनंद मला इतक्या वेळा दिला की यंत्रसंस्कृतीचे भलेबुरे परिणाम भोगीत असलेल्या त्या देशातला माझा प्रवास मात्र नकळत 'तीर्थयात्रा' होऊन गेला.